# या पुस्तकावरील अभिप्राय.

[ The HONOURABLE Mr. JUSTICE
N. G. CHANDAVARKAR,
Judge of the High Court, Bombay. ]

*Morarji Castle, Mahabaleshwar,*
*7th November*, 1902.

Mr. Dattatraya Kamalakar Dikshit's book on Mahableshwar, which he has submitted for my perusal and opinion, is interesting and instructive.

It contains a good deal of useful information about this sanitarium and ought to prove a valuable addition to Marathi literature.

N. G. Chandavarkar.

---

[ RAGHUNATH VYANKAJI SUBNIS,
B. A., Divan of Kolhapur. ]

I have read with interest Mr. Dixit's Mahableshwar Varnan. The book no doubt

supplies a long-felt want and is a very useful guide to visitors to Mahableshwar. The information embodied therein is as varied as it is accurate and the descriptions of the charming scenes for which the Sanitarium is noted possess considerable literary merit. The Historical and Mythological accounts of the place and a short description of its flora have added largely to the usefulness of the book.

RAGHUNATH VYANKAJI SABNIS,

*Kolhapur,*
10*th October*, 1902.

---

[ NARAYAN VINAYAK SATHE,
B. A., Pensioned Head Master. ]

I read Mr. Dixit's account of Mahableshwar with some care. The variety and copiousness of the matter unquestionably shows that the author has been at great pains to collect his materials. Visitors to the hills are sure to find the compilation very useful inasmuch as a glance at the Index will enable them readily to decide how to make the most of the limited time and means at their disposal. As, in addition to this, abundant information is given relating to weather,

water-supply, house accommodation, provisions, and such other particulars as a visitor to a strange place stands in need of, the book will prove to be an invaluable *vade mecum* and should therefore be owned by all those who are bent upon enjoying the hills with the least possible inconvenience. The book has in fact supplied a long-felt want.

NARAYAN VINAYAK SATHE,

*Poona*,
*2nd October*, 1902.

---

[ **आबाजी विष्णु काथवटे. बी. ए**, माजी प्रोफेसर एलफिन्स्टन कालेज, मुंबई ]

**पुणें**, ता० ९ आक्टोबर सन १९०२ इसवी

रा० रा० दत्तात्रय कमलाकर दीक्षित यांचें 'महाबळेश्वर' पुस्तक मीं पाहिलें. हे त्या ठिकाणचे राहणार आहेत; व ह्यांनीं पुस्तक लोकांस उपयोगीं पडेल असें करण्याकरितां श्रम पुष्कळ केले; त्यामुळें पुस्तक सर्व प्रकारें उपयोगीं झालें आहे. ह्यांत राहण्याचीं आणि पाहण्याचीं ठिकाणें, मोठे मोठे रस्ते, आणि पायवाटा, धर्मसंबंधीं आणि ऐतिहासिक महत्वाचीं ठिकाणें, झाडपाले आणि वनस्पती, वगैरेंबद्दल सर्व माहितीचा चांगला संग्रह केला आहे. महाबळेश्वरास जाऊं इच्छिणाऱ्या लोकांस व ज्यांना जाणें अशक्य आहे त्या लोकांसही ह्या पुस्तकापासून सहाय्य आणि आनंद झाल्याखेरीज

राहणार नाहीं. महाबळेश्वरास जाणारे गृहस्थासही पुष्कळ पुस्तकें पाहिल्याशिवाय व स्वतः डोंगरांतून अवघड अवघड ठिकाणीं जाऊन ज्या लोकांशीं बोलणें देखील कठीण पडतें अशा लोकांशीं सहवास केल्याशिवाय ज्या गोष्टींची आणि झाडपाल्यांची माहिती मिळणें अशक्य आहे ती माहिती ह्या पुस्तकापासून अनायासानें मिळणार आहे.

ह्या पुस्तकाचे सहाय्यानें महाबळेश्वर पाहणार आणि त्यावांचून महाबळेश्वर पाहणार ह्याजमध्यें जमीन अस्मानचें अंतर राहणार आहे. ह्याजकरितां हें पुस्तक सर्वांचे आश्रयास पात्र आहे, असें मी मोठ्या संतोषानें म्हणतों.

**आबाजी विष्णु काथवटे.**

---

**[ नामदार गोपाळ कृष्ण गोखले, बी. ए., फर्ग्युसन कालेजचे प्रोफेसर, लोकल व सुप्रीम लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे मेंबर व पुणें म्युनिसिपालिटीचे प्रेसिडेंट. ]**

रा० रा० दत्तो कमळाकर दीक्षित यांनीं केलेलें "महाबळेश्वरवर्णन" मीं वाचून पाहिलें. महाबळेश्वरास जाणाऱ्या गृहस्थांस या पुस्तकाचा चांगला उपयोग व्हावा ह्मणून रा० दीक्षित यांनीं फार परिश्रम केले आहेत यांत शंका नाहीं. दंतकथा ऐतिहासिक माहिती, पहाण्याचीं ठिकाणें, राहण्याचे बंगले, तेथें मिळणाऱ्या वनस्पती वगैरेंबद्दलची माहिती इत्यादि अनेक उपयुक्त व मनोरंजक गोष्टींचा रा० दीक्षित

यांनीं या पुस्तकांत समावेश केला आहे. पुस्तक लोकाश्रयास पात्र आहे. तो मिळून रा॰ दीक्षित यांनीं केलेल्या श्रमाचें चीज होईल अशी आशा आहे.

**पुणें**, ता॰ १८ आक्टोबर, सन १९०२ इ॰

**गोपाळ कृष्ण गोखले.**

---

[ **चिंतामण गंगाधर भानू बी. ए.** प्रोफेसर आणि लाईफ मेंबर, फर्ग्युसन कालेज, पुणें. ]

सा॰ न॰ वि॰ वि॰ आपलें पुस्तक बरेंच वाचलें, पुस्तक सर्वोपयोगी, व मनोरंजक असें झालें आहे. असल्या माहितीनें भरलेलीं पुस्तकें आपल्या भाषेंत फारच थोडीं आहेत. तेव्हां आपलें हें पुस्तक मराठी वाङ्मयाला भूषण देणारें होणार आहे. आपलें वनस्पतीसंबंधीं पुस्तक केव्हां वाचण्यास मिळेल याची मी वाट पाहत आहें. प्रयत्न फार चांगला आहे, उत्तम सिद्धीस गेला आहे. कळावें, लोभ असावा, हे विनंती.

**चिंतामण गंगाधर भानू.**

---

# महाबळेश्वर.

## क्षेत्र व सॅनिटेरिअम याचें वर्णन.

दत्तात्रय कमलाकर दीक्षित

यांनीं तयार करून प्रसिद्ध केलें.



सन १९०२.

पुणें येथें
"ज्ञानप्रकाश" छापखान्यांत हरि नारायण गोखले
यांनीं छापिलें.

श्रीमत्

क्षत्रियकुलावतंस शिवराजकुलभूषण

**श्रीमन्महाराज शाहू छत्रपति,**

जी. सी. एस. आय., एल. एल. डी., एम आर. ए. एस.,

जी. सी. व्ही. ओ.

**यांचे**

विद्याव्यासंगिता, गुणग्राहकता, प्रजापालनतत्परता,

स्वधर्मप्रीति, उदारता, देशपर्यटनाविषयीं

उत्कट लालसा व ज्ञानप्रसार

करण्याविषयीं उत्सुकता,

इत्यादि

**अनेक गुणांवरून पूज्यबुद्धि वाटून**

हें पुस्तक परवानगीनें त्यांचे सेवेसी

**परमादरानें अर्पण केलें आहे.**

# आभारपत्रिका.

आपल्या उदात्त आणि परोपकारी अंगस्वभावास अनुसरूनच आमचे सन्मित्र, लोकप्रिय व सज्जन गृहस्थ, रा० रा० **हरि नारायण आपटे**, कादंबरीकार व करमणूक पत्राचे कर्ते, यांनीं आपला अत्यंत अमोलिक वेळ खर्च करून आमच्या या पुस्तकाची हस्ताक्षरी प्रत साद्यंत तपासण्याची व त्यासंबंधी योग्य आणि उपयुक्त सूचना देण्याची मनःपूर्वक तसदी घेतल्यामुळें मी त्यांचा फार फार ऋणी आहें. अशा लोकोपयोगी सद्गृहस्थांच्या उपकृतिऋणाचें जें मजवर ओझें झालें आहे त्याची जागृति नेहेमीं माझे अंतःकरणांत राहील.

न्यायाश्रयकर्ते व सार्वजनिक सभेचे माजी सेक्रेटरी रा० रा० **शिवराम हरि** ऊर्फ **आबासाहेब साठे** महाबळेश्वरीं दर साल येऊन सुमारें ३०।३५ वर्षांचे हे पूर्ण अनुभवी असल्यामुळें त्यांच्याकडून वेळों

वेळीं मिळालेल्या माहितीच्या सूचनांबद्दल मी त्यांचा ही फार आभारी आहें. मुख्य गोष्ट ही आहे कीं, हें पुस्तक करण्याची प्रेरणा माझे मनांत होण्यास त्यांच्या उपदेशाची मजवर मोठी कृपा झाली आहे.

राजेश्री **नरहर गोविंद टोळ** यांनीं या पुस्तकासंबंधी व छपाईचे कामीं मदत केली त्याबद्दल मी त्यांचाही आभारी आहें.

**द० क० दीक्षित.**

---

# प्रस्तावना.

या संसारांतल्या आनंदांत सृष्टीच्या अतिरम्य, भव्य व उदात्त स्वरूपाचें प्रेक्षण हा एक महानंद आहे. तो महानंद पूर्णपणें जेथें लाभतो अशी स्थळें थोडीं, व त्या थोड्यांच्या मालिकेंत महाबळेश्वर हें बरेंच वरचें स्थान व्यापील असें आहे. येथें सृष्टीचें उदार रमणीय स्वरूप दिसतें; हवा थंड परंतु कोरडी असल्यामुळें आरोग्य लाभतें; पाणी रुचिकर व गुणकारी असल्यामुळें हुशारी देतें. सारांश, सृष्टिदेवीनें आपला वरदहस्त या स्थानावर ठेविला असल्या कारणानें या स्थानीं येणाराच्या मनास आल्हाद, व शरीरास आरोग्य यांचा लाभ होतो.

महाबळेश्वरीं दर्शनीय प्रदेश अनेक, तेव्हां त्यांची माहिती देणारें पुस्तक अवश्य आहे, असें मनांत आणून व प्रवासी मंडळीस भासलेली अवश्यकता त्यांच्या उद्गारांवरून जाणून प्रस्तुत पुस्तक तयार केलें आहे. अनेक पुस्तकांतून मिळालेल्या माहि-

तींत स्वतःच्या माहितीची पुष्कळ भर घालून पुस्तक लिहिलें आहे. माहिती आज तागाईतपर्यंतची देण्याचा यत्न केला आहे. किती विषय आले आहेत तें विषयानुक्रमणिकेवरून व शेंवटल्या सूचीपत्रावरून वाचकांचे ध्यानांत येणार आहे. शेवटीं नकाशा जोडला आहे. महाबळेश्वर म्हणजे औषधोपयोगी वनस्पतींचें भांडार होय. तेव्हां बऱ्याच वनस्पतींची माहिती यांत दिली आहे. शिवाय येथल्या वनस्पतींच्या सविस्तर वर्णनाचें एक पुस्तक तयार करून तें लवकरच प्रसिद्ध करण्याचा विचार आहे. भिषग्वर भाऊ दाजी व नारायण दाजी यांनीं येथील वनस्पतींचा शोध केला त्यावर तसा प्रयत्न कोणीच केल्याचें आढळत नाहीं. प्रस्तुत पुस्तकर्त्ता महाबळेश्वरचा कायमचा रहिवासी व त्यास वनस्पतींचा शोध करून गुणावगुण जाणण्याची फार उत्सुकता, यामुळें त्यानें तो व्यासंग करून यांतील वनस्पतींचीही माहिती मिळविली आहे.

पुस्तक करण्याचा हा पहिलाच प्रसंग असल्यामुळें यांत प्रमाद होण्याचा किंवा माहिती देण्याची राहण्याचा संभव असल्यामुळें कदाचित् तसें झालें

असल्यास त्याजबद्दल आमचे सुज्ञ वाचक माफी कर-तील अशी आशा आहे. या पुस्तकांत घालण्यासा-रख्या ज्या कांहीं गोष्टी कोणाच्या लक्षांत येतील त्या कळविण्याची कृपा झाल्यास पुढील आवृत्तींत आभारपूर्वक देण्याची तजवीज करूं.

आतां प्रस्तावना अधिक लांबवीत न बसतां वा-चकांस महाबळेश्वरीं जाण्याच्या रस्त्यांवरच नेऊन सोडतों.

द० क० दीक्षित.

---

# उपोद्घात.

देखे महाप्रचंड गिरी । विशाळ पर्वतांचिया दरी ।
जळें तुंबिलीं सरितांसरीं । समुद्रतुल्य अगाध ॥ १ ॥
तेथें आम्र निचोल बेल । कवंट कदंब मधु पिंपळ ।
सिरस पलाश विशाळ । न्यग्रोधवृक्ष वाढिन्नले ॥ २ ॥
ताळ हिंताळ शाळ सरळ।मंदार कांचन तमाळ निर्मळ।
पिचुमंद देवदार धवळ । अर्जुनवृक्ष अपार ॥ ३ ॥
बदरी श्लेष्मातकी आंवळी । शाल्मली करवंदी जांबुळी ।
चारी वल्लातकी गुग्गुळी । शमी वेरुकळी चिंचाणिका ४
ऐसिया वृक्षांचीं अचाट । डांगें लागलीं घनदाट ।
माजी निर्झरोदकाचे पाट । सैरावैरा धांवती ॥ ५ ॥
मस्तकें उचलोनि दिनकर । छायें रक्षिला अंधकार ।
माजी श्वापदगणांचे भार । सुखावले सुखवस्ती ॥ ६ ॥
हरिण करी सिंह शार्दूळ । चित्ते चितेळ तरस तरळ ।
रिक्ष रोही गवे मांसाळ । अरण्य सारें माजलें ॥ ७ ॥

---

महाबळेश्वर हें बरेंच पुरातनचें क्षेत्र असून याची महती पूर्वी मुळींच नव्हती असें नाहीं. या क्षेत्राची पौराणिक माहिती वाचकांस पुढें दिलेलीच आहे

हें अत्यंत रमणीय स्थान सृष्टिसौंदर्याच्या व आरोग्याच्या दृष्टींनीं स्पृहणीय आहे. माथाळ्यावर दिलेल्या कविवर्य मुक्तेश्वराच्या सृष्टिवर्णनात्मक उताऱ्यांत वर्णिल्याप्रमाणें खरोखरच येथें स्थिति आहे. या स्थानीं आजमित्तीस अनेक ठिकाणांहून व प्रांतांतून उन्हाळ्याच्या सुटींत अनेक श्रीमंत लोक येऊन राहतात. त्या ठिकाणीं आज वाचकांस नेऊन सोडण्याचा आमचा विचार आहे. इलाख्यांतील अनेक ठिकाणांहून अनेक रस्त्यांनीं लोक येथें येतात. परंतु मुंबई हें आजकाल पश्चिम हिंदुस्थानाचें केंद्र स्थान होय. त्या स्थानापासूनच आपण निघालों अशी कल्पना करूं. मुंबईपासून वाटारापर्यंत आगगाडीचा रस्ता आहे. मुंबईस सुमारें दुपारी अडीच वाजतां गाडींत बसलें म्हणजे सायंकाळीं पावणे सात वाजतां आपण पुण्यास येतों. तेथून सदर्न मराठा रेल्वेनें सवासात वाजतां निघून वाटारास मध्यरात्रीनंतर थोड्या वेळानें पोंचतों. तेथें भाडोत्री तांगे, किंवा बैलगाड्या यांची सोय असते. परंतु चांगल्या फैटण गाड्यांची सोय पुण्याच्या मेल कंत्राटदाराकडे आगाऊ लिहूनच करावी लागते. फैटणींत बसून निघालें म्हणजे उजाडण्याचे

सुमारास वांई गांठली जाते. नंतर पुढें पसरणी-चा घाट लागतो त्या घाटांतील निरनिराळ्या वळणांनीं वर चढून चाललों असतांना कृष्णा नदीचें खोरें व महाबळेश्वरशैलाचे फुटलेले अफाट फरगडे यांची गर्दी उडालेली दिसते. एक दोन ठिकाणीं समुद्रपृष्ठापासून (४६०९) फूट उंच असलेला तोरणा किल्ल्याच्या व(३९९२)फूट उंच असलेल्या राजगड किल्ल्याच्या शिखरांचा भास होतो. आणि सर्वांत उंच असलेल्या अशा एका कडा तुटलेल्या पाइंटा-वरून चोहोंकडून जंगलानें लपेटून गेलेलें महाबळे-श्वरचें देऊळ व गांव हीं हळूंच आपआपलीं डोकीं वर करताहेतशीं दिसतात. पुढें रस्ता वळल्याबरोबर तीं अदृश्य होऊन पुन्हां तोंडें दाखवीत नाहींत. आणि मग कृष्णेचीं वळणें व त्यांच्या भोंवतालचीं कीर्र झाडी यांची कंटाळवाणी लांबण लागते. कांहीं कांहीं ठिकाणीं टेंकड्यांच्या घसरत्या बाजूवर धान्य पिकविण्यास जागा काढलेल्या दिसतात. बाकीचा डोंगर काळा खडकाळ दिसत असतो.

ही चढण पार पडल्यावर पांचगणीच्या लहान वसाहतीचा आनंददायक देखावा दृष्टीस पडतो. त्यांत उंच सुरूच्या व बांबूच्या झाडांच्या रांगांमधून

लहानशी टुमदार घरें व बाजार हीं वर उगवून आल्यासारखीं दिसतात. अशा दुतर्फा लाग-लेल्या जंगली पर्णकुटिकांच्या पलीकडे जाऊन पोहोंचेपर्यंत एक मैलभर आपण उंच डोंगरावर आहों असें दिसत नाहीं. परंतु पुढें डावे हातास खोल दऱ्या व पलीकडे यवतेश्वर, सातारचा किल्ला वगैरे उंच स्थळें दृष्टीगोचर होतात.

पांचगणीचे खालील खोऱ्यांतून वाहणाऱ्या प्रवाहाचें पाणी गहू व भाताच्या लहान लहान पट्ट्यांस पाट बांधून नेलेलें दृष्टीस पडतें. तसेंच भात व नाचणी पावसाळा अखेर कापून काढल्या नंतर त्यांत गहूं करितात, त्याचे शेतांत उभे राहिलेले सड येथें पिकें असल्याची साक्ष देत असतात. ठिकठिकाणीं चढ उतार लागून जात जात हा रस्ता महाबळेश्वर गिरिशिखरावर जाऊन पोहोंचला आहे. या अंगास दाट उगवलेलीं काटेरीं झाडें व रानोमाळ पसरलेले कर्दळीसारखे आरारोटचे वर आलेले कांदे पाहून पावसानें आपली शिकस्त केली असावी असें वाटतें. वेण्या नदीचें खोरें पुढें लागतें त्याच्या बाजूची बागाईत कृत्रिम केली असतांही ती भोंवतालच्या खुरट्या जंगलाप्रमाणेंच स्वभावसिद्ध

असल्यासारखी दिसते. पुढें वेण्या सरोवर व त्याचे कडेची दाट झाडी हीं पाहून गजेंद्रमोक्षाच्या वेळीं ज्या चंपा सरोवराच्या कांठीं जंगलांतून हत्ती येऊन तो चमत्कार घडला, तसाच या सरोवरांत अरण्य कुंजर येऊन होतो कीं काय असें वाटतें. मैल.

पुण्यापासून (रेलवे मार्गानें) वाटार—६८¼
वाटारपासून वांई ....................२०
वांईपासून पांचगणी....................८
पांचगणीपासून महाबळेश्वर-........१२

अशा तऱ्हेचा या रस्त्यानें प्रवास होतो.

**जुना पुणें रस्ता.**

पुण्याहून शिरवळ ................३०½
शिरवळापासून सुरूळ ............१६½
सुरूळपासून वांई ...................७

बैलगाडीनें दोन दिवस व टांग्यांतून १० किंवा बारा तास या दोन्ही रस्त्यांनीं प्रवास करण्यास लागतात.

पुण्याहून गाडीरस्त्यानें जाणाऱ्या लोकांनीं एक तर कातरज व खंडाळा हें लहानसें दोन घांट वलांडून सुरूळाहून वांई पहावी, हाही प्रवास वाईट नाहीं. पण कसेंही केलें तरी इकडून जाणा-

ऱ्या पथिकास वांईपाशीं कृष्णा उतरल्याबरोबर लागणारा आठ मैलाचा घांट चढल्यावांचून गत्यंतर नाहीं. यास पसरणीचा घाट म्हणतात.

कोंकणपट्टीनें मुंबईकडून मुंबईहून कार्नाक बंदरांतून सकाळीं साडेसहाच्या बोटीनें निघून सायंकाळीं साडेचार वाजतां बाणकोटास उतरावें; व पुढें लहान होडींत बसून सावित्रीच्या खाडीनें तीन तासांत दासगांवास यावें. बाणकोटाहून दासगांवास येतांना दैवयोगानें चांदणें पडलें असलें तर वाटेनें सभोंवार दिसणाऱ्या वनश्रीचें अनिवार कौतुक वाटल्याशिवाय राहणार नाहीं. दासगाव बंदराजवळ धर्मशाळा व रहदारी बंगला आहे त्यांत रात्र गुदरावी किंवा आगबोटीनें नागोठण्यास उतरून तेथून दासगावास यावें. दासगांवाहून पहाटें उठून बैलगाडीनें निघून पोलादपुरास १६ मैलाचा पल्ला मारून जरा आराम घ्यावा. येथें बंगल्यांत व कोठेंही उन्हाच्या रखरखीनें आलेला शीण परिहार करून संध्याकाळबरोबर आंबेनळी किंवा वाडा गांवचे घांटचढणीस लागावें. पोलादपुरापासून निघाल्यावर ५ मैलावर जुना किणेश्वर रस्ता लागतो. तो सोडून देऊन पुढें झुकावें. म्हणजे डावीकडे पुनः एक रस्ता फुटतो, तिकडे

वळून प्रतापगडाची शोभा पहात पहात वाडागांवर येऊन वाटल्यास तळ देऊन रहावें. इतकें येण्यास पांच तास लागतील. वाड्यापासून १० मैल फिटझर्ल्ड घाटाचा लांबण संपल्यावर मुंबई पाइंटाजवळ लोक पोहोंचतात, व मग प्रवासाच्या दगदगींतून पार पडतात. इकडून येणाऱ्या लोकांजवळ मुंबई सोडल्यापासून निदान २।३ दिवस पुरण्यासारखें फराळाचें सामान शिल्लक पाहिजे. ह्या रस्त्यानें येण्यांत येवढाच फायदा आहे कीं उत्तम तऱ्हेचे देखावे दृष्टीस पडतात. ऐन उन्हाळ्यांत मात्र रस्त्यावर अगदीं धुराळा उधळून जातो. टांगा पाहिजे असल्यास मेल कंत्राटदाराला आगाऊ वर्दी दिली म्हणजे वर्दीप्रमाणें आगाऊ टांगा मिळतो.

बेळगांव धारवाड कडील वाचकांस प्रवास करून जावली पेट्यांतील मेढें खोऱ्यानें केळघर नांवाचा घाट चढून या रम्य शैलावर येणें सोईचें वाटेल.

साताऱ्याहून मेढें १४ मैल आहे. येथें एक रहदारी बंगला असून सर्व सोयी आहेत. मेढ्याहून निघून एकदम एकोणीस मैलांची मजल करून कित्येक लोक महाबळेश्वरी येतात. केळघर आणि मेढ्यास घोड्याचे दोन टप्पे ठेविले ह्मणजे टांग्यानें

येथें येण्यास सात तास पुरतात. या रस्त्यानें येण्याजाण्यास **सा**तारा व **म**हाबळेश्वर येथें टांगे व फैटणी मिळतात.

सदर्नमराठा रेल्वे कंपनीचें एक आफिस **म**हाबळेश्वरास आक्टोबरपासून जून अखेर पावेतों ठेविलेलें असतें. त्यामुळें रेल्वेनें येणारा जाणारा माल गुड्ज किंवा पार्सलनें येथून बाहेर व बाहेरून येथें खुशाल आणितात व नेतात. त्यास गुड्सचें दर मणास १० आणे व पार्सलचें दर पौन्डास एक आणाप्रमाणें हंशील पडतें.

**जा**वली, **वां**ई व **म**हाड या तीन ठिकाणांहून **म**हाबळेश्वरीं येऊन दाखल होणाऱ्या तिन्हींही सडका आपल्या परी फार उत्तम आहेत; पण त्यांतल्या त्यांत **म**हाडचा रस्ता विशेष रमणीय आहे, येवढें येथें झटल्यावांचून राहवत नाहीं. कारण, त्या रस्त्यानें वनश्री फारच मनोहर आहे.

---

# अनुक्रमणिका.

पृष्ठ.

पृष्ठ.

पृष्ठ.

---



# महाबळेश्वर.



जेथील सुखकारक थंडीमुळें व आरोग्यकारक हवेमुळें ज्यास हवा खाण्याचें ठिकाण असें लोकांनीं ठरविलें आहे तें **महाबळेश्वर** गांव उत्तर अक्षांश १८° १' व पूर्वरेखांश ७३° ४१' यांचे दरम्यान, **सह्याद्रि** पर्वताच्या साठ मैल लांबीच्या पृथ्वीच्या मानदंडास ज्या पांच शाखा आहेत त्यांपैकीं एका शाखेवर आहे. **सातारा** जिल्ह्यांतील **जावली** तालुक्यांत अगदीं पश्चिम बाजूस **सह्याद्रीच्या** अतिशय उंच असलेल्या शिखरावर याची वस्ती झालेली आहे. समुद्राच्या पृष्ठभागापासून या शिखराची उंची ४७१० फूट आहे.

महाबळेश्वर डोंगराची रांग ३० मैल लांबीची आहे व वरच्या पठाराचें क्षेत्र ३०० एकरच्या वर आहे. मांढरदेव डोंगराच्या माथ्याच्याच सपाटीचा भाग याच्या तोडीचा आहे. इतका विस्तृत डोंगरमाथा इतर कोणत्याही स्थळीं नाहीं. या गांवाचे महाबळेश्वर हें नांव फार पुरातनचें असून यांतील मुख्य पेठ प्रथम ज्या साहेबांचे नांवें वसली, त्यांचेंही नांव साहेब लोकांनीं यास दिलें आहे. माल्कमपेठ हीच गांव वसते वेळची पहिली पेठ. तिचे नांवानें हा हवा खाण्याचा गांव प्रसिद्ध आहे.

या माल्कम पेठेचें पहिलें लोकांचें तोंडीं बसलेलें नांव नहर असें होतें व येथील जवळपासच्या खेड्यांतून राहणाऱ्या धनगर व कोळी लोकांच्या तोंडांतही " नहर " हेंच नांव बसलें आहे. नहर ह्मणजे थंड प्रदेश या अर्थास अनुसरूनच येथील हवापाण्यावरून हें नांव दिलें गेलें असावेंसें वाटतें. हें गांव पूर्वीं लहान खेडें असून यांत धनगर व कोळी वगैरे जंगली लोकांच्या वस्तीचीं दहावीस झोंपडीं होतीं. वाघ, तरस, सांबर वगैरे हिंसक

प्राणी तर येथें दिवसा ढवळ्या 'आ' करून खाण्यास येण्यास अनमान करीत नव्हते. येथील झाडी इतकी किर्र होती कीं कित्येक ठिकाणीं तर बारा बारा महिने सूर्यदर्शनसुद्धां होणें कठीण असे. अशा ठिकाणाला येत येत ७५ वर्षांनीं आजची उन्नत स्थिति प्राप्त झाली आणि मधलें नहर हें नांव लयास जाऊन अगदीं पुरातनचें महाबळेश्वर हें नांव पुनः स्थापित झालें.

---

# मूळ महाबळेश्वर श्री शंकराचें स्थान व पंचगंगा.

---

शिरस्योर्ध्वं मौलिर्नयनयुगुलं भाति विमलं
ललाटे कस्तूरीतिलकमपि कृष्णे स्मितमुखी ।
चतुर्हस्ते पद्मं वरदमभयं शंखवलयं
कटौ सूक्ष्मं पीतांबरमपि च वंदे तव पदं ॥१॥
जनानां स्नातानां वृजिनहरणोत्धूलितवपु-
र्न वै लेभेऽभ्यंगावसरमपि वा पुण्यसलिलं ।

**प्रहातुं मालिन्यं स्नपनविधिना जन्हुतनया**
**त्वदंते संयाति त्रिदशगुरुकन्यागमतिथौ ॥२॥**

मूळ महाबळेश्वर प्रसिद्ध क्षेत्र असून नहर किंवा मालकम पेठेपासून दक्षिणेस सुमारें ३ मैल आहे.

स्कंदपुराणामध्यें या क्षेत्राचे उत्पत्तीविषयीं वृत्तांत लिहिला आहे त्याचा सारांश घेऊन येथें माहिती दिली आहे.

मनुष्य जातीची उत्पत्ति होण्याचे पूर्वी शैल्यकाननादि सृष्टि निर्माण करून ब्रह्मदेव ब्रह्मलोकीं तप करीत असतां विष्णूंनीं त्यांस मनुष्यसृष्टि करण्याची आज्ञा दिली. तेव्हां शिव, विष्णु, सरस्वती, कश्यपादि ऋषी, व वेद या सर्वांस समागमें घेऊन ब्रह्मदेव सह्याद्रीच्या मस्तकावर आले. नंतर ब्रह्मा, विष्णु, महेश यांनीं ब्रह्मतीर्थ, विष्णुतीर्थ आणि रुद्रतीर्थ या ठिकाणीं तपश्चर्या केली. त्यावेळेस सृष्टि उत्पन्न करण्याजोगी तपःसिद्धि होऊन, तपोवनें इत्यादि निर्माण झालीं.

ब्रह्मा, विष्णु, महेश यांचा निवास येथें होऊं लागल्यावर ब्रह्मदेवानें यज्ञ करण्याचें मनांत आणून,

ब्रह्मारण्यांत[१] उत्तम रत्नखचित मंडप घातला व यज्ञसामग्री जमा करून, देव, ऋषि, गंधर्व इत्यादिकांस निमंत्रण केलें. वेदी सिद्ध होऊन यज्ञाच्या मुहूर्ताची घटिका भरत आली. तथापि मुख्य यजमान जो ब्रह्मदेव त्याची पत्नी सावित्री ही वस्त्रभूषणें परिधान करण्याचे नादांत निमग्न असल्यामुळें, तिला मुहूर्ताच्या समयाचें भान न राहतां येण्यास विलंब लागला. तेव्हां विष्णुप्रभृति देवांची अनुमति घेऊन ब्रह्मदेवानें आपली द्वितीय पत्नी जी गायित्री इचे समागमें यज्ञदीक्षा घेतली व मुहूर्त साधला. नंतर मंगलवाद्यांचा गजर व वेदघोष झाला तो ऐकून सावित्री लगबगीनें यज्ञमंडपांत येऊन पाहते तों गायित्रीसमागमें यजमान यज्ञ करीत आहेत. असें पाहून तिच्या अंगाचा अगदीं तिळपापड होऊन कोपानें ती अगदीं लाल झाली आणि तिनें लागलींच सर्वांवर शापांचा गहजब करून सोडला:—

ब्रह्माविष्णुमहेशाश्च मामुल्लंघ्य यशस्विनीम् ।
धर्मातिक्रममारेभुरतः संतु जलात्मकाः ॥

---

१ महाबळेश्वर गांवाच्या पलीकडील अंगास जें एक सफाट अरण्य आहे त्यांस हें नांव पडलें आहे.

**स्त्रियोनाम्ना प्रथां यांतु गायित्र्याः पक्षपाततः ।**
**गायित्र्यपि नदी भूत्वा केनापीयं न लक्षिता ॥**

याचा भावार्थ असा कीं, तुम्ही गायित्रीचा पक्षपात केलात, त्याअर्थीं जलरूप होऊन स्त्री नांवानें जगांत प्रसिद्ध व्हाल, व गायित्रीही नदी होईल व तिजकडे लोक दुर्लक्ष्य करितील. हें ऐकून विष्णूनेंही सावित्रीला शाप देऊन उसनें फेडिलें व जलप्राय करून टाकिलें. असें होतांच सावित्रीनें मोठ्या त्राग्यानें लागलींच जवळ विलक्षण उंचीच्या कड्यावरून उडी घेऊन समुद्रास सत्वर जाऊन मिळण्याचा मार्ग स्वीकारला. असें पाहून तिची समजूत करून तिला परत माघारी आणण्याकरितां ब्रह्मदेवही मागोमाग गेले. परंतु ती परत आली नाहीं. सावित्रीचे कांठीं समुद्रकिनाऱ्यापर्यंत १२ लिंगें अंतरानें असलेलीं पाहून याचा खरेपणा वाटतो. नंतर आरंभिलेला यज्ञ पुढें चालविला असतां त्यास एक मोठें विघ्न उत्पन्न झालें. त्याची हकीकत अशीः—

महाबळ व अतिबळ या नांवाचे दोन पराक्रमी दैत्य भाऊ भाऊ असत. त्यांनीं तिन्ही लोकांस फार जर्जर केलें. तेव्हां ब्रह्मा विष्णु महेश हे सैन्य घेऊन

त्याजबरोबर युद्ध करण्यास गेले असतां, विष्णूनें अतिबळाचा वध केला. हें वृत्त महाबळास कळतांच तो देवांवरोबर समर करण्यास आला. त्याचे प्रतापापुढें देवत्रयाचा ठिकाण लागेना. या कारणास्तव देवांनीं जाऊन महामाया जी देवी तिचें स्तवन केलें व दैत्याचा नाश होईल अशी युक्ति सांगावी म्हणून विनंति केली. देवी प्रसन्न होऊन तिनें त्यांस मोह घालून संगरांतून परत आणलें. नंतर महाबळानें संतुष्ट होऊन वर मागण्याविषयीं देवांस सांगितलें. तेव्हां " तूं आमचे हातून मरावास " हें वरदान त्यांनीं मागितलें. सर्व देव आपणास शरणागत झाले आहेत, आपण विश्वाचे स्वामी आहोंत, व विश्वाचा उपभोगही घेतला आहे त्याअर्थीं देहाचें सार्थक होऊन गेलें, आतां मरण यावें हेंच उचित, असा विचार करून दैत्यानें देवांस देह अर्पण केला. नंतर देवांनीं त्यास मुक्तिपद देऊन वर मागण्यास सांगितलें. तेव्हां दैत्यानें देवाचा स्तव करून वर मागितला तो असा:—

प्रसन्नोऽसि यदा शंभो तदास्मिन्सह्यमस्तके ।
मन्नाम्ना लिंगरूपस्त्वं सृष्ट्यादौ भव शंकर ॥ १ ॥
मस्तके पंचगंगानामुत्पत्तिश्चास्तु संततम् ।
मद्भ्रातृनाम्ना विष्णो त्वं दिव्यलिंगं भव प्रभो॥२॥
सैन्यस्य मम कोटीनां कोटीशो भव पद्मज ।
मन्नाम्ना ख्यातिमागत्य क्षेत्रं चास्तु भुवि प्रभो॥३॥

याचा भावार्थ असा कीं शिवानें लिंगरूप होऊन मस्तकीं पंचगंगांच्या उगमांचें ओझें धारण करून महाबळेश्वर नांवानें या ठिकाणीं वास करावा; व विष्णूनें माझ्या भ्रात्याच्या (म्हणजे अतिबळेश्वर) या नांवानें येथें रहावें; आणि ब्रह्मदेवानें माझ्या कोटी सैन्याचें नांव धारण करून कोटीश्वर व्हावें. तसेंच सर्व क्षेत्रभूमीसही महाबळेश्वर हेंच नांव द्यावें.

याप्रमाणें आलेल्या विघ्नाचें निरसन करून यज्ञाचें कृत्य शेवटास नेलें. आणि यज्ञसमाप्तीचे अवभृतस्नान सर्वांनीं कोंकणांत हरिहरेश्वरीं शुक्लतीर्थांत केलें.

याप्रमाणें महाबळाचें मागणें मान्य करून या महाबळेश्वर गांवांत शिवांनीं लिंगरूप धारण केलें व

मस्तकावर पंचगंगा उगमाची साक्ष देणारे पांच जलपूरित रुद्राक्षाकृति खळगे धारण करून येथें वास केला. हें देऊळ या पंचनद्यांच्या उत्पत्तिस्थानाचें महाबळ राक्षसाच्या वरदानाप्रमाणें स्मारक ह्मणून केलेलें आहे. तसेंच फक्त कृष्णादि पंचनद्यांचें महाबळेश्वर देवळाच्या वरील चढावावर एक देऊळ आहे. त्यांतही उगमाच्या निरनिराळ्या ओऱ्या बांधून काढून गायमुखानें सर्व नद्यांचें पाणी कुंडांत सोडिलें आहे. तिसरी गोष्ट उगमाची स्थलें महाबळेश्वर डोंगराखालील निरनिराळ्या खोऱ्यांतून उत्पन्न झालेल्या प्रवाहांच्या मुळांशींही मानण्याची लोकांत प्रवृत्ति आहे.

जेथें ब्रह्मदेवांनीं यज्ञ आरंभून कलह उत्पन्न केला व एकमेकांवर शापांचे भडिमार करून घेऊन सर्व देव जलरूप बनले तें यज्ञाचें ठिकाण महाबळेश्वर गांवच्या लगतच उच्चस्थानीं अरण्यांत आहे.

देवांनीं याच स्थळीं महाबळ व अतिबळ या दैत्यांबरोबर तुमुल युद्ध करून त्यांचा नाश केला पण स्वतः त्यांच्या वचनांत सांपडले हीही हलकीसालकी गोष्ट झाली नाहीं, हें वरील हकीकतीवरून

करून येईलच. या सर्व डोंगरास महाबळेश्वर अशी संज्ञा मिळाली व पांचही पुण्य नद्यांचें पवित्र व मधुर पाणी सर्व डोंगरभर सारखें पसरून राहिलें आहे. अशा करण्यानें देवांनीं त्या महाबळ दैत्याच्या वरप्रदानाची व सावित्रीच्या शापाची पाळणूक केली. परम साध्वी जी सावित्री, तिचा जाज्वल्य शाप—स्त्रीरूपानें जगांत प्रसिद्ध होण्याचा—उगीच लटपटींत नव्हता. त्या प्रमाणें सर्वजण जलप्रवाहरूप धारण करून निरनिराळ्या खोऱ्यांतून जणूं काय सर्व जगांत नीटपणें प्रसिद्धी व्हावी म्हणून जवळच्या जवळ पश्चिमेकडे न जातां, तिघे देव नदीरूपानें दूरवर पूर्व समुद्राकडे वहात गेले. त्यांतील विष्णू कृष्णा नदीचें नांव स्वीकारून पूर्ववाहिनी नदी बनले. महेश वेण्या नदी रूपानें प्रसिद्धीस आले. व ब्रह्मदेव कुकुद्मति किंवा कोयना नदी होऊन गेले. गायित्री व सावित्री या दोन्ही जातीच्याच स्त्रिया असल्यामुळें त्यांस स्त्रीवाचक नावें निराळीं पडलीं नाहींत. फक्त त्यांच्या नद्या मात्र निरनिराळ्या पश्चिमवाहिनी झाल्या आहेत. कृष्णाबाई वगैरे पंच नद्यांच्या उगमांचें एक व खुद्द महाबळे-

श्वरचें एक, अशीं दोन निरनिराळीं देवळें फक्त स्थळ-माहात्म्य वाढविण्याकरितां स्मारकाप्रमाणें केलीं आहेत.

अशीं महाबळेश्वरगिरीच्या मस्तकावर देवतांची रूपांतरें होऊन त्या पुनः एके ठिकाणीं महाबळेश्वर लिंगाच्या वर येऊन राहिल्या त्याची साक्ष अद्याप पावेतों आहे. ती पाहण्याची कोणाची इच्छा असल्यास त्यांनीं महाबळेश्वर क्षेत्रांतील महाबळेश्वरच्या देवालयांत जाऊन त्यांतील गाभाऱ्यांत स्वयंभू पिंडी किंवा लिंग आहे त्यावर सतत पाण्यानें डबडबलेले पांच खळगे आहेत ते पहावे. यांतील पाणी कधींही आटत नाहीं. ब्राह्मण व शूद्र यांवाचून इतरांस मात्र आंत जाऊन शिऊं देत नाहींत. याप्रमाणें पूर्वी पुराणांत वर्णन केलेल्या कांहीं गोष्टींचें प्रत्यंतर मिळालें ह्मणजे मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन परमेश्वराच्या लीलेचा चमत्कार वाटतो.

या क्षेत्रांत महाबळेश्वरच्या देवळाजवळ दुसरें एक फक्त नद्यांचें देऊळ आहे. परंतु त्या देवळांस तीर्थ-समुदायवाचक नांव न देतां फक्त सर्वांत श्रेष्ठ मानलेली कृष्णानदी इचेंच नांव देण्यांत आलें आहे. या देवळांत

डोंगराकडील बाजूस एक मोठी दगडी भिंत बांधून तीमध्यें जमिनीचे फरशीसरपट सुमारें एक फूट उंचीच्या तीन तीन फुटावर कमानी केल्या आहेत. त्या कमानी समोरच्या भिंतींत पांच आहेत व एक डावे हातचे भिंतींत व दुसरी उजवे हातचे भिंतींत अशा सात ठिकाणांतून सात नद्यांचे ओघ बांधून पुढें एकवटून सर्वांचा संगम झालेला आहे आणि तें पाणी एका दगडी बांधलेल्या पन्हळांतून आणून गोमुखानें कुंडांत सोडलें आहे. त्या कुंडास ब्रह्मकुंड अशी संज्ञा दिली आहे. या संगमांत स्नान करण्याचा योग आला असतां लोक भाग्योदय मानतात. परंतु हें पाणी उन्हाळ्यांत सुद्धां फार गार असते आणि हिवाळ्यांत यांत बोट घातलें तर जरी गळून पडलें नाहीं तरी बधिर झाल्या. वांचून राहणार नाहीं. याचे खालचे बाजूस दुसरें एक कुंड आहे त्यास विष्णुकुंड असें ह्मणतात. यांत सात नद्यांपैकीं पहाणाराच समोरच्या भिंतींतील कृष्णा, वेण्या, कोयना, गायित्री आणि सावित्री या पांच नद्यांचे पाण्यास बारा महिने खळ पडत नाहीं. डावे हातची जी

ओरी आहे तींतून भागीरथी नदी बारा वर्षांनीं कन्या राशीस गुरू आला ह्मणजे कन्यागतीं वाहूं लागते, अशी आख्यायिका आहे. त्या वेळेस येथें वर्षभर यात्रेकऱ्यांच्य उड्यावर उड्या पडतात. आणि हिंदुधर्माप्रमाणें काशीस भागीरथीतटाकीं जे विधी, मुंडण वगैरे करणें इष्ट आहे ते येथें येऊन करितात. उजवे बाजूचे ओरींतून साठ वर्षांनीं कपिलाषष्ठीचा योग आला म्हणजे सरस्वती नदी वाहूं लागते, तेव्हांही मोठी गर्दी होते. असें पुराणांतून या नद्यांचें माहात्म्य वर्णन केलें आहे. परंतु पावसाळ्यामध्यें या सर्व ओऱ्यांतून पाणी मोठ्या जोरानें वाहतें, आणि कुंडें अगदीं तुडुंब भरून जातात आणि वाहूं लागतात. अशा वेळीं यांचें सांडपाणी जाण्यास मार्ग खालून केला असल्यामुळें त्यांतून जातें.

या पांची नद्या महाबळेश्वर डोंगराखालीं निरनिराळ्या दऱ्यांतून वाहत गेल्या आहेत. कृष्णा नदीवर सांगितलेल्या देवळापासून सुमारें ९०० यार्ड अंतरावर कड्यावरून खालीं जोर खोऱ्यांत पडून पूर्ववाहिनी झाली आहे. ती जोर, धोम, वांई वगैरे गांवांशेजारून वाहत जात आहे.

इच्या प्रवाहाची लांबी ८०० मैल असून ती मच्छलीपट्टण जवळ समुद्रास दोन मुखानें मिळाली आहे. गोदावरी व कावेरी या मोठ मोठ्या नद्यांच्या पात्रांपेक्षां इचें पात्र फार मोठें आहे. सातारा जिल्ह्याच्या पलीकडील प्रदेशांत इच्या प्रवाहांतून नांवा व बोटी चालतात. कृष्णाकांठच्या जमिनी, पुरांत बुडाल्यानंतर त्यांजवर गाळ बसल्यामुळें व इतर अशाच कारणांनीं, कित्येकवेळां पाऊस कमी पडला तरी, चांगल्या पिकतात. ही नदी मोठी पवित्र मानली असून इचे कांठीं पुण्यक्षेत्रें पुष्कळ असून मुक्ति देणारीं आहेत. वेण्या नदी महारानजीकच्या सरोवराचे वरील अंगास उगम पावून वेण्या तलावांतून लिंगमळ्यावरून खालीं केडंब खोऱ्यांत पडते; आणि मेढें वगैरे गांवावरून वाहत जाऊन साताऱ्यानजीक माहुली गांवीं कृष्णा नदीस मिळते. कोयना नदी येथून सुमारें एक मैलावर प्रगट होऊन एलफिन्स्टन व लाडविकपाइंटच्या चोळांतून दऱ्याखोऱ्यांत पडून दक्षिणेस वाहूं लागते. ही पुढें प्रतापगड, पार वगैरे गांवावरून वाहत जाऊन सातार जिल्ह्यांतील कऱ्हाड गांवीं कृष्णेस मिळाली

आहे. तेथें तें ठिकाण फार पाहण्यासारखें आहे. या संगमास प्रीतिसंगम असें नांव पडलें आहे. सावित्री नदी कृष्णाबाईचे देवळापासून पश्चिमेस ब्रह्मारण्यांतील कडयांत प्रगट होऊन ती पश्चिमवाहिनी झाली आहे आणि वाहत वाहत महाड दासगांव वगैरे गांवावरून जाऊन बाणकोटाजवळ समुद्रास मिळाली आहे. गायित्री नदीचा मात्र येथें कोठेंही प्रवाह वाहत असल्याचें दिसत नाहीं. ती येथें गुप्त होऊन कोंकणांत हरिहरक्षेत्रीं प्रगट झाली आहे आणि लागलींच समुद्रास मिळाली आहे, अशी आख्यायिका आहे. याशिवाय आणखी एक वेदगंगा नांवाची नदी आहे. ती महाबळेश्वर गांवचे उत्तर बाजूस ह्मणजे सावित्री व कृष्णा या दोन नद्यांच्यामधील खोऱ्यांत उत्पन्न होऊन पुढें दक्षिणवाहिनी होऊन पूर्वेस जोर गांवानजिक कृष्णेस मिळते. ती ब्रह्मारण्यांतील ब्रह्मदेवाचे यज्ञाचे वेळीं वेदास शाप झाल्यामुळें उत्पन्न झाली आहे. या नदीचे उगमस्थानाचे ठिकाणीं कोरीव गुहा आहेत. त्यांत चार पांच मनुष्यें बसण्याजोगी जागा आहे. हें ठिकाण अगदीं निबिड अरण्यांत असल्यामुळें तपस्वी

ऋषींनां राहण्यास अगदीं योग्य आहे. यावरून पूर्वीं येथें कोणी तरी तप करणारा ईश्वरी अंश येऊन राहिला असावा असें अनुमान करण्यास हरकत दिसत नाहीं. उगमस्थान पाहण्यायोग्य आहे.

---

## ब्रह्मारण्य.

महाबळेश्वरच्या पश्चिमेस देवळापासून तीन चार मैलावर एक विस्तीर्ण झाडी आहे. तिला ब्रह्मारण्य असें म्हणतात. असें नांव देण्याचें कारण, इतकेंच आहे कीं, या ठिकाणीं ब्रह्मा, विष्णु महेश यांनीं, पूर्वीं वर्णन केल्याप्रमाणें यज्ञ केला त्यावेळीं मुख्य अध्वर्यु जो ब्रह्मदेव त्याचे आपले पत्नी बरोबर भांडण होऊन चिरकाल आठवण राहण्याजोगे अनर्थापात झाले म्हणून ब्रह्मदेवाचें नांव यास मिळालें.

हें ब्रह्मारण्य खरोखरीच फार पाहण्यासारखें ठिकाण आहे. महाबळेश्वरावरील इतर ठिकाणच्या देखाव्यांपेक्षां येथील देखावा फारच भव्य आहे. विशेषें-करून रस्त्यानें न जातां पाऊल वाटेनें जो कोणी जाईल,

त्यास याची चांगलीच प्रतीति येईल. रस्त्यानें जाणारास एलफिन्सटन पाइंटाकडे व आर्थर सीटकडे जाण्याचे जेथून रस्ते फुटतात, तेथून आर्थर सीटकडील बाजूस वळलें असतां भरदुपारीं भीति वाटून त्याच्या अंगावर कांटा उभा राहतो. तसा प्रकार महाबळेश्वर सोडून जेथून हे दोन रस्ते फुटतात त्या फूट वाटेला मिळेपर्यंत झाडी ठेंगणी असून पातळ असल्या कारणानें बहुतेक होत नाहीं. तथापि सर्व जंगल एकसारखें लागून जाऊन निर्जन असल्यामुळें भटकणारीं हिंसक जनावरें खाद्य मिळविण्याकरितां बाहेर आलेलीं कधीं कधीं दृष्टीस पडतात. सावित्रीच्या उगमाची जागा पाहण्यास जाण्याची जी जंगलांतून लहान वाट, आरथर सीटकडे जातांनां डावे हातास लागते, तिचे समोरचे बाजूस उजवे हातास तशीच लहान पाऊलवाट केली आहे, त्यास भांगा असें म्हणतात. या वाटेस भांगा असें नांव पडण्याचें कारण असें आहे कीं, ही वाट जंगलांत स्त्रियांच्या केंसाच्या भांगासारखा भांग काढल्याप्रमाणें आहे. या वाटेवरील उंच उंच वृक्षांवर पांच

सहा ठिकाणीं शिकारी लोकांना बसण्याकरितां माळे बांधले आहेत या माळ्यावर टपून बसून येथें शिकारी लोक शिकार करितात. परंतु शिकारी प्राणी भुलवून आणण्याकरितां त्यांस या ठिकाणीं रेडा किंवा बकरें, किंवा दुसरें कांहीं जनावर एक दोन दिवस बांधून ठेवावें लागतें. पुढें तें जनावर बहुतकरून एक दोन दिवसांच्या आंत त्यांच्या भक्ष्यस्थानीं पडलेलें समजतांच हे शिकारी लोक चार पांच बंदुकीनें नेम मारणारे तरबेज लोक बरोबर घेऊन या माळ्यावर लपून बसतात आणि चटावलेलें हिंसक श्वापद येऊन तें बांधलेलें जनावर खाऊं लागलें, म्हणजे त्याजवर बंदुका झाडतात. या श्वापदांची अशी खोड आहे कीं तें बांधलेलें जनावर एकदम खाऊन मोकळें होत नाहीं. येऊन जाऊन रोज थोडथोडें असें खाऊन त्याचा फन्ना पाडतें. अशा या डाव्या उजव्या बाजूच्या झाडींत डोकावून पाहिलें, तर कोठें बैलाची तंगडी तर कोठें रेड्याचा पाय, असल्या विलक्षण चिजा कधीं कधीं दृष्टीस पड-लात; रस्त्यावरील धुळींत वाघाच्या पंजांचे किंवा

सांबरांच्या खुरांचे स्पष्ट उमटलेले माग व याच जनावरांची ठिकठिकाणीं पडलेली विष्टा हीं सहज जातां जातां नजरेस येतात; तेव्हां पोटांत अगदीं धस्स होऊन जाऊन पांचावर धारण बसते. पाऊलवाटेनें जाणारास या ब्रह्मारण्यांत यज्ञसमयाचे वेळीं राहण्याकरितां केलेली एक गुहा आहे ती पाहण्यास मिळते. ही चार पांच माणसें बसण्यासारखी मोठी आहे. यज्ञस्थंडिलाची जागा व सावित्रीनें संतापानें आपला कडेलोट करून घेतलेला कडा हीं अगदीं एकमेकाला लागूनच असलेलीं आर्थरसीटकडे जातांना डावे हातास लागतात. यावरून यज्ञाचेवेळीं सावित्रीची व देवाची चकमक उडाली ह्मणून जी हकीकत आहे तिचा मेळ जमतो. हीं स्थळें पाहण्यास जातांना दाट झाडींतून जावें लागतें. या झाडींत दोन प्रहरींसुद्धां सूर्याचें लंबायमान किरण आंत शिरकूं शकत नाहींत. या यज्ञस्थंडिलाची जागा अद्यापि ओळखून पाहण्याची कोणाही हिंदुगृहस्थास इच्छा झाल्याशिवाय राहत नाहीं. ती पाहणारे लोकांस येवढीच सूचना आहे, कीं हा यज्ञ होऊन हजारों

वर्षे झालीं असल्यामुळें पावसाच्या पाण्याच्या मोठ-मोठ्या लोंढ्यांबरोबर उंच प्रदेशांतील गाळ वाहत येऊन त्याचा यज्ञकुंडावर लेप (खपली) बसल्यासारखा झाल्या-कारणानें यज्ञकुंडाचें भस्म वरील माती उकरून मग काढून पहावें लागतें व तें भस्माप्रमाणें पांढरें असून हातावर पाणी घेऊन चोळून पाहिलें असतां स्निग्ध आहे असें वाटतें. या ब्रह्मारण्यांत चतुष्पाद हिंसक श्वापदाप्रमाणेंच पोटानें चालणारे फार विषारी सर्प जिकडे तिकडे दृष्टीस पडतात. पूर्वी एकदां या ब्रह्मारण्यांतील वाळलेल्या गवतास वणवा लागला होता तेव्हां सर्पांचीं भेंडुळीं मरून पडलेलीं पुष्कळच पाहण्यांत आलीं होतीं. सकाळीं व सायंकाळीं या विषारी जिवांच्या बिळाबाहेर पडण्याच्या समयास अन-वाणी फिरणें फार धोक्याचें आहे.

या ब्रह्मारण्यांत एकटें दुकटें पाहण्याकरितां जाण्याचें फार कठीण काम आहे. मंडळींबरोबर जाण्यांत इतकी भीति वाटत नाहीं. साहेब लोक तर हातांत बंदुका घेतल्याशिवाय तिकडे फिरावयास जात नाहींत. या ब्रह्मारण्यांत अगदीं उत्तर बाजूस एक

आर्थरसीट ह्मणून फार प्रेक्षणीय जागा आहे तिचें वर्णन पुढें आलें आहे. ती पाहण्यास जाण्याचा रस्ता या ब्रह्मारण्यांतून गाडी जाणे सारखा केलेला आहे तरी तो रस्ता, जागा डोंगराळ असल्यामुळें फार चढउताराचा आहे. या ब्रह्मारण्यांतून माल्कमपेठेकडे दृष्टि फेंकिली असतां लांबपर्यंत हिरव्या रंगानें मढविल्या-सारखी जमीन दिसते.

---

## महाबळेश्वरगांव.

या क्षेत्रांत ब्राह्मण, कुणबी, कोळी, धनगर, वगैरे लोकांचीं मिळून घरें सुमारें ९० आहेत, त्यांत नुसतीं ब्राह्मणांचीं घरें ३२ आहेत. या गांवांत ब्राह्मणांची वस्ती जशी ज्यास्त आहे, तशी दुसऱ्या जवळपासच्या मैलांतील कोणत्याही खेड्यांत सांपडणें कठीण. हे बहुतेक सर्व ब्राह्मण भिक्षुकीचा धंदा करून पोट भर-णारे आहेत. भिक्षुकीशिवाय व्यापार किंवा उत्पन्न असणारे लोक सुमारें आठ किंवा दहा असामींपेक्षां ज्यास्त नाहींत. बाकी राहिलेल्या कुटुंबांचा निर्वाह

नुसते भिक्षुकीवर चालतो. येथील सर्व ब्राह्मण मंडळी एक गोत्री असल्यामुळें, एकमेकांचा गांवचे मिळकतींत फायदा होण्याचा संभव नाहीं. तेव्हां यांचा आणि गावांतील दुसऱ्या १०,१२ गुरव कुटुंबांचा निर्वाह दवांच्या यात्रेकऱ्यांकडून होणाऱ्या मिळकतीवर अवलंबून आहे हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. या करितां या देवळासंबधीं विशेष माहिती देणें अवश्य वाटल्यावरून त्याबद्दल वर्णन पुढें दिलें आहे.

या क्षेत्रांत महाबळेश्वर, अतिबळेश्वर, कोटेश्वर व कृष्णाबाई यांचीं देवळें फार जुनाट आणि काळ्या दगडांनीं बांधलेलीं आहेत. हीं बांधून निदान ५०० वर्षांवर वर्षें झालीं असावीं असें अनुमान केलें आहे. तथापि त्यांस अद्याप पावेतों मुळींच भंग नाहीं. ह्या जुन्या देवळांची दुरुस्ती सुमारें २०० वर्षांमागें साताराचे परशराम नारायण अनगळ यांनीं केली होती. या शिवाय सन १८७९ सालीं श्रीमंत जमखिंडीकर साहेब यांनीं १५००० रु. खर्च करून कृष्णाबाईचे देवळास पत्रा घातला आणि जीर्णोद्धार केला.

कृष्णाबाईचे देवळाच्या पिछाडीस मारुतीचें एक दगडी देऊळ बांधलेलें आहे. हा मारुती श्री रामदास स्वामींनीं स्थापन केलेला आहे असें श्रींचे चरित्रावरून समजतें. त्यांत असें लिहिलें आहे कीं रामदास स्वामी शके १५५६ तारणनाम संवत्सरे या सालांत वैशाख मासीं कृष्णास्नानाकरितां महाबळेश्वरीं राहिले होते. त्यावेळीं ग्रामस्थ मंडळी त्यांचे पूर्णभक्त बनल्यामुळें त्यांची निरंतर सेवा आपले हातून व्हावी ह्मणून त्यांनीं स्वामींस विनंती केली. तेव्हां जातेवेळीं स्वामींनीं मंडळीच्या आग्रहास्तव या मारुतीची स्थापना करून त्याची सेवा करून राहणे-बद्दल त्यांस अनुग्रह दिला. श्रीकृष्णाबाईचे देवळानजिक प्रसिद्ध अहिल्याबाई होळकरीण हिनेंही एक उत्तम देवा-लय बांधून ठेविलें आहे व त्यांस उत्पन्नही करून दिलें आहे. त्यास रुद्रेश्वर असें ह्मणतात. याशिवाय येथें तीर्थें आहेत, तीं रुद्रतीर्थ, चक्रतीर्थ, हंसतीर्थ, पितृमुक्ततीर्थ अरण्यतीर्थ, मलापकर्षतीर्थ, वगैरे पाहून ही करवीर किंवा काशीक्षेत्राच्या तोडीची पुण्यभूमिका आहे अशी खात्री होते. हल्लीं ह्यांत शेवाळ व झाडाचा पाला पडून हीं

अस्वच्छ झालीं आहेत. येथें उतारू लोकांच्या सोयींसाठीं कोल्हापूर संस्थानचे माजी कारभारी कै. महादेव वासुदेव बर्वे यांनीं कृष्णाबाईचे देवळानजीक एक मोठी धर्मशाळेची इमारत सन १८८७।८८ सालीं बांधून ठेविली आहे. तिचे कांहीं भागांत येथील सरकारी शाळा असते त्यामुळें कित्येक प्रसंगीं उतारू लोकांची मोठी अडचण होते. याकडे सरकारचें लक्ष्य जाऊन येथें शाळेकरितां सरकारी इमारत झाल्यास उतारू लोकांवर फार उपकार होतील.

येथील कृष्णाबाईचें देऊळ वाड्याचे चौकाप्रमाणें बांधलेलें आहे. त्याचे चोहोंबाजूस जे चार सोपे आहेत, त्यालाच खण पाडलेले असून प्रत्येक खणाला कमानी केल्या आहेत. यांतील नद्यांच्या उगमाची बाजू बाकीचे बाजूंपेक्षां उंच आहे. या शिवाय सर्व बाजूंच्या सोप्यांना फक्त सुमारें २ फूट उंचीचें जोतें आहे. हें सर्व काम घडीव काळ्या दगडांचें केलेलें आहे. मधील चौकाचा भाग प्रशस्त आहे, यामुळें हें देऊळ एकाद्या सभामंडपाप्रमाणें लांबट झालें आहे. यांतील गायमुखाशेजारचें कुंड सुमारें ६ फूट खोल आहे, त्यास खालीं उतरण्यास

पायऱ्या केल्या आहेत आणि तळास फरशी केली आहे. यांत ब्राह्मण व शूद्र लोकांस मात्र स्नान करण्यास हरकत नसते. यापेक्षां कनिष्ठ जातींच्या लोकांस आंत येऊं देत नाहींत. त्यास बाहेर नेऊन पाणी घालतात. याचे शेजारीं दुसरें एक विष्णुकुंड आहे. या देवळामध्यें कृष्णाबाईचा उत्सव फाल्गुन वद्यांत दरसाल होतो व तो पांच दिवस चालतो. दररोज पुराण आणि कीर्तनही त्या प्रीत्यर्थ होत असतात. त्याकरितां जावली, वांईकडील ब्राह्मण वगैरे लोक येतात. याचे ब्राह्मणभोजन पांच दिवस होतें. या उत्सवास उत्पन्न सुमारें नव्वद रुपयांचें आहे. पैकीं १६ रुपये श्रीमंत पंतसाहेब संस्थान भोर यांजकडून मिळतात व श्रीमंत प्रतिनिधीसाहेब यांनीं येथील ब्राह्मणांस खरशीगांवचें अग्राहार उत्पन्न रुपये ७४चें दिलें, तें त्यांनीं भाऊबंदकीचे पुष्कळ हिस्सेदार असल्यानें त्यापासून विशेष फायदा होणार नाहीं, असें जाणून श्रीकृष्णाबाईचे उत्सवास मोठ्या औदार्यानें लावून दिलें आहे. यांतून खर्च भागत नसल्यामुळें लोकांवर पट्टी बसवून उत्सवाचे बेगमीची तयारी

करितात. एकंदर २५० पासून ३०० रुपयेपावेतों खर्च होतो. शिवाजीमहाराजांनीं महाबळेश्वरासारखें कृष्णाबाईस उत्पन्न कां दिलें नाहीं तें समजत नाहीं. या कृष्णाबाईचे देवालयांत मुख्य गंगेच्या बाजूकडील भागांत कोळी लोकांकडे झाडलोट करण्याचें काम असतें. कृष्णाबाईचे कुंडांत जे कोणी यात्रेकरी धर्मादाय पैसा टाकतील तो या कोळ्यांस मिळतो. तसेंच कृष्णाबाईस कोणी नैवेद्य आणिला, तरी तो सुद्धां त्यांस मिळतो; अशी दुसरीकडे कोठेंही कोणतेही देवस्थानांत वहिवाट नाहीं. येथें कोळी लोकांचीं घरें ८।१० आहेत.

येथें दुसरें महाबळेश्वराचें देऊळ आहे, त्याचें सर्व काम काळ्या दगडाचें आहे. यांत दोन भाग आहेत. त्यांपैकीं आंतील गाभाऱ्यांत महाबळेश्वराचें मोठें थोरलें आणि रुद्राक्षाकृती असें स्वयंभू लिंग आहे. याचेवर पांच ठिकाणीं पांच खळगे आहेत, ते नेहमीं पाण्यानें भरलेले असतात. या पांच खळग्यांतून असणाऱ्या कृष्णा, वेण्या, कोयना, गायत्री, आणि सावित्री ह्याच पांच नद्या आहेत. पूर्वीं एका दीर्घ शंकेखोर मनुष्यानें ह्या पांच खळग्यांतील

पाणी भिक्षुकांनीं उगीच वरून घालून ठेवून धार्मिक लोकांस भाळण्याचें कौसल केलें आहे, अशी कुशंका काढून, त्यांतील पाणी चिरगुटानें वरचेवर पुसून काढण्याचा उपक्रम आरंभिला. बरेच-वेळ पाणी पुसून काढलें पण ते खळगे कोरडे तर झाले नाहींतच. परंतु त्यांतून शेवटीं रक्त येऊं लागलें, अशी आख्यायिका आहे. हें कोणास खरें वाटत नसलें, तरी त्यांतील पाणी आटत नाहीं, ही गोष्ट मात्र खरी आहे. याकरितां देवाला पूजा बांधतांना जीं वस्त्रें वगैरे घालावीं लागतात तीं भिजून जाऊन खराब होऊं नयेत म्हणून खळग्यावर घालण्यासाठीं तांब्याचीं झांकणें केलेलीं आहेत तीं त्यावर घालून ठेवितात. हल्लीं देवाजवळ अहोरात्र नंदादीप जळत असतात. त्यांपैकीं एक पेशवाईतील शूर सरदार बापू गोखले यांजकडून चाललेला आहे. त्याचे खर्चाची रक्कम इंग्रज सरकारचे खजिन्यांतून मिळते. व दुसरा वाठारचे सोनी यांनीं ठेविला आहे. यासही सुमारें ५० वर्षें झालीं आहेत. देवळाच्या आंत बाहेरून उजेड पडण्यास कांहीं

जाळी वगैरे नसल्यामुळें सर्वकाळ अंधार असतो; त्यामुळें या नंदादीपांचा चांगला उपयोग होतो. गाभाऱ्याच्या बाहेरील अंगास शेजघर असून त्या ठिकाणीं काळभैरवाचें स्थान आहे, तेथें दर-रोज बहुतकरून पुराण वगैरे चालतें; याचे पलीकडे एका मोठा काळे पाषाणाचा नंदी करून बसविलेला आहे. त्यावरील सभामंडप तांबडे दगडाचा बांधलेला आहे. यावरून तो मात्र अलीकडे केला असावा असें दिसतें. या नंदीचा डावा कान फोडलेला आहे. त्याची हकीकत अशी सांगतात कीं, अवरंगजेब दिल्लीचे मोंगल बादशाहा याचेवेळीं हिंदूंचीं सर्व देवळें फोडून देवांच्या मूर्ती वगैरे नाहिंशा कराव्या, हिंदूंचे मुसलमान करावे, वगैरे प्रकार चोहोंकडे चालला होता, ती मूर्तिभंगाची लाट महाबळेश्वरापर्यंत येऊन पोंचली होती. तेव्हां एके वेळीं मोंगल देवळांत शिरले आणि त्यांनीं प्रथम नंदीवर प्रहार करून त्याचा कान तोडला. इतकें होतांच देवळांतून मोठमोठे भुंगे निघून, त्यांच्या मागें लागले आणि त्यांस त्यांनीं पुरे पुरे करून सोडिलें. हें पाहून या देवताबद्दल त्यांच्या मनामध्यें

पूज्यबुद्धि उत्पन्न झाली आणि त्यांनीं या देवास हल्लीं जें उत्पन्न चालू आहे तें करून दिलें. पुढें मराठी राज्य झाल्यावर त्या मराठी राजांनींही हें उत्पन्न तसेंच चालविलें. हल्लीं या देवळांत पलंग व सताल ( मुसलमानी घाटाचें भांडें ) या मोंगलाकडून मिळालेल्या देणग्या आहेत. या सर्व गोष्टींवरून असें होतें कीं हे महाबळेश्वरचें देऊळ मोगलाईचे कारकीर्दीचे अगोदरपासून आहे तसेंच आहे. आणि हें दैवत इतकें जागृत आहे कीं मोंगलासारख्या हिंदुधर्मद्वेष्ट्या बादशाहांनींसुद्धां यास पूज्य मानून उत्पन्न करून दिलें आहे. येथें श्री रामदासस्वामींनीं स्थापन केलेल्या मारुतीसही छत्रपती शिवाजी यांनीं दरसाल २१ रुपयांचें उत्पन्न करून दिलें आहे.

या क्षेत्राचें शिवार पुष्कळ विस्तृत आहे. यांतील बहुतेक जमिनींत जरी पिकें वगैरे फारशीं येत नाहींत, तरी त्यांतील जंगलाचें उत्पन्न देवास येतें. या जमिनी छत्रपति शिवाजी महाराज यांनीं या देवाला इनाम दिल्या आहेत. या शिवाय इनाम गावें हीं देवाकडे पुरातनचींच आहेत. या सर्व जमिनींचा

वसूल व फारेष्ट खात्यांत ज्या देवाच्या जमिनी भाड्या-नें घेतल्या आहेत, त्यांचें उत्पन्न मिळून एकंदर दोन अडीच हजार रुपयांचें आहे. हें एक लहानसें स्वतंत्र संस्थान आहे. याची वहिवाट पिंगळे आडनांवाचे वंशाकडे आहे. या संस्थानचे नोकर लोक सर्व गुरव आहेत. रोजची पूजा नैवेद्य व चौघडा वाजविणें वगैरे सर्व कामें त्यांजकडूनच होतात. त्यांची येथें सुमारें १२ घरें आहेत. त्यांत पाळीपाळीनें हें काम जातें. यावर देखरेख ठेविण्याकरितां एक कारकून ठेविलेला आहे. या देवास रोजचा अभिषेक आहे त्याबद्दल ब्राह्मणास वर्षाचें वेतन ठरविलेलें आहे.

देवाचा मुख्य उत्सव माघ वद्य १४ पासून फाल्गुन शुद्ध ३ पावेतों पांच दिवस होतो. या उत्सवांत दररोज कीर्तन असून प्रयोजन मात्र एकच दिवस होतें त्यांत सर्व जातीच्या लोकांचें मिळून सुमारें ३००।४०० पान होतें. या उत्सवास बाहेरील लोकही येतात. उत्सवाचा खर्च सुमारें २५० रुपये पावेतों होतो.

याच देवळांत आश्विन महिन्यांत नऊ दिवस शारदानवरात्राचाही उत्सव होतो. तेव्हांही सर्व व्यवस्था वरील उत्सवाप्रमाणेंच होते. परंतु सुमारें १०० रुपये खर्चास पुरतात. याप्रमाणें दरसाल १२०० रुपये खर्च होऊन बाकीचें उत्पन्न शिल्लक राहतें.

याशिवाय येथें एक कमलजा नामक श्री देवीचें देऊळ आहे. याची अशी गोष्ट आहे कीं, या डोंगराचे पूर्वेच्या बाजूस जोर खोरें आहे त्यांतील वेदगंगा इचे तीरास घोर जंगलांत हिचें मूळपीठ आहे. तेथें कोळी वगैरे लोक जाऊन तिची फार उपासना करीत असत. हें पाहून हे कोळी लोक आपल्यास अनुकूळ होण्या करितां येथें कोणी चंद्रराव मोरे म्हणून विजापूर बादशाहाचा सरदार छत्रपति शिवाजीचे पूर्वी येऊन राहिलेला होता, त्यानें या देवीचे स्थानास वरेंच महत्त्व आणिलें. हा मोरे विजापूर बादशहाच्या पदरचा म्हणून म्हणवीत असे.परंतु तो त्याला भीक घालीत नव्हता.त्याचा वाडा जवळच जावली गांवांत होता तो वाडा शिवाजीनें, हा मोरे मराठा असून मोंगलाच्या ओंजळीनें पाणी पिणारा आहे असें पाहिल्यावर, पाडून जमीनदोस्त केला

आणि त्याचा मालमसाला प्रतापगडच्या किल्ल्यावर नेऊन तटाचे कामीं लावला. पुढें मोरे याचा स्वतःचाही युक्तीनें निकाल लावल्यावर दुसरा माणिकचौकाचा वाडा जोर गांवांत असलेला पाडून नाहींसा केला. त्याच्या भिंतीच्या खुणा अद्यापि येथें आहेत. पुढें महाबळेश्वर येथील ब्राह्मण लोकांस देवीचा कांहीं दृष्टांत होऊन गूण आल्यावर त्यांनीं या ठिकाणीं हें तिचें देऊळ बांधिलें आणि तेव्हांपासून ही देवी येथील सर्व महाबळेश्वरकरांचें कुलदैवत होऊन राहिली आहे. याशिवाय या क्षेत्रीं तीर्थें व कुंडेंही बरींच आहेत.

या क्षेत्राचे ठिकाणीं नेहमीं कोणीना कोणीतरी कृष्णा-स्नान किंवा वंदन करण्यास येतच असतात. त्यामुळें त्यांचेकडून तेथील भिक्षुक ब्राह्मण लोकांस फायदा होतो. अलीकडे या क्षेत्रापासून सुमारें २ मैलांवर नहर उर्फ मालकमपेठ हें हवा खाण्याचें ठिकाण पहिले प्रतीचें झाल्यामुळें तर चोहोंकडून तेथें हवेक-रितां येणारे पुष्कळ श्रीमंत हिंदुलोक येथें येऊन ब्राह्मणभोजन, गंगास्नान, पूजन वगैरे करितात. त्यामुळें यांस रोजची नवी प्राप्ति आहे. येथील सर्व

ब्राह्मण क्षेत्रोपाध्ये आहेत. हा त्यांचा मुख्य धंदा असोन वृत्तीचा असल्यामुळें वंशपरंपरेनें चालला आहे. कांहींस कुलकर्णीपणाचे व देशपांडेपणाचे हक्क आहेत. यात्रे कऱ्यांकडून आपल्यास उपाध्या केल्याबद्दलचा लेख लिहून घेण्याची यांची वहिवाट आहे. असे लिहून घेतलेले लेख सुमारें ४०० वर्षांचे यांजपाशीं आहेत.

---

# देखावे.

महाबळेश्वर क्षेत्र सोडून महाबळेश्वर किंवा मालकमपेठेकडे येऊं. नहर ऊर्फ हवाखाण्याचें महाबळेश्वर हें क्षेत्रापासून सुमोरें ३ मैलावर आहे व हल्लीं हें हवापाण्यासंबंधानें फार प्रसिद्धीस आलें आहे, असें पूर्वीं सांगितलेंच आहे. क्षेत्राच्या बाहेर पडतांच जिकडें पहावें तिकडें डोंगर व झाडें यांशिवाय कांहींच दिसत नाहीं. उजवे हातास कोंकण प्रांतांतील अनेक डोंगरांच्या रांगा नाटकगृहांतील प्रेक्षकांकरितां केलेल्या जागाप्रमाणें दिसूं लागतात. पहिल्यानें खुर्च्यांच्या रांगाप्रमाणें लहान लहान डोंगरांच्या रांगा झाल्यावर पलीकडे प्रतापगड व सॅडल बॅक हिलचे डोंगर हे नाटकगृहांतील ग्यालरी सीटसप्रमाणें ऊंच दिसतात. सावित्री नदीचें पाणी प्रतापगडाचें पायथ्याजवळून वाहत चाललेलें दिसतें, त्याचीं वळणें रुप्यासारखीं स्वच्छ पांढरीं दिसून जणूं कांहीं रुपेरी सापच पसरला आहे कीं काय असें वाटतें. उन्हाचेवेळीं टेंकडयां-

चा रंग अगदीं जांभळा दिसतो तो झाडांच्या गालीच्यास फार शोभाप्रद होतो. या टेकडयांचीं शिखरें एका उंचीचीं व इतकीं जवळ जवळ दिसतात कीं एका टेंकडीवरून दुसरीवर, दुसरीवरून तिसरीवर जाणेस दोन तीन ढांगेचें काम आहे असा भास होतो ! आपले समोर पूर्वेकडे पाहिलें ह्मणजे एखाद्या बागेंतील सुरूचा ताटवा छाटून सारखा केल्याप्रमाणें सर्व झाडी कोणी करून ठेविली आहे कीं काय असें दिसतें. लहान झाडें व मोठे वृक्ष यांतील भेद तर मुळींच नजरेत येत नाहीं. असा हिरवागार गालिच्या जमिनीवरून चढतां चढतां आकाशापर्यंत जाऊन अधांतरी कसा राहिला आहे हें समजण्याचें मोठें गूढ पडतें. झाडांचीं निरनिराळ्या प्रकारचीं पानें वरून एक सारखीं दिसतात. तेव्हां त्या कारागिराची असा चित्र विचित्र आकृतीचा गालिच्या काढण्यांत किती कुशलता असेल, असें वाटून मन अगदीं थक्क होऊन जातें; पुढें पुढें गेलेवर मागें पाहिलें आणि पुढें पाहिलें तर नुसती दाट झाडी दिसते, यांतून पुढें जाण्यास वाट तरी असेल किंवा नाहीं याचीही शंकाच येते. मधून

मधून ठिकठिकाणीं पांढरे ठिपके दिसतात त्याठिकाणीं आकाश खालीं उतरलें आहे कीं काय असा भास होतो. परंतु हे पांढरे ठिपके ह्मणजे येथील पत्र्याचीं घरें आहेत. एकंदरींत महाबळेश्वरास पाहिजे त्या ऋतूंत जा, तें स्थान आपलें सदा रमणीय आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण छत्र्यांवर पावसाळा काढणाऱ्या घांठावरील लोकांनीं पावसाळ्यांत येथें येण्याचें धाडस करूं नये. महाबळेश्वरीं पाहण्यासारखी सारी मौज जो कोणी आक्टोबरच्या प्रारंभापासून जूनच्या मध्यापर्यंत आठ साडे आठ महिने येथें येऊन राहील त्याला दिसेल.

विशेषतः आक्टोबर महिन्यांत सह्याद्रीचा हा बाहू फारच रमणीय दिसतो. या महिन्यांत या पर्वतावरील सारी सपाट जागा हिरव्यागार गवतानें किंवा नानाप्रकारच्या रान फुलांनीं आच्छादून गेलेली असते. जिकडें पहावें तिकडें गुलाबांचे झुबके सर्व कुंपणावरून भरून गेलेले दिसतात. प्रत्येक कड्यावरून शुभ्र ऐरावताच्या शुंडादंडासारखे स्वच्छोदकाचे प्रवाह खालच्या दऱ्यांत धडाधड उड्या

चेत असल्यामुळें त्यांच्या आघातापासून उत्पन्न हो णारा प्रचंड स्वर कर्णविवरांत एक सारखा भरत असतो व कोठें कोठें गिरणींतील कापसाच्या ढिगा सारखी तुषारांची शोभा दिसत असते; उभ्या पावसा- ळाभर अतोनात पाऊस अंगावर घेऊन शेवाळलेलीं जांभळीचीं व पिशाचीं झाडें, आपले शरीरांत मावेनासें झालेलें पाणी बाहेर टाकीत आहेत कीं काय असें वा- टतें; व त्या पाण्यांत हात घातला तर तत्क्षणीं तो बधिर होईल, व ते तोंडांत घातलें तर अंगावर शाहारे येतील इतकें पाणी गार असतें. असाच प्रकार पावसाळ्यांत जो कोणी पुण्याहून मुंबईस गेला असेल त्यास खंडा- ळ्याचे घाटांत आगगाडींतून जात असतांना चांगला दृष्टीस पडतो. तसेंच वेण्या तलावाचे बाजूस जाऊन पाहिलें, तर, तें सरोवर व त्याचे भोंवतालची गर्द झाडी, हीं इतकीं रमणीय दिसतात कीं तीं पाहिल्यावर पुराणांतरींच्या पंपासरोवराचें स्मरण होतें. नेच्या ( फर्नस ) च्या नुकत्या उगवून आलेल्या झाडांना नुसतीं पानें येऊन वळण आलेलें असतें, तें फारच मौजेचें दिसतें. मैदानावर

बालांकुर येऊन हरित पटल परिधान करून आनंदांत असलेल्या पृथ्वीवरून चालतांना मऊ गालिच्यावरून चालल्याचें सुख अनुभवतोंसें वाटतें. सर्व नदी किनारे व त्यांवरील दगड आणि टेंकडयांवरील कडे गवतानें आणि शेवाळीनें अगदीं हिरवेचार दिसत असतात. नद्यांचें पाणी अगदीं दोन्हीं थडया भरून धांवा घेत असतें.

मार्चपासून पुढें पावसाळा येईपर्यंत फुलें व गवत नाहींशीं होऊन झरे व धबधबे चोहोंकडे शुष्क होऊन जातात. हवेमध्यें धुरानें दाटपणा आल्यामुळें देखावे स्पष्ट दिसत नाहींत व उन्हाच्या कडकपणानेंही एकसारखी नजर लागत नाहीं. तथापि या वेळींही टेंकडया विलक्षण सुंदर दिसतात. सदैव हिरवे जंगलांतील झाडांस पालवी फुटूं लागते आणि रान जिकडें तिकडें टवटवीत दिसतें. मे महिन्याच्या अखेरीस प्रातःकाळीं जमिनीवर धुकें येऊं लागतें त्यावेळीं जिकडे तिकडे आकाशावांचून कांहीं दिसत नाहीं. रस्त्यावरून चार दोन हातावरील माणसांची चाऊल ऐकूं येत नसली तर मनुष्यें आहेत

असें सुद्धां वाटत नाहीं. खोऱ्यांतून धुकें भरून तें जस-
जसें वर येऊं लागतें तसतसें तें पाहून टेंकडयांच्या
शिखरापर्यंत टेंकडयांना रूप्याचा मुलामा दिला आहे
कीं काय असें वाटतें. धुकें जेव्हां दरींतून वर चढूं
लागतें तेव्हां कोणी विशाल प्राण्याचें धूड नाचत
असून भूतचेष्टा चालल्यासारखें दिसते. ऊन पडून
सूर्य वर येऊं लागला ह्मणजे पिंजाऱ्याच्या कापसाप्रमाणें
त्या धुडाची असंख्य शकलें होत जाऊन शेवटीं
कांहींच नाहींसें होतें.

पुढें पावसाळ्यांत घराबाहेर जाण्याची तर
सोयच नाहीं, व घरांत राहण्याचीही सोय
नसते. चार महिने सूर्यदर्शन तर मुळींच होत नाहीं.
पावसाच्या पाण्यानें आकाशाला मोठमोठालीं भोंकें
पडल्यासारखें आकाश गळत असल्यामुळें छत्री किंवा
घोंगडयाची खोळ घेऊन बाहेर पडण्याची गोष्ट तर
मुळींच मनांतसुद्धां येणार नाहीं. बाहेर गेलेंच तर
पानाचीं केलेलीं विरलीं डोकीवर घेऊन गेलें पाहिजे.
तें घेतलें कीं मानेवर कोणी धोंडा ठेविल्यासारखें झा-
ल्यामुळें व चोहोंकडून पावसाचा मार लागत असल्या-

बालांकुर येऊन हरित पटल परिधान करून आनंदांत असलेल्या पृथ्वीवरून चालतांना मऊ गालिच्यावरून चालल्याचें सुख अनुभवतोंसें वाटतें. सर्व नदी किनारे व त्यांवरील दगड आणि टेंकडयांवरील कडे गवतानें आणि शेवाळीनें अगदीं हिरवेचार दिसत असतात. नद्याचें पाणी अगदीं दोन्हीं थडया भरून धांवा घेत असतें.

मार्चपासून पुढें पावसाळा येईपर्यंत फुलें व गवत नाहींशीं होऊन झरे व धबधबे चोहोंकडे शुष्क होऊन जातात. हवेमध्यें धुरानें दाटपणा आल्यामुळें देखावे स्पष्ट दिसत नाहींत व उन्हाच्या कडकपणानेंही एकसारखी नजर लागत नाहीं. तथापि या वेळींही टेंकडया विलक्षण सुंदर दिसतात. सदैव हिरवे जंगलांतील झाडांस पालवी फुटूं लागते आणि रान जिकडें तिकडें टवटवीत दिसतें. मे महिन्याच्या अखेरीस प्रातःकाळीं जमिनीवर धुकें येऊं लागतें त्यावेळीं जिकडे तिकडे आकाशावांचून कांहीं दिसत नाहीं. रस्त्यावरून चार दोन हातावरील माणसांची चाऊल ऐकूं येत नसली तर मनुष्यें आहेत

असें सुद्धां वाटत नाहीं. खोऱ्यांतून धुकें भरून तें जसजसें वर येऊं लागतें तसतसें तें पाहून टेंकड्यांच्या शिखरापर्यंत टेंकड्यांना रूप्याचा मुलामा दिला आहे कीं काय असें वाटतें. धुकें जेव्हां दरींतून वर चढूं लागतें तेव्हां कोणी विशाल प्राण्याचें धूड नाचत असून भूतचेष्टा चालल्यासारखें दिसते. ऊन पडून सूर्य वर येऊं लागला ह्मणजे पिंजाऱ्याच्या कापसाप्रमाणें त्या धुडाची असंख्य शकलें होत जाऊन शेवटीं कांहींच नाहींसें होतें.

पुढें पावसाळ्यांत घराबाहेर जाण्याची तर सोयच नाहीं, व घरांत राहण्याचीही सोय नसते. चार महिने सूर्यदर्शन तर मुळींच होत नाहीं. पावसाच्या पाण्यानें आकाशाला मोठमोठालीं भोंकें पडल्यासारखें आकाश गळत असल्यामुळें छत्री किंवा घोंगड्याची खोळ घेऊन बाहेर पडण्याची गोष्ट तर मुळींच मनांतसुद्धां येणार नाहीं. बाहेर गेलेंच तर पानाचीं केलेलीं विरलीं डोकीवर घेऊन गेलें पाहिजे. तें घेतलें कीं मानेवर कोणी धोंडा ठेविल्यासारखें झाल्यामुळें व चोहोंकडून पावसाचा मार लागत असल्या-

मुळें इकडें तिकडें पाहण्याची फार उपाधी वाटते, आणि योजिलेलें काम करून केव्हां माघारी येऊन निवाऱ्यांत शेंकीत बसेन असें होतें. दिवसा सूर्यप्रकाश नसल्यामुळें १२ तासांची लांबलचक संध्याकाळच झाली आहे असें वाटतें, यामुळें घरांत उजेड कोठून असणार? त्यांतून घराला रेनकोट घातला असल्यामुळें तर घरांत दिवसाची रात्र होते. धुकें तर घरांत शिरण्यास चोहोंकडून वाटा धुंडीत असते आणि झरोक्यांतून शिरकाव होईल तर पहात असतें, यामुळें घरांतील धूर बाहेर जाण्यास अनमान करूं लागतो तेव्हां तो माणसें, त्यांचीं चिरगुटें आणि इमारतीची आंतील बाजू यांना आत्मवत् वर्ण आणून सोडतो. घरांत रात्रंदिवस शेकण्याच्या आगट्या किंवा शेगड्या सर्व माणसें घेऊन बसलेलीं असतात. त्याचा धूर, स्वयंपाकाचा धूर आणि धुकें मिळून माणसांना अगदीं बेजार करितात.

---

# मालकम पेठ ऊर्फ नहर.

स्वदेश सोडून परदेशवास करणें कोणास प्रिय आहे? परंतु तोही कालमानानें करावा लागतो, व अशा अवस्थेंत होईल तितकें करून परदेशांत राहिल्याचा भास न होईल अशी व्यवस्था करण्याची परकीयांस उत्कट इच्छा असते, आणि ती पूर्ण करण्यास लोभी, कष्टाळू आणि साहसी मनुष्य जिवापाड मेहनत केल्यावांचून राहत नाहीं. हें पुढील **मालकम** पेटशोधनाच्या हकिकतीवरून दिसून येईल.

पहिल्यानें सन १८२४ मध्यें जनरल **लाडविक** साहेब **सातारच्या** रेसिडेंटचे जागीं असतांना येथें आले. ते प्रथम आले; ते सिडने पाइंटावर येऊन उतरले. त्यावेळीं येथें येणें ह्मणजे आपण होऊन काळाच्या दाढेंत प्राणत्याग केल्या दाखलची स्थिति होती. एकतर डोंगर अस्मानपर्यंत उंच गेलेले असून त्यावर झाडी इतकी दाट कीं त्यास जणुं कांहीं पांघरूण घालून झांकूनच ठेविले

आहेत असा भास होई. अशा ठिकाणीं हिंसक पशूंची गोष्ट काय विचारतां ? त्यांना रात्रंदिवस हवे तिकडे संचारकरण्यास सारखेच असल्यामुळें ते जिकडे तिकडे फिरतांना दृष्टीस पडत. वाटांचें तर नांवच काढावयास नको. अशी स्थिति असतां लाडवुईक साहेब काठी टेंकीत टेंकीत जिवाचा धडा करून कसेतरी डोंगरावर येऊन पाहोंचले. सुदैवाची गोष्ट इतकीच कीं डोंगरावरच्या प्रदेशांत निबिड झाडींमधून माथ्यावर येत असतांना, एखाद्या शीघ्रकोपी वनराजाच्या तावडींत सांपडले नाहींत. तथापि त्यांचे जवळ हत्यारपात्यार असतांही दोन दिवसांनीं भर दिवसा एका वाघोबानें त्यांचा बराबर असलेला आवडता कुत्रा त्यांच्या समोर उचलून अचानक नेला. बरें झालें. नाहीं तर साहेबांचीच आहुती व्हावयाची. येथील हवा फार उत्तम व स्थळ रमणीय आहे, असें पाहून साहेब बहादुरांनीं ही गोष्ट सर्व लोकांस कळवून सरकारांतही जाहिर केली. पुढें कर्नल ब्रिग साहेब सातारचे रेसिडेंट झाले, त्यांणीं १८२६ सालीं येथें येऊन एक बंगला बांधिला; आणि सातारच्या

महाराजांकडून साताऱ्याहून येथपावेतों एक छानदार गाडीरस्ता करून घेतला. नंतर मुंबईचे गव्हरनर सर-जान मालकमसाहेबही येथें हवा खाण्याकरितां आले, आणि त्यांनीं आजारी युरोपियन शिपायांकरितां एक इस्पितळ बांधविलें. पुढें याच सालीं याच साहेबाचें अनुकरण करणारे दुसरे पुष्कळ साहेब लोक हवा घेण्याकरितां येथें येऊन भरले. पुढें कर्नल रॉबर्टसन साहेब सातारचे रेसिडेंटचे जागीं आल्यावर त्यांनीं येथें एक बंगला बांधून टाकला. पुन्हां सन १८२८ चे नोवेंबर महिन्यांत मालकमसाहेब आपले बरोबर एक बुल्यमसाहेब ह्मणून कोणी डाक्टर घेऊन आले आणि त्यांनीं त्याजकडून महाबळेश्वरच्या हवेची चिकित्सा करविली. नंतर त्यांनीं सरकारी बंगल्याकरितां जागा निवडून काढल्या व खाजगतचा आपला बंगला तयार करविला. तो अद्यापि कायम असून त्यास "माउंट् मालकम" असें ह्मणतात. मालकम साहेबाच्या सांगण्यावरून सातारचे महाराजांनीं नहर येथें एकगांव वसविला व त्यांस मालकमपेठ हें नांव दिलें, परंतु हल्लीं हें महाबळेश्वर यानांवानें प्रसिद्ध आहे. पुढें

सातान्यापासून महाबळेश्वरपर्यंत जुना रस्ता होता तो मालकमसाहेबांनीं महाराजांकडून रडतोंडीचे घाटानें महाबळेश्वर घाटपाथ्याखालीं पार घाटापावेतों वाढवून चांगला बांधून घेतला. तसेंच नहरास पाण्याचा तोटा होता म्हणून वेण्यातलावही करून घेतला.

पुढें सन १८२९ सालीं ता० १६ मे रोजीं नामदार ईस्ट इंडिया कंपनी व सातारकर महाराज यांच्यामध्यें तहनामा होऊन मालकमपेंठ व सभोंवतील १९ मैलाच्या परिघाची जागा महाराजांनीं कंपनीस दिली. तसेच पारगांवही दिलें. परंतु प्रतापगडचा किल्ला व त्या सभोंवतील गडकऱ्याच्या जमिनी पूर्वीप्रमाणें महाराजांकडे रहाव्या असा स्पष्ट ठराव होता. मालकंपेठचे व पारगांवचें ऐवजीं कंपनीनें महाराजांस खांनटकीचें घाटाखालीं वांईहून सात कोस खंडाळें ह्मणून गांव आहे तो दिला. खंडाळें हें गांव पूर्वीं शिंद्याकडे होतें, तें त्यांनीं इंग्लिशास दिलें होतें. पुढें १८४८ मध्यें सातारचें संस्थान खालसा झाल्यावर हें ठिकाण कुलाबा जिल्ह्यांतून काढून सातार जिल्ह्यांत सामील केलें. अशी येथें जागा घेऊन

याला इंग्रज लोकांनीं अगदीं आपल्या विलायतचें स्वरूप दिलें आहे. तसें देण्यास येथें विलायतेप्रमाणें थंड हवा, धुकें, पाऊस वगैरे जसें असावें तसें आहे.

येथील वस्तीचें नांव मालकमपेंठ ठेविलें आहे. या वस्तीला तीन पेठा आहेत त्यांस त्या ज्यांनीं बसविल्या त्यांचींच नांवें दिलीं आहेत. मध्यभागीं जी पेंठ आहे तिला मालकमपेंठ, उत्तरेकडील मशीद रस्ता व दक्षिणेकडे आहे तिला मरी पेंठ अशा संज्ञा आहेत. व प्रत्येक बंगल्याचें नांवही इंग्रजी असून सभोंतालचीं जीं रमणीय ठिकाणें आहेत त्यांचीं जुनीं नांवें टाकून देऊन त्या ऐवजीं साहेब लोकांनीं आपलीं नांवें दिलीं आहेत. एलफिनस्टन पाइंटास आपलें नांव दिलें आहे. त्यास पूर्वीचें नांव ब्रह्मारण्य असें होतें. सिडनी पाइंटचें जुनें नांव ' डोमेश्वर ' असें होतें तें सोडून देऊन सिडनी पाइंट असें नांव ठेविलें. आर्थरसीटचेंही मूळचें " मडीमहाल " असें नांव आहे. मुंबईचे गव्हरनरावरून कार्न्याक पाइंट व फाकलंड पाइंट हीं नांवें पडलीं आहेत. तसेंच मुंबईचे हल्लींचे गव्हरनर लार्ड नॉर्थकोट यांचें नांव एका टोंकास

दिलें आहे. मालकमसाहेबांच्या दोन मुलीवरून "केट पाइंट" व अमेलियाखोरा हीं नांवें देण्यांत आलीं आहेत. राणीचा मुलगा ड्यूक आफ क्यॉनाटचें नांव कोनॉट् पीकला दिलें आहे. अलिकडे " फ्रियर हॉल " व फ्रियरघांट हीं नांवें पडलीं आहेत; ' व रडतोंडीचा घांट ' या शब्दाचा अपभ्रंश होऊन 'रोटंडाघांट' असें नांव देण्यांत आलें आहे.

लहान लहान प्रतीचे साहेब लोक बंगल्याला आपलीं स्वतःचीं नांवें किंवा विलायतेंतील खुबीदार नांवें देतात. जसें " ईगलसनेस्ट् " " वुडलॉन " "हिलस्टोन" " ग्लेनमोर " "आलबॉनिया" "फोर-ओक्स" " लिलीकाटेज् " "रोज काटेज्" " सनि-साइड् " " पारेडाइजलाज् " सिड्नी हौस वगैरे. असाच प्रकार सर्व ठिकाणच्या हवाशीर जागीं चालला आहे. तेव्हां जेथें मनुष्य यत्न व्यर्थ आहे अशा कांहीं सृष्ट वस्तूंखेरीजकरून बाकीच्या बाबतींत कोंडयाचा मांडा करून परदेश कंठणारें आमचें इंग्रजसरकार व त्यांची अनुयायी मंडळी यांची धन्य असो. यांच्या या अशा अप्रतिम गुणामुळें त्यांचे राज्यावर सूर्य कधींही

मावळत नाहीं इतकें तें अफाट झालें आहे हें त्यांच्या स्तुत्य उद्योगाचें फल होय.

## भूगर्भपदार्थ.

येथील जमिनीचा रंग बहुतेक ठिकाणीं तांबडा आहे, व कांहीं जागीं जमीन तपकिरी आहे. येथील तांबडी माती डोंगरावरील ढिसूळ तांबडे दगड ढासळून खालीं पडतात आणि फुटतात त्यांपासून झालेली आहे. मातीचा तपकिरी रंग पावसाळ्यांत उगवणारीं लहान सान झाडेंझुडपें वाळून किंवा कुजून जाऊन जंगलांत जागचेजागीं पडतात आणि मातींत मिसळून जातात, त्यामुळें होतो. ही तपकिरी माती एकप्रकारचें खत असल्यामुळें कोठेंही जमिनींत नेऊन घालून पीक केलें असतां तें चांगलें तरतरून येतें. लहान लहान छिद्रें असणाऱ्या तांबडे दगडांपासून लोखंड निघतें. ते दगड फार ढिसूळ असल्यामुळें त्यांचाही चुरा होऊन या तांबडे मातींतच, ते तद्रूप होऊन गेले आहेत. येथील जमिनीच्या पृष्ठभागावर चोहींकडे अशा रीतीनें लो-

खंडी मातीचें लुकणच वसून गेलें आहे. त्यामुळें कुरूंदाचे व दुसरे प्रकारचे जमिनीच्या पोटांतील दगड अगदीं दडपून गेले आहेत. याची प्रतीति, येथील इमारतींकरितां जेव्हां दगड पाहिजे असतात तेव्हां ते कसे काढतात हें पाहिल्यावर, झटकन् येईल. येथें बंगल्यांच्या व घरांच्या इतक्या दगडी इमारती झाल्या आहेत, त्यांजकरितां दगड काढावयाचा, तो सुरूंग लावून काढण्याची जरूरी एकंदरींत फार कमी होती. येथें थोडया मेहनतीनें दगड सहज सांपडतो. हें मातीचें लुकण येथील दरसालच्या जबरदस्त पावसानें ढिसूळ दगडाची माती झालेली पसरून किती एक वर्षे बनतच आहे. तें आज तागाईत निदान १०० फूट तरी जाडीचें झालें असेल असें वाटतें. याला प्रत्यक्ष प्रमाण येथील विहीरी पाहिल्या असतां त्यांस कोठेंही तळांत बांधकामाला खडकाचा धर नाहीं यावरून लख्ख दिसतें. या ठिकाणचे लोखंडी दगड दगडी कोळशाप्रमाणें एकाच ठिकाणीं खोल खणले असतां सांपडत नाहींत. त्यांचे कडयावरून व जमीनीचे पोटांतून आडवे पदर आहेत. पांचगणी कडील बाजूस

हें तांबडें मातीचें लुकण कमी कमी होत गेलें आहे. या जमीनींतील तांबडे दगडाच्या थरांत कित्येक वेळीं पांढरे किंवा पिवळे पैलूदार लहान लहान खड्यांचा थर लागतो. येथील मातींत जें अशोधित लोखंड आहे तें येथील मूळ राहणारे धावडलोक, यांत्रिक साधनाची मदत नसतां, ओबड धोबड साधनानें व अल्प मेहनतीनें काढून, त्याचे ओबड धोबड जिन्नस तयार करीत आणि त्यावर आपलें पोट भरीत असत. तथापि लोखंड शोधून निघाल्यावर त्याची कमाई त्यांचे हातून चांगली होत नसल्यामुळें तवे, कढया यापेक्षां विषेश खुबीदार माल त्यांजकडून होण्याची व लोखंडी कारखान्यानें त्यांची चलती होण्याची आशाच नव्हती. असें पुरतेपणीं जाणून पुष्कळ धनाढ्य लोकांनीं मनांतल्या मनोराज्यांत कारखाने काढण्याच्या अनेक खटपटी केल्या. परंतु त्या तशाच स्वप्नाप्रमाणें झोंपतल्या झोंपेंतच राहिल्या. हल्लीं जंगलांतील लांकूड व कोळसा यांची जंगल-खात्याच्या विषेश सक्तीच्या नियमांमुळें टंचाई झाल्यानें हा लोखंड काढण्याचा कारखाना अगदीं बुडून

जाऊन धांवड लोकांना मोलमजूरी करून पोटाचीआग शमविण्याची पाळी येऊन पोहोंचली आहे.

येथील जमिनीचा हा भगवा रंग सातारचे बाजूकडे ६½ मैलपर्यंत, व पुण्याचे बाजूकडे १३½ मैलपर्यंत व महाडाचे बाजूकडे थेट कोंकणपट्टीपर्यंत पसरलेला आहे. हा रंग चालणाराच्या जोडयास किंवा गाडीच्या चाकांस लागल्यावांचून राहत नाहीं, यामुळें देशावर राहणाऱ्यांस गाडी किंवा प्रवाशी कोठून आले आहेत तें भगव्या रंगावरून सहज ओळखतां येतें. हा भगवा रंग अंगांस किंवा पांघरूणास लागला असतां लागलींच आपल्यासारखें करून टाकण्याची याच्या-मध्यें विलक्षण कर्तबगारी आहे. यावरून या तांबडे मातीच्या आंगीं बरीच स्निग्धता असावी, असें उघड दिसतें. याचा दाखला मातींत काम करणाऱ्या धाव-डांच्या ध्यानाकडे पाहिलें असतां चांगला येतो. या मातीचा असा पडलेला डाग साधारण धुण्याला दाद देत नाहीं. बारसोप किंवा शिककई यांचाच प्रयोग त्यावर करणें भाग पडतें. यामुळें येथें बारसोपचा बराच खप होतो. दुसरें असें आहे कीं, येथील परीट

लोक कोरें चिरगुट धुण्यास दिलें असतां तें धुवून काढण्यानें अगदीं रडकुंडी येतात. कारण कोरीं चिरगुटें पांघरुणें उन्हांत ओपत पसरून त्यावर बरेंच वेळ पाणी शिंपडावें लागतें. परंतु असें करण्यानें खालून तांबडे मातीचे डाग पडण्याचें बरेंच भय असतें.

---

# हवा.

महाबळेश्वराची खुबी अशी आहे कीं, येथें कितीही श्रम केले तरी फार शीण येत नाहीं व थोडाबहुत आला तरी तो थोडा वेळ टिकतो. याचें कारण येथील थंड हवा हें होय. समुद्राच्या पृष्ठ भागापासून महाबळेश्वराची उंची सुमारें ५००० फूट आहे. आणि म्हणून डोंगराच्या माथ्यावर वारा मोठ्या सोसाट्यानें चालतो, या तत्वास अनुसरून मैदानांतील प्रदेशांप्रमाणें येथें उष्णता भासत नाहीं. याचा अनुभव पुष्कळांस असेल. तसेंच पांडवगड, कमलगड, रायगड, मकरंदगड, सिंहगड, पुरंदर, तोरणा, प्रतापगड, पन्हाळा, यवतेश्वर, जरंडा, माथेरान वगैरे लहानसान डोंगरांवरही बराच गारवा असतो, हें पुष्क-

ळांच्या पाहण्यांत आलें असेल. तेव्हां महाबळेश्वराची उंची हें येथिल थंड हवेचें कारण झालें. येथील उंची फार असून शिवाय येथें झाडीही फार आहे.

याशिवाय दुसरी एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे ती ही कीं, झाडी होण्यास डोंगराच्या माथ्यावर झाडांचीं मुळें खोल जाण्यासारखी ढिसूळ व मातट अशी बरीच सपाट किंवा घसरती जागा पाहिजे; तेव्हां त्रिकोणासारख्या काळ्याठिक्कर पाषाणाचा सुळका चंद्र सूर्यांच्या मार्गांत आड येण्याइतका उंचीचा जरी असला तरी त्यावर झाडी कोठून होणार ? तसें या ठिकाणीं नाहीं, या महाबळेश्वरचा माथा फार विस्तृत असून त्यावर झाडें रुजण्यासारखी तांबड्या मातीची जमीन आहे.

साहेब लोकांनीं महाबळेश्वरच्या आसपासच्या पांच मैलपर्यंत झाडी तोडूं नये असे मोठ्या सक्तीचे नियम केले आहेत. यामुळें सुमारें एकोणीस वीस चौरस मैलांचें क्षेत्र हिरव्यागार झाडांनीं नेहमीं आच्छादून गेलेलें दृष्टीस पडतें. ह्या विस्तीर्ण झाडीचाच पावसावरही विलक्षण परिणाम घडतो. अगोदर उंच डोंगर

आपल्या उच्चत्वामुळें पर्जन्योदकवाहक ढगांचें आपल्याकडे आकर्षण करितात, ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. त्यांतही अशा डोंगरावर झाडांची गर्दी असले कारणानें हें आकर्षण मोठ्या झपाटयानें चालून पाऊस पुष्कळ पडतो आणि झाडांचें जीवन जें उदक हें त्यांस यथेच्छ मिळून त्यांची वाढ चांगली होते व त्यांची संतती झपाटयानें वाढत जाते. डोंगर माथ्यावर अतिवृष्टि होत असल्यामुळें व लागलींच खालीं पायथ्याकडे कमी असल्यामुळें तळांतील पिकें माथ्यावर होत नाहींत, हें डोंगरावरील अतिवृष्टीचें सूचक चिन्ह होय.

यावरून वाचकांच्या लक्षांत आतां ही गोष्ट स्पष्टपणें येईल कीं, थंड हवा उत्पन्न होण्यास उंच डोंगराचा सपाट व ढिसूळ माथा, झाडें आणि पाऊस यांची फार अवश्यकता आहे. महाबळेश्वरास या साऱ्या गोष्टींची पूर्ण अनुकूलता आहे म्हणून येथील हवा या प्रांतांतील इतर ठिकाणांपेक्षां फारच नामी आहे.

अगदीं उष्ण प्रदेशांतही या तीन कारणामुळें मधून मधून रम्य ठिकाणें दृष्टीस पडतात. म्हैसूर प्रांतांतील निलगिरी हें स्थान महाबळे-

श्वरापेक्षांही रमणीय आहे असें सांगतात. त्याप्रमाणेंच वऱ्हाड, खानदेश, गुजराथ, राजपुताना, माळवा, नागपूर वगैरे सर्व प्रसिद्ध उष्ण प्रांतांतही उन्हाळ्यांत उन्हाळा न वाटण्यासारखीं ठिकाणें आहेत पण यां पैकीं सर्वच ठिकाणीं महाबळेश्वराइतका पाऊस पडत नाहीं.

आक्टोबर महिन्याच्या सुरवातीपासून जून महिना येऊन थडकेपर्यंत बाहेरील लोकांनीं येथें येण्याची शोभा असते. पुढें कोणी छत्रीवर पावसाळा काढणारे लोक येऊन राहिल्यास त्यांचे हाल कुतरे खाणार नाहींत, इतके होतात. आक्टोबरपासून जूनपर्यंत मात्र हवा थंड असून शरीरास आराम करणारी असते. आतां ती निरनिराळे ऋतूंमध्यें कसकशी बदलते याबद्दलच्या विशेष माहितीवरून असें समजलें आहे कीं:—

आक्टोबर महिन्यांत बहुतकरून येथें थोडा पाऊस पडतो त्यामुळें सकाळीं हवा थोडी सर्द होते, व सायं-काळीं धुकट येऊन वांबाळ पडते. नोवेंबर, डिसेंबर, व जानेवारी, या महिन्यांत हवा शुष्क होते, आणि

थंडी इतकी पडते कीं, आंग उघडें ठेविल्यास त्यास तें फुटून भेगा पडतात; व झाडावर थंडीचे कडके पडून झाडें कोंवळीं असल्यास वाळून जातात. कधीं कधीं घरांत सांठविलेल्या पाण्याचें गोंठून बर्फ बनतें. पूर्वेकडून थंडगार वारा सकाळीं व सायंकाळीं सुटतो तो तर अंगाला फार झोंबतो. या वेळीं उष्णता मापक यंत्रांतील पारा ६०।७० अंशावर येतो. फेब्रुवारी महिन्यापासून थंडी कमी कमी होत जाऊन शेवटीं अर्धामुर्धा फेब्रुवारी महिना होतो आहे इतक्यांत हिंवाळा खलास होऊन उन्हाळा डोकाऊं लागतो. परंतु येथील ऐन उन्हाळा तारीख १२ मार्चपासून सुरू होऊन एप्रिल महिना आखेरपर्यंत सरासरी असतो. एप्रिल महिन्याच्या अखेरीच्या सुमारासच पूर्वेकडील वारा वाहण्याचें बंद होऊन पश्चिमेकडून वारा वाहूं लागतो. हा पश्चिमेकडील वारा सुरू झाला ह्मणजे पाऊसकाळाचे डोहाळे लागण्यास प्रारंभ होतो. मे महिन्यामध्यें पश्चिमेकडून समुद्र किनाऱ्यावरील वाऱ्याच्या झुळका येऊं लागल्या म्हणजे ऊष्ण प्रदेशांतून येथें येणाऱ्या लोकांस फार समाधान वाटल्याशिवाय राहत नाहीं.

सकाळीं हातपाय गळून जाणें, यत्किंचित् श्रम झालें असतां अंगास घाम सुटणें, एकसारख्या उत्सुकतेनें काम करीत बसण्याची ताकद नसणें, वगैरे ऊष्ण हवेच्या भावना ज्या कोणास झालेल्या असतील त्यास येथें आल्याबरोबर रामबाण औषध मिळून तो मनुष्य कसा अगदीं ताजातवाना बनतो. मे महिन्यांत येथें कधीं कधीं पावसाच्या सरी येऊन विजा व गारा यांचें तुफान वावटळच होतें. त्यामुळें हवेंत ओलसरपणा अधिक अधिक प्रमाणानें येऊं लागतो. ढग व धुक्यानें वारंवार सर्व खोरीं भरून जाऊन दिसेनाशीं होतात. आणि जसजसा दिवस वर येऊन उन्हाची ताप पडते, तसतसे ते ढग व धुकें यांची जी तारंबळ उडते ती पाहण्याची मोठी मौज असते. उन्हानें त्याचें लहान लहान तुकडे तुकडे होऊन जसा कांहीं नाच चालला आहे कीं काय असें दिसतें. असें होऊन तो देखावा अगदीं स्वप्नासारखा वाटतो. सिलोनमध्यें पाऊसकाळ सुरू झाल्यापासून सुमारें १९।२० दिवसांनीं येथें त्याची टाकी चालूं होतेच. ज्येष्ठमासीं मृगनक्षत्रापासून पावसाळा लागतो असें ह्मणतात तोच हा होय. ज्या-

ठिकाणीं दोन तीन महिन्याच्या अवकाशांत तीनशें-पासून चारशें इंच पाऊस पडतो, त्या ठिकाणच्या पावसाळ्याची कल्पना करण्याचा प्रयत्न करण्यापेक्षां तो फार जंगी असेल असें मानून स्वस्थ राहणें बरें दिसतें. मे महिन्याच्या दहाव्या बाराव्या तारखेपासून येथील ग्रामस्थ लोक या स्वारीच्या आगमनसत्काराच्या तयारीस लागतात; व जूनच्या दहावे तारखेपर्यंत बहुतकरून सगळे सज्ज झालेले असतात; मुख्य तयारी धान्य व लांकडें घेऊन ठेवण्याची. महाबळेश्वरीं जळाऊ लांकडें सामान्य ऋतूंत पुष्कळ सवंग मिळतात खरीं, पण पावसाळ्यांत दसपट किंमत दिली तरी तीं मिळणार कशीं ? व मिळालीं तर तीं जळणार कशीं ? तेव्हां प्रथम चरू आणि इंधन यांचा पुरेसा सांठा केल्यावर, ज्या घरांत हा भयंकर पावसाळा काढावयाचा, त्याचा तरणोपाय कसा लागेल, हें पहावें लागतें ! पावसाच्या संतत धारेनें घराच्या भिंती वाहून जाऊं नयेत. व बुरशानें व शेवाळीनें त्यांची नासाडी होऊं नये म्हणून येथील लोक आपलीं घरें मागल्या दारापासून पुढल्या दारापर्यंत, व आढ्यापासून जोत्याप-

यंत लांब लांब गवताच्या व पानाच्या जाड ताट्यांनीं कुडून टाकितात. आणि ज्या दिशेनें फारच थोडा वारा किंवा धुकें घरांत भरण्याचा संभव असेल अशा ठिकाणीं एक लहानसें गवाक्ष ठेऊन पावसाळ्यांत त्या वाटेनें नडलेल्या कामासाठीं बाहेर पडतात व आंत परत जातात. साहेब लोकांची छावणी उठली, आणि ते डोंगराखालीं उतरले, म्हणजे त्यांचे माळी बागेंतल्या कुंडयांतील झाडें काढून टाकतात. आणि त्यांतील माती एखाद्या कोपऱ्यांत रचून ठेवून व तीवर पाल्यापाचोळ्याची शाकारणी करून बंगल्याच्या व्हरांडयांत उर्फ पडव्यांत कुंडयांच्या रांगा लाऊन ठेवितात. बंगल्यांच्या आसपासची माती व सडका अगदीं नाहींशा होऊं नयेत म्हणून त्यांवर झाडाचा पाला दाबून बसविण्याची चाल आहे. पावसाळ्यास आरंभ होऊन आठ पंधरा दिवस झाले कीं जांभळी शिवाय करून इतर झाडावर एक पान किंवा फूल दिसेल तर शपथ ! साहेब लोकांच्या बंगल्या समोरच्या बागांतील दिखाऊ, पण वासानें आणि सामर्थ्यानें अगदीं नादान फुलझाडें तर एक दोन सरी बरोबरच जमिन-

दोस्त होऊन जातात. लिली, लारेल, कौझलिप, डेलिया, डेझी वगैरे विलायती झाडाचे खुंट जमिनींत जगून राहिले तर मोठें भाग्य! अशा वेळीं बंगल्यांचे माळीलोक, देवस्थानचे भटभिक्षुक, दहा पांच वाणी उदमी, दारू विके, एक दोन पारशी, व धावड, कुणबी, धनगर, मिळून सारे हजार लोक येथें डोकें देऊन राहतात. जुलई महिन्यांत मात्र पाऊस अगदीं मुसळ: धारांनीं ओतावयास लागतो. तेव्हां रोजचा पाऊस कधीं कधीं १२ पासून १८ इंच पावेतों होतो. सर्व झऱ्यांना पाण्याचे लोंढे वाहूं लागतात. यामुळें रस्ते व बगीचे यांचें अगदीं नुकसान होऊन जातें. या दिव- सांत जिकडे पहावें तिकडे डोंगरावर, रस्त्यावर, आणि रानांतून पाणीच पाणी झालेलें असतें; व पृथ्वीची चर्या आनंदानें अगदीं तल्लीन होऊन शांत झालेली दिसते.

## हवेचे गुण.

येथील हवेमध्यें साधारण गुण असा आहे कीं, तिचे योगानें निरोगी मनुष्याची प्रकृति सतेज राहून त्याचे अंगांत सदोदित हुषारी असते. असें होण्याचीं कारणें अशीं आहेत:—

( १ ) या हवेमध्यें थंडी फार आहे. ती फार असण्याचें कारण उघडच आहे. एक तर गांव सह्यपर्वताचे एका उंच शिखरावर वसला आहे. वृक्ष, वनस्पति सदोदित दाट, सच्छाय व हिरव्या असल्यामुळें सूर्याची प्रखरता त्याच्या अंतरंगांत शिरतच नाहीं. शिवाय कृष्णा आदिकरून नद्यांची उत्पत्ति या डोंगरांतून असल्यामुळें त्यांचें पाणी चहूंकडे पहाडांत खेळत राहिलेलें आहे. तसेंच वरचेवर मेघपटलें येऊन सूर्याच्या उष्णतेचें निराकरण होतच असतें. या सर्व गोष्टींमुळें उन्हाळ्यामध्यें उष्णतेपासून बाहेरगांवीं मनुष्यमात्रास जे विकार होतात, ते येथें होत नाहींत. म्हणून उष्णता शमन होण्याकरितां कृतीनें गार केलेलें पाणी पिण्याची किंवा कृत्रिम शितोपचारांची येथें जरूरच लागत नाहीं. तेव्हां अर्थातच कृत्रिम शीतजल, कृत्रिम वायु, इत्यादिकांपासून पुढें जे वाईट परिणाम होतात, ते येथें राहिल्यापासून होण्याची तिळप्राय धास्ती नाहीं.

( २ ) येथील हवा सुखावह असण्याचें दुसरे कारण हें आहे कीं, ही हवा इतकी थंड आहे तथापि तिच्यांत स्निग्धता विशेष आहे. येथें हवा हिंवाळ्यांत

जरी इतकी थंड ह्मणजे देशावरील हवेपेक्षां दसपटीनें थंड असते, तरी देशावर थंडीनें जसें अंग, हात, पाय, व ओंठ, वगैरे फुटतात तसे येथें बहुशः फुटत नाहींत; व देशावरील उन्हाच्या दाहानें जसा फार त्रास वाटतो, निरुत्साह होतो व अंगीं शिथिलता येते, तसें येथें कांहींसुद्धां होत नाहीं.उलटे मन सुप्रसन्न राहून अंगांतील हुषारी अणुमात्रसुद्धां कमी न होता दिवस मोठ्या मौजेनें तेव्हांच निघून जातो. साधारण थकवा येण्यास देखील येथें व्यायाम फार करावा लागतो. बाहेरून कितीही थकून आलें तरी स्वल्प उपहार करून, गार पाण्याचे चार दोन घोट घेतल्याबरोबर, पहिल्याप्रमाणें ताजेतवानें होऊन पुन्हां कांहींतरी उद्योग करावा असें वाटूं लागतें. एखादे वेळीं थकवा आला, तरी तो केवळ क्षणिक असतो. त्यापासून हातापायाची आग होणें, मस्तक दुखणें, घशास कोरड पडणें वगैरे विकार होत नाहींत.

( ३ ) तिसरें कारण असें आहे कीं देश व कोंकण या दोहोंच्या हवांचें या ठिकाणीं संमेलन होऊन दोहींचे दोष जाऊन गुण मात्र राहिले आहेत; ह्मणजे

मावळांतील सर्दी कोंकणच्या अंतरंगांतील उष्णता खानदेश व वऱ्हाड येथील रूक्षवात हे गुण येथील हवेंत मुळींच नाहींत.

( ४ ) थंड व वनस्पतिमय ठिकाणच्या हवेंत विकार असण्याचा संभव असतो, तो या ठिकाणीं अगदीं नाहीं. याचें कारण पावसाचें सांचलेलें विकारी पाणी डोंगरावर मुळींच न राहतां लागलींच खालीं वाहून जातें आणि नद्यांचे प्रवाहास मिळतें. यामुळें गवत, झाडपाला वगैरे त्या पाण्यांत कुजण्याचा संभवच नसतो. शिवाय येथें दलदली किंवा पाणथळ जमिनी नाहींत; यामुळें हवेंत रोगट सर्दी नाहीं. शिवाय डोंगरांच्या सभोंवतील सखल प्रदेशाची हवा स्वभावतःच उत्तम असल्यामुळें खालीं मलेरियासारखे साथीचे विकार होतच नाहींत; तेव्हां अर्थातच तेथून ते वर येण्याचे भय राहत नाहीं. पावसाळा गेलेवर दुसऱ्या कित्येक ठिकाणीं हिंवताप वगैरे येतात, तसे या ठिकाणीं येत नाहींत. पावसाचें पाणी डोंगराला उतार असल्यामुळें जमिनींत न मुरतां निघून जातें, हें जरी मलेरिया न होण्यास कारण खरें आहे, तथापि गांवांत पाणीचें

पाणी व इतर रावाचे पाणी जाण्यास गटार (ड्रेनेज) बांधून काढले नसल्यामुळें तें जागोजागीं मुरतें. इकडे म्युनिसिपाल कमिटीचें लक्ष्य गेलें तर लोकांस फार सुखावह होणार आहे. येथील जमीन ढिसूळ असल्यामुळें व वस्ती लहान असले कारणानें हें पाणी मुरल्यापासून जरी हवा दूषित होणेचा संभव कमी आहे, तरी या प्रसिद्ध आरोग्य-वर्धक स्थलीं या गोष्टीकडे दुर्लक्ष नसावें. घाण व रावाचें पाणी घराबाहेर न येऊं देणें व घरांतही न सांठूं देणें याबद्दल येथील म्युनिसिपालिटीची सक्तीची तसदी आहे तरी त्यापासून असलें पाणी सांडण्याची व जमिनींत मुरण्याची क्रिया कमी झाली आहे असें होत नाहीं; इकडे म्युनिसिपालिटीचे लक्ष्य जाईल काय! घरांतही पाणी सांडूं नये ह्मटलें, तर घरांत राहणाराचा मोठा निरूपाय होईल असें जाणून दि-लेली संवलत ही मोठी मेहरबानीच समजली पाहिजे.

या हवेंत नेहमीं हुषारी राहते यांचें कारण असें सांगतात कीं, या प्रदेशाची उंची समुद्रसपाटीपासून सुमारें पांच हजार फूट असल्याच्या योगानें शरीरावर

हवेचा दाब पुष्कळ कमी बसून रुधिर वाहिन्यांतून रक्ताची गती किंचित् तीव्र होते; तेणेंकरून सदा उत्साहवृत्ति राहते. ( जसजसें वरवर जावें, तसें तसें पृथ्वीच्या भोंवतालचें वातावरण पातळ होत जातें, या तत्त्वावर हा सिद्धांत काढला आहे;) तसेंच अशक्तता, वीर्यक्षय, मस्तकाचा हल्लकपणा, निरुत्साह, उद्विग्नता, व व्याकुलता इत्यादि प्रकार या ठिकाणीं फार कमी होतात.

आणखी असें आहे कीं येथील हवा तल्लख व अंतर्यामी किंचित शोषक असल्यामुळें या ठिकाणीं पित्त सदैव जागृत असतें. यामुळें अग्निमांद्य मोडून पचनादि व्यापार जोरानें चालतात, अन्नाचा रस यथाक्रम होऊन रक्तशुद्धि व सामर्थ्यवृद्धि हळुहळु होत असते. हवेच्या पित्तकरपणाचें प्रत्यंतर प्रातःकाळीं निजून उठल्याबरोबर उन्हाकडे पाहिलें असतां पिवळें दिसणें व स्वतांस हल्लक वाटणें हेंच होय. यावरून पित्तांशाचा जोर येथें अधिक असावा हें उघड आहे. म्हणून महाबळेश्वरीं सारक औषधाप्रीत्यर्थ डाक्टरास पैसे भरण्याची गरज नाहीं. पण ही गोष्ट ज्यांचे कोठे हिरड्यांस किंवा बाळहिर-

ढ्यांस दाद देईनासे झाले आहेत, त्यांस मात्र लागूं नाहीं. जन्मतःच ज्यांची पित्तप्रकृति आहे किंवा ज्यांचे काळिजांत किंवा पित्ताशयांतच विकार झालेला आहे, त्यांस ही हवा पित्ताचा ज्यास्त प्रकोप होऊन चैन पडूं देणार नाहीं. आजार बरे करण्याचे उपयोगापेक्षां, अंगीं मूळचा असलेला धट्टेकट्टेपणा आणि निरोगीपणा कायम ठेवण्यास या हवेचा उपयोग फार आहे. अंगांत कांहीं विशेष आजार नसून फक्त ज्यांचे प्रकृतीस हुषारी नसेल, किंवा उष्णप्रदेशांत राहिल्यानें, अथवा सतत बैठकीचें काम केल्यामुळें ज्यांस शीण आला असेल त्यांस ही हवा फारच हितकारक आहे. गंडमाळा व हृदयाचा विकार जडतोसें भासूं लागतांच इकडे या हवेंत आल्यास ते आजार जाऊन मनुष्य पहिल्यासारखा तयार होईल. राहून राहून वरचेवर येणारे तापांसही, ही हवा चांगली आहे.

ही हवा पुरुषांपेक्षां स्त्रियांस व विशेषेंकरून लहान मुलांस फारच आरोग्यकारक आहे, ही गोष्ट हल्लीं अनुभवसिद्ध आहे. इंग्रज लोक एक वेळ स्वतः महाबळेश्वरीं जाणार नाहींत, परंतु मुलांना उन्हाळ्यांत अवश्य

तिकडेस पाठवितात, येणेंकरून पोरांना लहानपणीं जी रोगराई होण्याची भीति असते ती रहात नाहीं. तसेंच दांत येते वेळेस त्यांस क्लेश कमी होतात, व एकंदरीनें त्यांचें शरीर सुदृढ व पुष्ट होऊन उतार वयांत तें निरोगी व निकोप राहतें.

येथें अति पर्जन्य असल्यामुळें या हवेंत दोषही आहेत. अतिसार, संधिवात, धनुर्वात, गुल्म, प्लीहा रोग यकृद्रोग, उदर, व शूल इत्यादिकांस येथील हवा फार वाईट आहे. क्षय, रक्तदोष, रक्तशुद्धि या विकारांस मात्र ही हवा चांगली आहे. परंतु जसा एखादा दररोज गांजा ओढणारा, अफू खाणारा, किंवा दारू पिणारा असला ह्मणजे त्यास नित्य अमली पदार्थ सेवन केल्यानें कैफ येत नाहीं तसेंच वरील हवेच्या अंगच्या गुणदोषांचे साधकबाधकपणाचा परिणाम येथील कायमच्या रहिवाश्यांवर विशेष घडत नाहीं. म्हणजे त्यांचे त्यापासून हित किंवा अहित जितक्या पुरतें तितकेंच होतें. हिंवाळ्यांत व पावसाळ्यांत पाणी तोंडांत घातलें, तर बर्फाचा तुकडा जिभेवर ठेविल्यासारखें जिभेस रवरवतें, इतकें तें गार असतें; अंग उघडें टाकलें तर काला-

सारखें गार होतें; परंतु त्यापासून अपाय होण्याचें मुळींच भय नसतें. महाबळेश्वरचा खरा उन्हाळा इतर ठिकाणांप्रमाणें मे व जून महिन्यांत नसतो. मार्च व एप्रिल हे महिने येथें फार कडक वाटतात. इंग्लंडांतील व येथील कडक उन्हाळ्याची उष्णता सारखी आहे असें एका ग्रंथकारानें लिहिलें आहे. या दिवसांत पारा कधीं कधीं ९० अंशांपर्यंत जातो. मे व जूनमध्यें तो ७५ पासून ८५ पर्यंत असतो. पण किती झाला तरी तो महाबळेश्वरचा उन्हाळा! ह्मणजे फक्त बारापासून दोन वाजेपर्यंत फलाणीची बंडी घालूं नयेसें वाटतें. तेव्हां देशावरील ज्या उन्हाळ्यांच्या रखरखींत ओलें चिरगुट सगळ्या अंगभर गुंडाळून घेऊन, ज्या ठिकाणीं काल-त्रयीं सूर्याच्या किरणांचा प्रवेश होणार नाहीं अशा एखादे भुयारांत किंवा लादणींत जाऊन दडी मारावी अशी इच्छा होते, त्या उन्हाळ्यांत व यांत केवढें अंतर आहे बरें? अशा कडक हवेंतून पित्ताचे फोड किंवा गांधी आलेला मनुष्य महाबळेश्वराच्या कितीही कडक उन्हाळ्यांत येथें येण्यास निघाला तरी त्याला

महाबळेश्वर घांटमाथ्याची हवा लागल्याबरोबर बरें वाटूं लागेल, व बहुश: एक दोन रात्रीं येथें काढल्यावर त्याच्या त्वचेवर उष्णापासून आलेली त्रासदायक विद्रूपता नाहींशी होईल. येथील थंड हवेमुळें दुपारचें जेवण झाल्याबरोबर प्रत्येकांस थोडीशी वामकुक्षी घेण्याची इच्छा सहज उत्पन्न होते, व ज्याअर्थीं बहुतेक लोक येथें आरामासाठींच येणारे असतात त्याअर्थीं ती इच्छा टाळण्याबद्दल कोणी फारशी धडपडही करींत नाहींत. परंतु हिचा होईल तितका आव्हेर करणें या हवेला फार इष्ट आहे. तथापि नाइलाज होऊन झोंपेची मिठीच पडली तर त्यावर उपाय ह्मणून सकाळीं व संध्याकाळीं कोणत्या तरी प्रकारचा बराच व्यायाम केला असतां, ही दुपारची झोंप ह्मणण्यासारखी बाधक होणार नाहीं. असें समजूनच युरोपियन लोक देखील तिचा थोडाबहुत आदर करण्यास मागें पुढें पाहत नाहींत. महाबळेश्वरचें पाणी जात्या स्वच्छ पण जड आहे. चांगला व्यायाम केला तर यासारखें पाचक पाणी दुसरें नाहीं, पण जो कोणी व्यायाम न करील त्याला ते भोंवल्याशिवाय कधींही

राहावयाचें नाहीं. ज्याला महिना दीड महिना महाबळे-श्वरीं काढून पांच चार शेर मांस वाढवून घेऊन परतावयाचें असेल त्यानें येथें हिंडणें, खाणें, व विश्रांति घेणें, या तीन धातुसाधित नामाच्या बाहेर फारसें जातां कामा नये. अकरा महिने कष्ट करून बारावा महिना खूप चैनींत घालविण्यास अत्यंत योग्य असें हें ठिकाण आहे.

---

## पाणी.

येथील लोखंडी मातीचें पूट कोठेंही फार घट्ट नसल्यामुळें जमिनींत पाण्याचा तळ लौकर लागतो. क्षेत्र महाबळेश्वरांत ज्या विहिरी आहेत, त्यांस आठ किंवा दहा फुटांवर कृष्णाबाईच्या पाण्यासारखें गोड पाणी लागतें; यामुळें येथें विहीर काढण्यास खर्च कमी येतो ह्मणून अर्थातच येथें तर घरोघरीं विहिरी असणें अगदीं साहजिक आहे. परंतु माल्कमपेठेस पाणी लागण्यास ४० पासून ६० फूट पावेतों विहीर खोदावी लागते, व पाण्याचा सांठा असणें जरूर

असल्यास आणखी ज्यास्त खोल विहीर केल्यावांचून होत नाहीं. पुन्हां इतक्यांच खोलीवरून तिचें बांधकाम करून घ्यावें लागतें, यामुळें येथें विहिरी बांधण्यास बराच खर्च येतो. या साठीं येथें सर्वच बंगल्यांना आणि घरांना विहिरी आहेत असें नाहीं.

मालकमपेठेपासून एक मैलावर पुण्याकडून येणारे रस्त्याचे बाजूस, एक सरोवर आहे त्यास येथील लोक वेण्यातलाव असें ह्मणतात. यानें २८।२९ एकर जमीन व्यापिली आहे. याची खोली अदमासें १०।१२ फूट आहे. हा तलाव सातारचे राजाकडून बांधिला गेला आहे. वेण्या नदीचा उगम याचे वरच्या बाजूस आहे, परंतु या उगमाच्या पाण्याशिवाय पुष्कळ झऱ्यांचें पाणी यांत येऊन पडतें. या तलावाच्या नजिकच्या उंच डोंगराळ प्रदेशांतील कांहीं बागांतील विहीरींचें पाणी या सरोवराच्या योगानें वर आलें आहे. या सरोवरापासून निघणारा प्रवाह शेवटीं वेण्या नदीच्या पात्रांत जाऊन पडतो. ह्या डोंगराच्या उंच उंच भागांतून जे लहान लहान ओढे किंवा झरे निघतात, त्यांचे पाण्याचा उपयोग, त्यांच्या आसपासच्या जमि-

नीच्या शेतकामास फार होतो. तो असा कीं, ठिकठिकाणीं त्यांचे पाट बांधून नेऊन शेतांतील पिकांस त्यांचें पाणी पाजतात. नंतर उपयोग विरहितचें त्यांचें पाणी मोठ्या प्रवाहास जाऊं देतात. त्यांचीं नांवें व ठिकाणें पुढें येतील.

म्युनिसिपालिटीकडून व्यवस्था होत असलेले सार्वजनिक असे दोन तलाव आहेत; एक बिशप तलाव, माल्कम टेंकडीच्या पायथ्याशीं; व दुसरा एल्फिन्स्टन तलाव किंवा तिकोनी विहीर, महाड रस्त्याचे बाजूस आहे ती. यांतील पाणी उन्हाळ्यांत फार माफक रीतीनें लोकांस दिलें जातें. कदाचित् कोणी जास्त पाणी नाशील ह्मणून बंदोबस्ताकरितां दोनही ठिकाणीं म्युनिसिपालिटीकडील रखवालदार ठेविलेले असतात. बाहेरील लोकांस सुपरिंटेंडेंटसाहेब यांजकडे अर्ज करून येथील पाणी नेण्याची परवानगी मागावी लागते. याबद्दल त्यांचा असा ठराव आहे कीं, मालकांपैकीं थोर मनुष्यास अर्धी ½ पखाल मुलांस ¼ आणि नोकर लोकांस ½ पखाल पाणी दररोज स्वयंपाकाकरितां व पिण्याकरितां द्यावें. या ठरावाच्या हिशेबानें रोज

पाणी किती लागणार हें त्या परवानगी अर्जांत आगाऊ कळवावें लागतें. येथून पाणी नेण्याबद्दलची भिस्ती लोकांची मजूरी मालकांस तलावापासून बंगल्यांच्या लांबीच्या मजलीप्रमाणें कमज्यास्त पडते. साहेब लोक व पारशी लोक हें पाणी कातड्याच्या पखालींतून भिस्तीलोकांकडून नेतात. परंतु बंगल्यांत राहणारे हिंदु लोक किंतानाच्या कापडाच्या पखाली करून त्यांतून पाणी आपल्या जातीच्या माणसांकडून आपल्या बंगल्यावर नेववितात. पाण्यासंबंधानें इतका बंदोबस्त करण्याचें कारण इतकेंच आहे कीं, उन्हाळ्यामध्यें येथील सर्व विहिरींना व तलावांना पाणी बरेंच कमी असतें; तेव्हां पाण्याचा अद्वातद्वा खर्च केल्यानें सर्व लोकांस पाणी पुरावयाचें नाहीं, तोटा येईल हें मनांत आणून ही तजवीज केली आहे. रुचकरपणांत व गुणकारीपणांत येथील सर्व ठिकाणचें पाणी सारखेंच आहे.

याशिवाय दुसरे पुष्कळ झरे व विहिरी येथें आहेत, परंतु त्यांवर म्युनिसिपालिटीचा कांहीं प्रतिबंध नाहीं. त्यांची माहिती पुढें दिली आहे.

**वाळुंज**—हा झरा **मुंबई** पाइंट व **कान्यांक** पाइंट याच्या दरम्यान आहे. याचें पाणी गव्हरमेंट हौसकडे उपयोगास नेलें जातें.

**धबधबी**–हा झरा **सिडने** पाइंट व **ग्लेंगोरी** बंगल्याच्या दरम्यान आहे.

**शिपायाचें पाणी**–हा झरा **रोझकाटेज** बंगल्याच्या पलीकडील सखल भागांत आहे.

**गव्याच्या झरा**–गोऱ्या लोकांच्या स्मशानाचें पश्चिम बाजूस आहे.

**मंडलिक** झरा–**सनीसाइड** बंगल्याच्या कंपौडांत आहे.

**वुडलँड** व **न्यूजंट**–हे झरे या नांवचे बंगल्यांच्या कंपौन्डांतच आहेत.

**कणसु स्प्रिंग**–**रेडक्यासल** बंगल्याचे पश्चिमेस आहे.

**फाउंटन** स्प्रिंग–यास येथील लोक **तामनदी** ह्मणतात. 'हा **सासून** पाइंट रस्त्यावर **फौंटन** हाटेल नजिक आहे.

**स्वारांचा** झरा–यास मोठा नळ ह्मणतात. या ठिकाणचें पाणी गांवांत बांधून आणण्याचा घाट घालून

काम सुरू केलें होतें. परंतु तें कांहीं कारणामुळें अपुरेंच सोडून दिलें गेलें. हा मोठा झरा बांधून काढलेला आहे. तो पूर्वेस नेल्सनलाज व ग्लेनमोर बंगल्यांच्या जवळ आहे.

गोठणीचें पाणी–पूर्वेस ब्लुव्ह्यॉली रस्त्यावर आहे.

बार्चेस्टरस्प्रिंग–पश्चिमेस बार्चेस्टर बंगल्याच्या मागील बाजूस आहे.

टायगरपाथ स्प्रिंग–दक्षिणेस टायगरपाथच्या फूट रस्त्यानें लागतो.

रांजणवाडी स्प्रिंग–पूर्वेस साजन हिलच्या पायथ्याशीं आहे.

मुरारजी क्यॉसल स्प्रिंग–पूर्वेस सासूनपाइंटकडे जातांना डावे हातास मुरारजी क्यॉसल बंगल्याच्या कंपौन्डांत आहे.

टेलरस्प्रिंग–निरालाज व माऊंटडग्लस या बंगल्याचे जवळ आहे.

या सर्व झऱ्यांचें पाणी फारच गोड, सतेज, निर्मळ, व क्षेत्र महाबळेश्वराच्या कृष्णोदकाच्या प्रमाणें असतें. त्याच्या गोडीचें वर्णन करितांच येत

नाहीं म्हटलें तरी चालेल. एकाच कृष्णा नदीचें पाणी परंतु महाबळेश्वरीं त्याची रुचि व पुढें दाहा कोसांवर वांईस गेल्यानंतरची त्याच पाण्याची रुचि या दोहों-मध्यें जमीनअस्मानीचा फरक दिसतो. तो फरक समजण्यास दोन्ही ठिकाणचें पाणी प्रत्यक्ष पिऊन पाहिलें पाहिजे; शब्दांनीं वर्णन करणें व्यर्थ आहे. महाबळेश्वरच्या पाण्यामध्यें स्वच्छता इतकी असते कीं, तें पंचपात्रींत किंवा पेल्यांत घातलें ह्मणजे भांड्याचे अतिसूक्ष्म डाग पाण्याच्या स्वच्छतेमुळें एकदम दिसून येतात. या हवेला तहान फार लागत नाहीं. शिवाय पाण्याचे आंगीं विलक्षण गारठा असतो यामुळें थोडक्या पाण्यानेंच समाधान वाटतें, ही एक येथें मोठी मजा आहे.

वरील वर्णनावरून येथें पाण्याचें बरेंच दुर्भिक्ष आहे, निदान पाणी मिळण्यास फार अडचणी असतात असें मात्र कोणी समजूं नये अद्वातद्व खर्च करण्यास मात्र नहरांत पाणी नाहीं, पण अवश्य तितकें मिळण्यास अडचण पडत नाहीं. नुकताच पावसाळा संपून हिंवाळ्यास सुरुवात होते अशा

समयास डोंगरांतून ठिकठिकाणीं झरे वाहत असतात, ते इतके कीं बहुतकरून उंबराचा वृक्ष दृष्टीस पडला ह्मणजे मुळाशीं झुळझुळ वाहणारा लहानसा तरी झरा हटकून सांपडतो. तथापि उन्हाळ्यामध्यें पाणी विपुल असावें तसें नसतें. कित्येक ठिकाणीं दूर अंतरावरून, व दरडी चढून पाणी आणावें लागतें. कृष्णा आदिकरून नद्यांचे उगम महाबळेश्वरीं आहेत, तथापि वाहतें पाणी मुबलकपणें सांपडत नाहीं, असें ह्मटलें तरी चालेल. वेण्या तलावांतून एक लहानसा प्रवाह निघून वेण्येचे खोऱ्यांत पडतो हें खरें, परंतु तिकडे जाण्याचा फार लांबीचा पल्ला असल्यामुळें तो केवळ परीट लोकांस उपयोगीं पडणेसारखा आहे. येथें बहुतेक ठिकाणीं विहिरींचें पाणी काढून गुजारा करावा लागतो, व त्या फार खोल असल्यामुळें त्यांतून पाणी शेंदून काढण्याची फार मेहनत पडते.

---

# झाडी.

येथील जंगलांत पुष्कळ प्रकारचीं झाडें आहेत त्यांतील उपयुक्त झाडांची माहिती ‘ वनस्पति ’ या सदराखालीं देण्यांत येईल. परंतु येथें फक्त येथील झाडझाडोऱ्याचें सामान्यपणें वर्णन करूं.

मालकमपेठची हवा फार थंड आहे यावरून कोणी असा तर्क करूं नये कीं, गगनचुंबित प्रचंड वृक्षांच्या राईवर राई येथें लागून गेल्या असल्यामुळेंच हा थंडपणा तींत आला असेल. वस्तुतः तसें नाहीं. ह्या ठिकाणच्या झाडांइतकीं भिकार झाडें कोठेंही नसतील. आंबा, वड, चिंच, कंवठ पिंपळ, लिंब वगैरे आकाशास भेदून जाणारीं कमजास्त दाट छायेचीं झाडें येथें बिलकूल नाहींत. येथें जांभळींचें मात्र पीक फार मोठें आहे. पण ह्या जांभळी आणि त्यांचीं फळें, यांचे त्यांच्या देशावरील जातभाईंशीं कुलनामसमतेशिवाय दुसऱ्या कोणत्याही प्रकारचें साम्य नाहीं. पानें लहान, फळें लहान, आणि झाडें लहान. येथें या झाडाच्या

दोन जाती आहेत. त्यांपैकीं लहान जातीचीं फळें शेळीच्या लेंडयांसारखीं उन्हाळ्यांत जंगलांतून पसरलेलीं असतात, व दुसऱ्या मोठे जातीचीं गांवांत घरापुढें लाविलेलीं आहेत, त्यांचीं मात्र फळें देशी जांभळाच्या निदान गोतांतलीं असावीं असें वाटतें. चविणी उर्फ रानकेळी आणि गांवकेळी यांत जेवढा फरक आहे तेवढाच येथील जांभळींत आणि मैदानांतील जांभळींत आहे. कोणत्याही वाटेनें हिंडावयास निघालों तरी, थोडयाशा पोरकटपणाच्या वृत्तीचें अवलंबन केलें असतां पाहिजे त्याला एकसारखें तोंड हालवीत जाण्यास व घोंसावर घोंस शोधून काढण्याच्या नादांत लागून करमणूक करून घेण्यास या जांभळीपासून अवश्य मदत होते. झाडांखालून तर या फळांचा अगदीं सडा पडलेला असतो.

जांभळीसारखेंच ‘ पिसा ’ या नांवाचें दुसरें एक भिकार झाड आहे. याची पानें अतिशय वीर्यवर्धक आणि वीर्यस्तंभक आहेत. याचे ओले पाल्याच्या रसाची भेंडीचे रसासारखी तार निघते. याकरितां याची ताजीं पानें खाल्लीं असतां शरीर चांगलें बनतें. याची

छाया दाट नसून लांकूडही इमारतींच्या उपयोगीं पडण्यासारखें मोठें होत नाहीं.

जांभूळ, शहाजिरें, हिरडा, भोमा, गेळा, रामेठा, आसना, केंजळ, ऐन, नाना, बिलवा, अंजन, फणस, आंबा वगैरे इमारतीचीं झाडें या डोंगरावर व खालीं पांच मैलाचे हद्दींत जिकडे तिकडे जंगलभर आहेत, यामुळें जातां येतां हीं दृष्टीस पडतात. शहाजिरीचे लांकडाचें विशेषतः घोड्याच्या गाडीस पोल चांगले संगिन होतात. येथील जंगलांत बाभळीचें झाड नांवालासुद्धां कोठेंही आढळत नाहीं. देशावर जंगली लांकडांत ह्या जातीच्या झाडाचें लांकूड पहिले प्रतीचें मजबूत आहे. परंतु याची उणीव परमेश्वरानें या जंगलांत अंजनच्या लांकडानें भरून काढली आहे. हें अंजनचें लांकूड बाभळीच्याही लांकडास मागें टाकणारें आहे. या लांकडाचीं मुसळें फार उत्तम होतात. हें लांकूड आपटलें असतां लोखंडासारखा आवाज निघतो. पाण्यांत विहीरीचें बांधकाम करतांना धर नसला ह्मणजे हें तळांत घालून काम करितात. परंतु तें कुजण्याचें बिलकूल भय नाहीं.

**भोमा** नांवाचें झाड आहे त्याच्या मोहोराचा बोलि-याप्रमाणें रस्त्यावर मधुर वास येतो. धुराच्या जागीं इमारतींत याचें लांकूड घातलें असल्यास त्याला कीड लागण्याचें मुळींच भय नाहीं.

**वाळुंज, कारवी, डिंगळा, रामाठा,** हीं झाडें व **चिमुट, कुसर** या वेली, आणि **चवर, नेचे** वगैरे **कांदे** हीं या जंगलांत बरींच आहेत.

**उंबराच्या** झाडास फळें लागतात तीं खाऊन गरीब लोक कसाबसा उपासमार होऊं देत नाहींत.

**कारवीचीं** बोंडें रानांतून गुरें चारीत फिरणारीं गुराख्यांचीं पोरें कात, चुना, घालून खाऊन विडा खाल्यासारखीं तोंडें रंगवितात.

**रामाठा** या झाडाची साल जाळून पूड केलेली दांतास लाविली असतां बत्तिशी पार पडून जाते असा इकडील लोकांस अनुभव आला आहे. याचे सालीपासून वाख निघतो व याचे सालीचीं ओझीं बांधण्यास दोर करितात.

**चिमुट** याच्या वेलीला कांटे असून ती बहुतेक झाडांवरून पसरलेली **असते.** ती बागेंतील कमानी वगैरे

करण्यास ओलेपणीं वाटेल तशी वळणारी असल्यामुळें उपयोगी आहे. ही सुमारें २५ फूट लांबीची सारखी जाडी असलेली मिळूं शकेल. हिच्या हातांत धरण्याच्या काठ्या काढून लोक बाजारांत विकावयास आणितात. छत्र्याच्या दांड्या करण्यास या वेलीचा चांगला उपयोग होण्यासारखा आहे.

कुसर—ही वेल आहे. या वेलीला चैत्र व वैशाखमासीं फुलें येतात. त्यांस चमेली, मोगरा, निशिगंध वगैरे फुलांच्या वासासारखा सुंदर वास येतो. या वेलीचीं फळें गरीब लोक निर्वाहाकरितां नेतात. सन १८९७ सालचे दुष्काळांत तर हीं फळें खंडोगणतीं काढून घेऊन त्यांवर पुष्कळ लोकांनीं प्राण रक्षण केलें होतें. हीं फळें दिसण्यांत पावट्यासारखीं असून फार कडू असतात. म्हणून यांचा कडूपणा काढून मग तीं खावीं लागतात. तो काढण्याची रित अशीः—ओलेपणींच त्यांचेवरची साल काढून तीं आधणाच्या पाण्यांत सुमारें ७।८ वेळ शिजवावीं; व प्रत्येक वेळीं तें शिजवून राहिलेलें पाणी टाकून द्यावें, ह्मणजे त्यांचा कडूपणा नाहींसा होतो. नंतर त्यांत तिखटमीठ वगैरे घालून तीं उसळीं सारखीं खाण्यालायक होतात.

**चवीणी** ऊर्फ रानकेळी–हीं येथून सुमारें दोन मैलां-वर **फिटझरल्ड** घाटाजवळ व **मालकंपेठच्या** आसपास सर्व ठिकाणीं पुष्कळच आहेत. यांचीं पानें केळीचे पानाप्रमाणें मोठीं असतात; व त्यांवर जेवणाचें पदार्थ वाढून भोजन करितात. पाऊस पडला म्हणजे हीं आपोआप उगवतात. मे महिन्यांत देखील हीं बाजारांत विकायास येतात. गांवकेळींप्रमाणेंच यांस केळफुलेंही येतात. त्यांची भाजी चांगली होते. पुढें पाऊसकाळ संपलेवर याचा कोंब गरीब लोक तसाच खातात; व जमिनींतील त्याचा गड्डा शिजवून त्याचा सुग्रास आहार करितात. दुष्काळसालीं लोकांस खाण्यास या कांद्यांचा फार पुरवठा झाला होता. याच्या वाळलेल्या सालीचे दोर ओझीं बांधण्यास उपयोगीं पडतात. हे कंद वाळ-वून दळले असतां पीठ सपिठीप्रमाणें पांढरें होतें व ते तवकिराप्रमाणें उपोषणास खाण्याचें उपयोगीं पड-ण्याजोगें होतें.

**कर्दळी** किंवा हळदीच्या पानाप्रमाणें पानें असलेलीं **चवराचीं** झाडें पाऊस पडतांच रानोमाळ आपोआप डोकीं वर काढतात. यांचीं पानें काढून पावसाळ्यांत

गुरांखालीं घालतात. त्यांस इकडील गांवठी लोक " सेपल " असें ह्मणतात. त्यांचे योगानें गुरांस जमिनींतील ओलसरपणा न बाधतां चांगली ऊब येते. पावसाळ्यांत या झाडांस कोबीसारखा उंच दांडा येऊन शेंवटास एक कणीस येतें, त्यास सर्व बाजूस पाकळ्या प्रमाणें टेंगळें दिसतात. त्यांतून फुलें बाहेर पडतात. तीं एकास सुमारें १ पासून १२ पर्यंत असतात. त्यांपैकीं कांहीं पिवळीं व कांहीं पांढऱ्या रंगाचीं असून सुवासिक असतात. हें झाड फुलण्याच्या वेळीं सुमारें २½ फूट उंच होते. याचे कांद्यापासून अरारोट काढतात. त्याचा पुष्कळ खप आहे.

इकडे डोंगराखालीं पांच मैलाचे हद्दींत कळकाचीं बेटें फार. या कळकांच्या चार जाती आहेत.त्या कळक, मेस, मानगा आणि चाकी; यांपैकीं ज्यांस मेस किंवा रानचिवे अगर उडे असें ह्मणतात, त्यांच्या कांब्या कापून सुरेख तयार करून बाजारांत धावडलोक पुष्कळ विकावयास आणितात.या शिवाय या जंगलांतील गेळा, चिमुट, पांढरी, मेडशिंगी, वगैरे झाडांच्याही कांब्या येथें विकत मिळतात. यामुळें येथें कांठया

स्वस्त व विपुल मिळत असले कारणानें बाहेरून येणारे लोक येथून त्या नेहमीं हव्या तेवढ्या आपले बरोबर विकत घेऊन जातात. बाकीचे प्रकारचे कळक इमारतीचे उपयोगीं आहेत.

### नेचे व ऑर्चिड.

येथील जंगलांत पांच मैलाचे त्रिज्येचे वर्तुळामध्यें सुमारें २३ प्रकारचे नेचे सांपडतात.

या नेच्यांचीं झाडें रानांतून काढून आणून तीं साहेब लोक कमानीला वगैरे मोठ्या हौसेनें लावून एखाद्या समारंभाचे व थाटाचे वेळीं स्थळ सुशोभित करितात. याची फांदी हातांत घेऊन पाहिली तर त्याचे मधील दांड्याच्या दोही अंगांस लहान लहान पानांच्या बारीक काडीचे सरळ फांटे असून ते खालून शेंड्याकडे निमूळते होत जाऊन अगदीं शेवटीं त्यांस आंकड्यासारखें वळण आलेलें असतें. अशा प्रकारचे नेचे मुंबईस मलबारहिलकडून हँगिंग गार्डनला जातांना लागणाऱ्या बागेजवळच्या रस्त्यावर बरेच दृष्टीस पडतात व ते मोठे शोभिवंत दिसतात. त्यांचें बेणें बहुतकरून महाबळेश्वराकडूनच गेलें असेल असें अनुमान

आहे. येथील राहणारे लोक या नेच्याच्या झाडांचा उपयोग येथून बटाटे, विलायती वाटाणा व दुसरीं कांहीं फळें मुंबई वगैरे बाहेर गांवीं पाठविण्याकडे पार्सलांत रिती जागा भरून काढण्यास करितात; व खळ्या खणणाऱ्या पावसाच्या संततधारीपासून घरांच्या भिंतीस धक्का पोहोंचूं नये ह्मणून ह्यांचें जणूं काय पांघरूण बनवून त्यांत पावसाळ्याचे पूर्वीं घरें गुरफटून टाकण्यासही यांचा फार उपयोग आहे!

येथील पावसाच्या पराकाष्ठेमुळें येथील झाडांवर व दगडांवर किती शेवाळ जमतें याची कल्पनासुद्धां मैदानांत राहणाऱ्या लोकांस करितां येणार नाहीं. कोणत्या पाहिजे त्या झाडापाशीं जा, आणि त्याला बोट लावा, कीं, तें इंचअर्धइंच तरी शेवाळीच्या लेपांतून आंत जाईलच. एखाद्या भांड्यावर ज्याप्रमाणें मातीचा जाड लेप चढवावा, त्याप्रमाणें झाडांच्या सर्व खोडभर या शेवाळीचा लेप झालेला असतो व कित्येक फांद्यांवरून हे शेवाळीचे लोंबणारे पुंजके, तपाचरणांत फार दिवस गढून गेल्यामुळें स्मश्रु करण्यास संधि न सांपडलेल्या तापसांच्या रांठ दाढ्यांप्रमाणें किंवा एखाद्या

केंसाळ वनचराच्या अंगावरील लोंकरीप्रमाणें दिसत असतात. तसेंच घरच्या कंपौंडाकरितां घातलेले सुक्या दगडाचे गडगडे अगदीं बुरसून गेल्यामुळें चोहोंकडे गारेगार झालेले दिसतात. ही शेवाळ गोमलगाईच्या अंगाप्रमाणें अगदीं गुलगुलित असते. साहेबलोक इचे फार भोक्ते आहेत. ते उशागिर्द्यांच्या खोळींतूनही ही भरून हिचा सुरेख उपयोग करितात. झाडावर शेवाळाच्या योगानें जीं लहान लहान फुलझाडें उगवतात तीं गोळा करण्याचा या लोकांस फार नाद आहे. या झाडांस हे लोक " ऑरकिड् " असें ह्मणतात. हीं कोयना खोऱ्यांत पुष्कळच सांपडतात. तेथून आणून महाबळेश्वरचे कुणबी त्यांच्यावरही चार दोन आणे मिळवितात. अलीकडे तर हीं बहुतेक बडे लोकांस आपले बागेत असावींतसें वाटूं लागलें आहे. हीं घेऊन जाणारे लोक बहुतेक मुंबईकडील राहणारे असतात. झाडांस किंवा पिकांस शेवाळाचा उपयोग खताप्रमाणें केला असतां फार चांगला होईल. साहेबलोक वगैरे हीं नेऊन पदार्थ संग्रहालयांतील भिंतीवर टांगून ठेवितात. तेव्हां याची फार शोभा दिसते.

## परदेशांतील झाडें.

इंग्लंडाहून ओकच्या झाडाचीं फळें परलोकवासी रेव्हरंड वुइल्सनसाहेब यांनीं सुमारें ५०।६० वर्षांपूर्वीं आणून येथील घरवाले मालकांस ओकचीं झाडें तयार करण्याकरितां मोफत वाटलीं होतीं. त्या बेण्याचीं तयार झालेलीं ओकाचीं झाडें सिंडोला पार्क बंगल्यांत, व दि आक बंगल्यांत आहेत; आणि ओल्ड डोले नांवाच्या ह्मणजे मुरारजी क्यासल बंगल्याच्या खालील बागेंत पूर्वीं दृष्टीस पडत असत परंतु तीं हल्लीं नाहींत. या हवेंत तीं बरीच मोठीं झालीं आहेत; परंतु विलायतेंत जेवढीं मोठीं व उंच होतात असें सांगतात, तेवढीं मोठीं येथें झालीं नाहींत. यांपैकीं पाहण्यासारखीं दोन मोठालीं झाडें सिंडोला बंगल्यामध्यें दर्शनी बाजूस आहेत. श्रीमंत मिरजकर संस्थानिक यांनीं त्या झाडास दगडी पार बांधून त्यांची व्यवस्था चांगली ठेवली आहे.

या शिवाय ग्रेव्हिलिया, रोपस्टा, क्याशारिना, व युक्यालिप्टस या परदेशी झाडांच्या रोपांची लागवड पांच मैलांच्या आंतील लिंगमळा आणि गुरेंघर या ठिकाणीं तयार करण्याकरितां यत्न चालला आहे.

हीं रोपें एकंदर पांच हजार आहेत. हीं झाडें सुरूच्या झाडांप्रमाणें उंच असून शोभिवंत दिसतात. हल्लीं हीं पांच फूट उंच झालीं आहेत. आणखी तीन फूट उंच होऊन मालकमपेठच्या मुसळ धारांचा पावसाळा त्यांस सहन होईशीं झालीं ह्मणजे नर्सरींतून काढून फारेष्टांत यांची लागण करितात. हीं झाडें चांगलीं दिखाऊ आहेत. हल्लीं या झाडांची लागण फारेस्ट खात्याकडून बंदीचे जागेंत करण्याचें काम सुरू आहे.

येथें कोणतेंही फळझाड पावसाळ्यांत मुळींच लागत नाहीं. विलायती फळझाडांपैकीं राजबेरी, स्ट्राबेरी, व गुजबेरी हीं झाडें येथें लावितात पण तीं पावसाळा खलास झाल्यापासून पुनः पावसाळा लागेपर्यंतच लावलीं जातात. पावसाळाभर हीं झाडें कशीं तरी राखून बेण्याकरितां ठेवावीं लागतात. त्याचप्रमाणें हिंवाळ्यांत विलायती वाटाणा, फ्रेंचबीन हींही येथें उत्पन्न करितात.

## वनस्पति.

औषधी पदार्थ तीन प्रकारच्या कोटींत सांपडतात- खनिज, उद्भिज्ज व प्राणिज. त्यांपैकीं प्राचीनकाळा-पासून खनिज द्रव्यांच्या उपयोगापेक्षां वनस्पतींचाच उपयोग पृथ्वीच्या अनेक द्वीपांतील वैद्य ज्यास्त करीत आले आहेत असें दिसतें. कारण, खनिज द्रव्यांपैकीं जे धातू व उपधातू आजपावेतों प्रसिद्धीस आले आहेत, त्यांतील वीर्य अनेक योगांनीं व प्रका रांनीं रोग हा जो कोणीएक अदृश्य शत्रु आहे त्याच्या उपशमाकरितां योजितां येतें, व त्यांजपासून वनस्प-तींच्या रसांसारखे असंख्य कल्प अथवा रससंयोग उत्पन्न करितां येतात असा थोडा अनुभव आहे. परंतु त्यांच्या नानाविध संयोगाची माहिती जशी पाहिजे तशी अजून लागली नसल्यामुळें आजपर्यंत त्यांचे प्रयोग रोग्यांवर कित्येक वैद्य निवळ साहसानें करीत आले व तसें केल्यानें त्यांजकडून अनेकवेळां प्रमाद घडल्याचेंही ऐकिवांत आहे. तशा प्रमादापासून कधीं कधीं बलनाश अथवा प्राणनाशही घडला असावा. वनस्पतींची तशी गोष्ट नाहीं. औषधी रसांचीं कार्यें-

बहुधां नियमित आहेत, असा सुप्रकृति व स्वस्थ प्रकृतीच्या माणसांवर तत्ववेत्त्यांनीं प्रयोग करून अनुभव घेतला आहे. कधीं कधीं चुकून अथवा वैद्यांच्या प्रमादानें अन्नेतर (अन्न अथवा पौष्टिक आहाराबाहेरचे) पदार्थांचें मनुष्यानें सेवन केल्यामुळें जीं अस्वस्थतेचीं अथवा इंद्रियव्यापार बिघडल्याचीं लक्षणें होतात त्यांचाही क्रम नियमित आहे, असें सिद्ध होतें. त्याचप्रमाणें विवक्षित वनस्पतींची शरीरावर विवक्षित कार्यें होतात व त्यांतील सत्वांची अशनमात्रा अथवा भक्ष्यप्रमाण कमजास्त झालें असतां रोगांचीं लक्षणें बदलतात असेंही आढळून आलें आहे. अशा वनस्पतींच्या क्रियेंत आपल्या चुकीनें सत्वनाश व कुसंयोग जरी उत्पन्न होतात तरी ते सृष्ट कार्यांत स्वाभाविक क्रमानें क्वचित् होतात, ह्मणून ती क्रिया बिनचूक साधल्यास अनेक नवे नवे रोग हटविण्याचें सामर्थ्य वैद्यांस अथवा कल्पकांस येतें, असें असल्यानें वनस्पतींचा उपयोग औषधि करण्यास फार होतो. परंतु त्यांची माहिती व ओळख फारच थोडया वैद्यलोकांस असते. यामुळें वरचेवर ताज्या वनस्पति बिनचूक मिळणें कठिण पडतें.

रहात असतात. याही पुरत नसल्यामुळें फ्रिअरहाल आणि पोष्ट आफिस यांच्या दरम्यानच्या उच्चस्थानीं आणखी सहा खोल्या बांधिल्या आहेत.

ह्या सहा खोल्यांचे मागील बाजूस चार लॉन्टेनिस कोर्टें व बुडहौस नजिक बॅडमिंटनकोर्ट अशीं केलेलीं आहेत, तीं क्लबच्याच मंडळीकरितां आहेत. फ्रिअर हालच्या मागील दरवाज्यापासून जी उतरण आहे तिचे तळांतील सपाटीच्या ठिकाणीं जिमखान्याचें मैदान आहे. यांत बायकांचा गोळीबार, गोल्फ, पोलो, शर्यती, घोड्याची दौड व इतर खेळ चालतात.

महाबळेश्वरास एक दोन मोठीं हाटेलें आहेत; मोठें पुस्तकालय व पत्रकालय आहे; उघड्या हवेंत खेळण्याचीं कोर्टें आहेत. टांग्यांत बसून हिंडण्यासारखे, घोड्यावर स्वार होऊन दौड करण्यासारखे, किंवा सकाळ संध्याकाळ हवा तितका व्यायाम करण्यासारखे लहान मोठे, निर्भय, व एकांत असे रस्ते आहेत; प्रार्थना करावयाची झाल्यास ख्रिस्ती देऊळ आहे; एक कबरस्तान आहे; जिमखाना आहे; नाटकगृह आहे; शर्यतीचे राउंड आहे; होड्या फिरविण्यासारखें तळें

आहे; गव्हर्मेंट हौस ह्मणजे सरकारी बंगला आहे. लॉनटेनिसकरितां कांहीं जागा कमी पडत होती ती लार्ड हारिस यांनीं सरकारी बंगल्याच्या हद्दींतील कांहीं झाडी तोडवून लागलींच तयार करून दिली. तसेंच बंगल्याच्या जवळ पोलोची जागा पाहिजे असें वाटल्या बरोबर झाडी तोडवून जागा तयार करून दिली गेली.

येथें येणारे आमचे जहागिरदार, राजेरजवाडे व बडे लोक यांनाही चैन करण्यास कांहीं कमी साधनें आहेत असें नाहीं. हे ज्या बंगल्यांतून राहिलेले असतात ते बहुतेक त्यांच्या मालकीचेच असल्यामुळें त्यांचे कंपौन्डांत सर्व सोयी करून घेऊन ते आपल्या इष्ट मित्रांबरोबर वाटेल तशी मौज करीत असतात; यामुळें यांचाही वेळ निष्काळजीपणांत व आनंदांत गेल्यानें यांच्या प्रकृतीसही फायदा होतो. परंतु साहेब लोकांप्रमाणें समाज करून खेळण्याच्या यांच्या येथें कोठेंही जागा नाहींत; तथापि एकमेकांच्या बंगल्यावर जाऊन मेजवान्या घेणें, मनोल्हादक गाणें ऐकणें वगैरे मजा मारण्यानें येथें जमलेल्या मंडळीचें प्रेम जास्त वाढून चांगले स्नेह जमत असतात.

# महाबळेश्वरीं येणारे लोकांच्या वेळाचा व्यय.

शरीरसमृद्धीस मुख्य कारणें येथील हवा व रमणीय ठिकाणीं फिरणें हीं होत.

याकारितां पहाटेंस मोठ्या झुंझुरका सूर्योदयापूर्वी उठण्याचा येथें परिपाठ आहे, व कोंवळें उन्ह पडतें तोंच व्यायाम करून घरीं परत यावें हा विहित मार्ग आहे. परंतु या नियमास उल्लंघणारे पुष्कळ असतात. कारण पांच वाजतां साखर झोंप मोडून थंडीच्या तडाक्यांत उठण्याचा निश्चय सर्वांचे हातून चालत नाहीं. याकरितां उशीरानें उठून व उशीरानें व्यायाम करून परत येणारे लोक फार आढळतात. आणि मुख्यत्वेंकरून आपल्या लोकांमध्यें अशा प्रकारचा आळस पुष्कळ आढळतो. इंग्रज लोकांच्या नियमांत मात्र अंतर होत नाहीं. ते सकाळच्या वेळीं घोड्यावर बसून रपेटीस जातात. तथापि पायीं फिरण्याचाही प्रघात

फार आहे. सायंकाळीं फिरते वेळीं मात्र गाड्या घेतात. दिवसास उत्तमान्नसेवन किंवा मित्र मंडळीकडे मेजवान्या होत असतात. पुढें साडेचार पांच वाजेपावेतों गंजिफा, बुद्धिबळें वगैरे घरांतील खेळ चालले असतात. मग उन्हें जात चाललीं ह्मणजे बग्या, फैटणी, शिग्राम, टांगे वगैरे यांत बसून थव्यांचे थवे पुनः बाहेर फिरण्यास निघतात. व कोठें तरी सुंदर व रमणीय ठिकाणीं बसून सुस्वर, मनोरम आणि वीरश्रीजनक किंवा आनंदकारक वाद्यसंगीत ऐकतात. या ठिकाणीं हजारों रुपये खर्च करून विहाराच्या जागा तयार केल्या आहेत. तेथें क्रिकेट व बाडमिंटन हे खेळ मोठ्या झपाट्यानें चालले असतात. यांपैकीं क्रिकेट ह्मणजे काय व त्यापासून हितावह परिणाम काय होतात हें सांगणें नको. परंतु इंग्रज लोकांमध्यें हा खेळ अलीकडे किंचित् मागें पडत चालला आहे; व बाडमिंटनचा नाद इंग्रज लोकांस चोहोंकडे अतिशय लागला आहे. क्रिकेटपेक्षां हरएक प्रकारें याजपासून फायदे फार आहेत. स्त्रियांचे कोमल जातीस तर हा खेळ फारच प्रशस्त आहे. सुमारें दहा हातांचे अंतरावर

दीड पुरुष उंचीचे खांब रोंविलेले असतात. व त्यांच्या वरच्या भागाला, अडीच तीन हात रुंदीचा जाळीदार तारांचा एक पत्रा बांधितात, आणि दोन्ही बाजूनें खेळ-णारे लोक उभे राहून या पत्र्यावरून या बाजूकडून त्या बाजूकडे पिसांचीं फुलें टाकीत असतात. या खेळाचें वेड इंग्रज लोकांस व विशेषेंकरून त्यांच्या स्त्रियांस इतकें असतें कीं, महाबळेश्वरीं दुसरा कांहीं नियमित उद्योग नसल्यामुळें प्रत्येक दिवशीं निमेअधिक काळ बाडमिंटन खेळण्यांत गुजरतो. राजविलासी मेज-वान्या कधीं गव्हरनर साहेबांकडे, कधीं सेनाधिपतीकडे, कधीं इतर श्रीमंत लोकांकडे होतच असतात. अशा प्रसंगीं गायन सदोदित चालत असतें. याखेरीज आठ दहा दिवसांनीं फ्रिअर हालमध्यें नाट्यनाटकें होत असतात. कधीं कधीं वेण्या सरोवरावर जलक्रिडेक-रितां पुष्कळ लोक जातात व इतर रमणीय ठिकाणीं वनभोजनें वारंवार होत असतात. धर्मादायाची सत्कृत्येंही येथें होत असतात. सारांश—या ठिकाणीं ऐहिक अर्थास अनुलक्षून तनु, मन, धन, खर्च करून इंग्रज लोक शारीर सुखाच्या पाठीमागें लागलेले असतात. व्यग्रता किंवा

चिंता उत्पन्न करणारीं कामें ते बिलकुल करीत नाहींत. परंतु केवळ शरीराची समृद्धि व चित्ताची प्रसन्नता ते ठेवीत असतात.

इंग्रज लोकांत विवाह होतात ते स्वयंवरविधीनें होत असतात. ते होण्यास प्रथमतः उपवर वधुवरांचा विद्या, नीति, कला, वगैरेंचा तपास होऊन एकमेकांची परीक्षा करण्याची त्यांच्यामध्यें आवश्यकता असते. तशी परीक्षा होण्यास एकमेकांची भेट होणें इष्ट आहे. तेव्हां हा भेटीचा योग येथें फिरते वेळीं, खेळांमध्यें, नृत्यगायनाचे समयीं, भोजनें व वनविहार यांच्या निमित्तानें, अनायासें घडून येतो. तेणेंकरून परस्पर संघट्टण व मैत्री होऊन वाक्निश्चय होऊन जातात; व महाबळेश्वराहून खालीं गेलें, ह्मणजे लग्नांची एकदम गर्दी उडते. याकरितां शुद्ध, निर्मळ, व निष्कपटी प्रेमाच्या वृद्धीस महाबळेश्वरचें हें स्थळ सर्वांशीं उपयोगीं आहे.

आपल्या राजेरजवाड्यांपैकीं जे दोन चार गृहस्थ येथें येतात, त्यांना व मोठमोठ्या व्यापाऱ्यांस जास्त कमी पैसा खर्च करण्याचें सामर्थ्य असल्यानें महाबळेश्वरचें सुख बरें मिळतें. तरी त्यांचा बहुतेक सर्व ऐषा-

राम उंबरठ्याच्या आंतल्याआंत असल्यामुळें शारीरिक समृद्धिपेक्षां मानसिक सुखाच्या लहरींत ते अगदीं गढून गेलेले असतात. बाहेरील उघड्या हवाशीर ठिकाणीं, सकाळ सायंकाळ फिरून येण्यापलीकडे, यांजकडून जास्त कालक्रमण होत नाहीं. दुपारीं किंवा रात्रींच्या वेळीं त्यांच्या बंगल्यांतून खेळ, गाणें, किंवा शिळो-प्याच्या गप्पा मारणें या व्यवसायांत आपल्या मित्रमंड-ळीसह ते गर्क होऊन गेलेले असतात. कोणी कोणी बडे लोक आपल्या बंगल्याचे कंपौंडांतच टेनिस कोर्टें तयार करून आपल्या सैंगड्याबरोबर खेळ खेळत असतात. कित्येक वेळीं जिमखान्याच्या जागीं जाऊन साहेब लोकांच्या नानाप्रकारच्या घोड्यावरील वगैरे खेळांचे चमत्कारही पहावयास कित्येक जातात. त्यांच्या क्रीडा पाहून वेळ कसा आनंदानें घालवावा याचा कित्ता घेण्यासारखा आहे.

---

## घोड्यावरून अगर गाडींतून फिरावयास जाण्याचीं ठिकाणें व पादचारी लोकांना रपेटीस किंवा व्यायाम करण्याचीं ठिकाणें.

भव्य अशा सृष्ट किंवा कृत्रिम वस्तु पाहण्याची हौस सर्व लोकांस असते. अशा वस्तु आमच्या देशांत कांहीं थोड्या थोडक्या नाहींत, परंतु अति परिचया-मुळें संनिध असलेल्या प्रेक्षणीय व वर्णनीय वस्तूंची आपल्या हातून अनेक वेळां अवज्ञा होते, आणि त्या-मुळें त्या वस्तूंच्या दर्शनापासून होणाऱ्या ज्ञानास व आनंदास आपण अंतरतों. त्याचप्रमाणें येथील उंच उंच भयंकर कडे, मोठमोठे धबधबे, अनेक शैल-समुदाय, घनदाट झाडी, रायगड, प्रतापगड, यां सारखे किल्ले, यांची आजपर्यंत स्थिति झाली आहे. कारण, त्यांजकडे कोणींच लक्ष देऊन त्यांच्या प्रेक्षणीय स्थि-तीचें कधींही वर्णन करून ते लोकांत प्रसिद्धीस आणले नाहींत. अखेरीस परके लोक येथें येऊन येथील वस्तूंच्या आल्हादजनक दर्शनानें तल्लीन होऊन जाऊन जेव्हां

हजारों रुपये खर्च करूं लागले, व नानातऱ्हेच्या मजा मारीत फिरूं लागले तेव्हां कोठें आम्ही जागे झालों. परंतु अलीकडे आमचे लोकांस ही जागृति होऊन ऐतिहासिक स्थळें पाहण्याची इच्छा झाली आहे. ही अत्यंत अभिनंदनीय स्थिति होय अशा उत्सुक शोधकांस उपयोग व्हावा ह्मणून या पुस्तकांत येथील दर्शनीय वस्तूंची वेडींवांकडीं वर्णनें दिलीं आहेत, तीं वाचून किंवा ऐकून त्या पाहण्याविषयीं त्यांच्या अंतःकरणांतली उत्सुकता अधिक तीव्र झाली पाहिजे.

महाबळेश्वरीं दाट झाडी असल्यामुळें बसल्या ठिकाणीं फार वारा मिळत नाहीं, व हवेच्या थंडपणामुळें वारा घेण्याची इच्छाच होत नाहीं ही गोष्ट निराळी; पण एखादे वेळीं बंगल्यांतल्या बंगल्यांत किंवा घरांतल्या घरांत सोसाट्याची झुळूक पाहिजे, असें कोणी ह्मणेल तर ती त्याला सहसां प्राप्त व्हावयाची नाहीं. याचें कारण उघडच आहे. झाडें हे पंखे खरे पण हे सजीव पंखे हालूं लागून त्यांपासून वारा सुटण्यास हीं झाडें फार विरळ असलीं पाहिजेत. येथें तर तीं

एकमेकांस लागून गेलीं असल्यामुळें, ऊगोदर तीं मोठ्यानें हालत नाहींत व थोडी बहुत हाललीं, तरी त्यांपासून मोठा वारा सुटत नाहीं. तसेंच बाह्य प्रदेशांतून आलेला वाराही या झाडांत गुरफटून जातो आणि क्षणोंक्षणीं लहान लहान टेकड्यांचा व वृक्षरायीचा त्यास प्रतिबंध होत असल्यामुळें त्याची गति खुंटते, आणि सर्वत्र सामसूम होतें! ज्याला वाहता वारा पाहिजे असेल, त्यानें आपला बंगला किंवा घर सोडून एखाद्या उंच व मोकळ्या ठिकाणीं गेलें पाहिजे. अशी येथें दाट झाडी लागून गेली असल्यामुळें अशा मोकळ्या जागा येथें मुद्दाम केलेल्या आहेत त्यांस पांइट म्हणतात. या पांइटाला येण्यास गाड्याचे घोड्याचे व पायीं जाण्याजोगे रस्ते केलेले आहेत.

ज्याप्रमाणें एखाद्या मोठ्या किल्ल्याच्या तटांस सोडून पुढें आलेले बुरूज असतात त्या प्रमाणें पर्वताच्या मुख्य रांगेपासून उजव्या व डाव्या बाजूस कांहीं कांहीं अंतरावर फुटलेल्या ज्या शाखा किंवा बाहू दिसतात त्यांस पांइट असें ह्मणतात. अशा प्रकारच्या दोन पर्वत शाखांत किंवा बाहूंत

मोठी थोरली दरी असते. या बाहूंच्या टोंकांस येऊन उभें राहिलें ह्मणजे समोरचा डोंगराळ प्रदेश साफ दिसतो आणि प्रतिबंधाच्या अभावामुळें जोरानें वाहणारा वारा मिळतो. साहेब लोकांनीं या पाइंटांवर हवा खात बसण्यासाठीं फार चांगल्या सोई केल्या आहेत, त्या अशा कीं त्या ठिकाणीं आसपासची झाडी तोडून व जमीन साफ करून गाड्या फिरविण्याजोगें मैदान केलेलें असतें, आणि पाइंटाच्या शेंवटास येऊन उभे रहाणाऱ्या जिज्ञासु प्रेक्षकांचा सृष्टिसौंदर्य अवलोकन करण्याच्या नादांत, तोल जाऊन कडेलोट होऊं नये, ह्मणून पाइंटांच्या सभोंवती बहुधा दगडी भिंत घातलेली असते. अशा या रम्य स्थळीं अनेक युवयुवती सकाळ संध्याकाळ आपली करमणूक करण्यासाठीं येत असतात. तथापि या ठिकाणीं कोणास जी कांहीं करमणूक करून घ्यावयाची असेल ती त्यानें सकाळीं सहा वाजण्याच्या पुढें व संध्याकाळीं सहा वाजण्याच्या अगोदर करून घेतली पाहिजे, तसें न केल्यास एखादे वेळीं प्राणांतिक अवस्था होणेचा संभव आहे.

येथें जे पाइंट किंवा शैलबाहू पाहण्यासारखे आहेत, त्यांत बाबिंगटन, लाडवुइक, एलफिन्स्टन व आर्थर पाइंट हे प्रमुख आहेत. बॅांबे, कारनॅक, सासून वगैरे दुय्यम प्रतीच्या शाखा आहेत. याशिवाय कनाट पीक मौंट मालकम, रे व्हिला (गव्हर्मेंट हौस) वगैरे ठिकाणें पाहण्यासारखीं आहेत.

## बाबिंगटन पाइंट.

हा पाइंट दक्षिण दिशेला मालकम पेठेपासून दोन मैलांवर आहे. येथें येण्याचा रस्ता फार चांगला आहे. हा रस्ता बाजारांतून फाउंटन हाटेलवरून चालला आहे. सासून पाइंट उजवे बाजूला टाकून पुढें गेलें ह्मणजे अर्धमैलभर चढ उतार बराच आहे. येथून पुढें जेथें रस्ता थोडा पश्चिमेस वळतो, तेथून अगदीं पाइंटाला जाईपर्यंतचा अर्धा मैल जातां जातां तोंडाला साधारण फेंस येऊन जातो व धापही लागते. हा चढ चढला ह्मणजे मनुष्य पाइंटावर येऊन पोहोंचतो.

हा पाइंट सुमारें ४२००' फूट उंच आहे. ह्या ठिकाणाहून कोयना खोरें व सॅंडलॅंगहिल हीं फार छानदार दिसतात. शिवाय दुसरी वनशोभाही बरीच

दिसते. बाबिंगटन पाइंट व सातारा रस्ता याचे दरम्यान एक खोरें आहे त्याला ब्लूव्हाली असें ह्मणतात. येथून सोळशी खोरें फार रमणीय दिसतें. बाबिंगटन पाइंटवरून सातारा रस्त्यास येऊन तेथून इकडे येण्यास गाडीरस्ता चांगला आहे.

## लाडवुइक पाइंट.

सिडने बेकवुइथ साहेबांचें नांव प्रथम लाडवुइक पाइंटाला दिलें असल्यामुळें त्याला सिडनेपाइंटही ह्मणतात. परतु सन १८२७ मध्यें लाडवुइक साहेब अगदीं प्रथम येऊन सिडने पाइंटचे टेंकडीवर उतरले होते. त्यांचें नांव या पाइंटाला ठेवावें ह्मणून पुढें सरकारचा हुकूम झाल्यावर लाडवुइक पाइंट असें लोक ह्मणूं लागले. महाड रस्त्यानें जाऊ लागलों ह्मणजे उजवे कडच्या बाजूला जे रस्ते फुटलेले आहेत त्यांतील दुसऱ्या रस्त्याला वळावें, पुढें आणखी एक फूटवाट लागते, तेथेंही उजव्या हातच्या रस्त्यानेंच येथें यावें. रस्त्याला जातांना उतार व येतांना चढण आहे तथापि या रस्त्यानें गाड्या बेधडक जातात. या रस्त्याला दुतर्फा झाडी आहे. कित्येक जागीं वृक्षाची इतकी गर्दी

आहे कीं, त्यांत सूर्याचें किरणांचा प्रवेश बिलकूल होत नाहीं; व भर दोन प्रहरीं सायंकाळचा भास होतो. या मार्गानें सपाटी ह्मणून अगदीं नाहीं. दीड कोसपर्यंत जातांना एकसारखी खोल खोल व कित्येक ठिकाणीं अगदीं घसरती उतरण लागते. ही उतरण उतरून कोयनेच्या खोऱ्यांच्या किनाऱ्यावर गेलें ह्मणजे पुढें जाण्याचा गाडीमार्ग खुंटतो. ह्मणून इकडे पाहण्यास येणारे लोकांना येथेंच गाड्या उभ्या कराव्या लागतात. या ठिकाणीं येण्यास याशिवाय आणखी एक "ड्यांटु-बिरशेबारोड" नांवाची पाऊलवाट मुंबई पाइंटाजवळ महाड रस्त्यापासून फुटते. या वाटांनीं येथें कोयनेच्या खोऱ्याचे किनाऱ्यावर दाखल झाल्यावर स्वतः पायीं किंवा घोड्यावरून पुढें अगदीं पाइंटावर जाण्यास तयार व्हावें लागतें. ज्याप्रमाणें लीलेनें हत्ती आपली सोंड समोर करितो त्याप्रमाणें या पाइंटच्या पर्वताची पाव मैलपर्यंत लांब बारीक टोंकदार भूशलाका एकदम खोऱ्यामध्यें घुसते. या सोंडेवरून जातांना मार्ग कांहींसा नागमोडी-सारखा चिंचोळा असून दोन्ही बाजूंनीं सुमारें तीन तीन हजार फूट खोलीचीं खोरीं आहेत. यास्तव

जाणारा आपल्या जिवाला भीतभीत व चक्कर येण्याच्या धास्तीनें, बाजूला न पाहतां कित्येक ठिकाणीं काठी टेंकीत टेंकीत या सोंडेच्या अग्रभागीं गेला ह्मणजे तेथें फक्त १२ फूट रुंदीच्या टोंकावर येऊन पोहोंचतो. या टोंकास आपले लोक डोमेश्वर व साहेबलोक **नोज ( नाक )** असें ह्मणतात.

या ठिकाणाहून जो कांहीं अद्भूत चमत्कार दृष्टीस पडतो, त्याचें वर्णन देतां येत नाहीं. पाहणाराच्या मनासच तें विचारलें पाहिजे. वृक्षवनस्पतींचा हिरवा गार अफाट समुद्र पुढें पसरलेला असतो. त्यांत शपथेला बोटभर देखील जागा हिरव्या रंगाखेरीज दिसत नाहीं. व हें हिरवें मैदान सभोंवतील पर्वताच्या कोंडमाऱ्यांतून निघून मोठें होत होत अखेरीस क्षितिजास जाऊन भिडतें. या चमत्कारानें क्षुद्र जंतुवत् पाहणारे जे आपण त्यांची दृष्टि अगदीं फांकून जाते. पायाखालीं तीन हजार फुटीची भिंत उभी पाहून नजर ठरत नाहीं. झोंक गेला तर रसातळास जाण्याची भीति असते. डावेबाजूस मुंबई पाइंट व प्रतापगडचा सुळा उघडा बोडका उभा असतो. पुढें कांहीं अंतरावर

एकमेकाबरोबर युद्ध करण्यास महा राक्षस उठल्याप्रमाणें कोणी वांकडातिकडा, कोणी नीट, कोणी दुसऱ्याच्या अंगावर रेललेला, कोणी झोंबी खेळण्यास चाललेला असे डोंगर दृष्टीस पडतात.

उजवे बाजूस एलफिन्स्टन पाइंट व सावित्रीचा भयंकर खोल दरा आपल्याकडे टेहळून पाहत असतो. तो वरून एक मैल रुंद व दोन मैल लांब असावा असा दिसतो. या दऱ्याचे दुसऱ्या बाजूला एलफिनस्टन पाइंट कड्याचा प्रेक्षणीय भाग आहे या अंगास नदीकिनाऱ्यानें गर्द झाडी, हिरवीं गार पिकें अगदीं आच्छादित होऊन गेलीं असतात. अशीच पलीकडे नजर फेंकिली ह्मणजे सावित्री नदी महाडावरून माहेराहून सासरी जात असल्याप्रमाणें सावकाश समुद्रकिनाऱ्यावरून वाहत चालली आहे असें दिसतें. येथून उत्तर कोंकण प्रदेशांतील लहानसान टेंकड्या सोंगट्या मांडल्याप्रमाणें दिसतात. तशा दुसरे कोणत्याही ठिकाणापासून दिसत नाहींत.

## लाडवुइकचें स्मारक.

सरकारचे हुकुमानें जनरल लाडवुईक साहेबांच्या मुलानें या ठिकाणीं हा स्मारकाचा एक स्तंभ बांधून ठेविला आहे. हा त्यावरील घुमटासुद्धां जमिनीपासून सुमारें २५ फूट उंच आहे. या स्तंभाचे पश्चिमांगास संगमरवरी दगडाचा साहेबबहादुरांचा मुखवटा ( bust ) एका लोखंडी चौकटींत घालून गाडलेला आहे व चौकटीचे बाहेरून जस्ती तारेचीं वेष्टनें दिलीं आहेत. परंतु चौकटीलाच ताम्रा लागल्यामुळें तोंडावर डाग पडले होते, ते खरवडून काढलेले आहेत तरी यामुळें हा मुखवटा कुरूप झालेला दिसत नाहीं. या स्तंभाच्या दक्षिणेच्या बाजूस लेख लिहिला आहे तोः—

> “ इसेक्समधील श्रॉबरी येथील राहणारा जान लाडवुइकसाहेब यांचा दुसरा मुलगा जनरल पीटर लाडवुइकसाहेब यांचें स्मारक. ”

हा प्रथम सन १७९९ सालीं ईस्ट इंडिया कंपनीचा नोकर होऊन येथें आला. आणि ९० वर्षांची उमर होऊन हा सन १८७३ मध्यें फ्रान्समध्यें वाग्नेरिस येथें वारला. हिंदुस्थानांतील राणीसरकारच्या

सैन्यावरील नोकरींत यानें बहुतेक आयुष्य खर्च केलें होतें.

पूर्वेच्या बाजूस लेख आहे तोः—

"सन १८०३।४ सालीं सैन्यामध्यें जे फेरफार करण्यांत आले त्या वेळीं यानें आर्थर वेलस्लीसाहेबाच्या हाताखालीं सबालटर्नचे हुद्याची कामगिरी बजाविली होती. खडकीच्या लढाईंत ता० २५ नोवेंबर सन १८१७ मध्यें हा कपतान फोर्डच्या सैन्यांत ब्रिगेड मेजर होता. या वेळीं २८०० गोरे पायदळाच्या लोकांनीं पेशव्यांचा पराजय करून पुरंधर व दुसरे डोंगरी किल्ले घेतले, तेव्हां हा त्यांत होता. सन१८२४ मध्यें कितूर येथील पलटणीचाही हा नायक होता. पुढें हा मुंबईचा टाऊन मेजर झाला आणि शेवटीं सातान्यास रेसिडेंटच्या जागीं आल्यावर हिंदुस्थानांत येणान्या गोरे अम्मलदारामध्यें नोकरींत यानेंच पहिला नंबर मारला होता. या हवेपासूनचे फायदे यानेंच प्रथम लोकांच्या मनांत आणून दिले, आणि महाबळेश्वर हें हवा खाण्याचें ठिकाण करण्याचा योग आणिला. याप्रमाणें हें हवाशीर स्थान शोधण्याचें दीर्घ परिश्रम

करून मुंबईइलाख्याचे डोक्यावर यानें परोपकाराचा मोठा बोजा करून ठेविला आहे. "

उत्तरेच्या बाजूचा लेखः—

" लाडवुइकसाहेबाचे अशा दीर्घश्रमाबद्दल सरकारच्याच हुकुमानें या टोंकाला लाडवुइकपाइंट असें नांव दिलें आहे. सन १८२७ सालीं निबिड अरण्यांतून हळूं हळूं आणि अविश्रांत श्रम घेऊन यानें या स्थळीं येण्याचें धाडस केलें होतें; ह्मणून त्याचे स्मारकास हेंच योग्य स्थळ आहे असें समजून त्याच्या एकुलत्या एक मुलानें ही कबर येथें बांधिली आहे; हा मुलगा पहिल्यानें मुलकी खात्यांत शिरून पुढें १८७४ मध्यें मद्रास इलाख्याच्या अकौन्टंट जनरलच्या हुद्यावर गेला होता. "

## एल्फिनस्टन पाइंट.

हें टोंक माल्कमपेठेपासून सहा मैल व क्षेत्र महाबळेश्वरापासून एक दीड मैल आहे. या टोंकाचें नांव नामदार माउंट स्टुअर्ट एलफिनस्टनसाहेब यांच्यावरून पडलें आहे. सॅनिटेरियमकरितां जागा प्रथमतः या ठिकाणीं कायम करण्याचा बेत होता. परंतु

येथें पाण्याची कमताई असल्याकारणानें पुढें मालक-मपेठची जागा ठरली गेली, तेव्हां या ठिकाणीं त्यांनीं एक आपला बंगला बांधला.

हा पाइंट एका अजस्त्र कडयाचे टोंकावर असून, खालीं कोयनेच्या खोऱ्याची तीन हजार फूट खोल अशी एक भयंकर घळ आहे. या टोंकावरून डोकावणें फार धैर्याचें काम आहे. कारण, खालीं जो भव्य भयानक प्रकार दिसतो, तो पाहिल्यावर डोळे फिरून जाऊन अगदीं अंधारी येते; व पाइंटाचा खडक अगदीं घसरतां असल्यामुळें उभ्यानें पाहण्याची तर सोयच नाहीं. या घळीचे समोर प्रतापगडचा किल्ला उभा आहे. तसेंच सावित्रीनें महाबळेश्वराच्या मस्तकांतून निघून ज्या चिंचोळ्या खोऱ्यामध्यें चार हजार फुटांचे उंचीवरून धाडकन् उडी टाकिली आहे त्या खोऱ्याचा प्राग् भाग एल्फिनस्टन पाइंटाच्या उत्तरेस आला आहे; व पश्चिमेस समुद्रसुशोभित कोंकणपट्टी सरधोपट पसरली असून त्यावरील लहान लहान डोंगर व टेंकडया कित्येक काळ्या, बहुतेक भुऱ्या व मधून मधून हिरव्या दिसतात. हा किंचित् उंच सखल

प्रदेश उत्तरोत्तर अफाट पसरत जाऊन क्षितिजाशीं मिळाला ह्मणजे आकाशाचे भिंतीला अपरंपार गलथा मारल्याप्रमाणें दिसतो. व नभस्थलापासून ह्या गलथ्याचा फुगीरभाग किंचित् पुढें येऊन त्याचा रंग नीलवर्ण, पांडुर व कोठें कोठें गुलाली झाकीचा असतो. हा गलथा समुद्राच्या पाण्याचा होय. समुद्र व घाटमाथा यांजमध्यें तीस पस्तीस मैलांचें अंतर असल्यामुळें समुद्राचें पाणी नलिकायंत्रानें पाहिल्याखेरीज ओळखतां येत नाहीं. शिवाय ऊन असल्यास रविकिरणें मध्यें आल्यानें, परावर्तनादि व्यापार मेघमिश्रित वातावरणांत होऊन समुद्राच्या पाण्याचा विस्तीर्ण ढीग कांहीं एक विलक्षण रंगाचा दिसतो व या उदकाची लंबायमान रेखा पश्चिमेचे आभाळामध्यें ढळढळीत दिसत असते.

एलफिनस्टन पाइंट आणि आर्थरसीट पाहण्याला नेहमीं बराच वेळ लागतो. या पाइंटाच्या वरील बाजूस मजेखातर बाहेर भटकणारे किंवा वनभोजनाचे भोक्ते अशा लोकांकरितां म्युनिसिपालिटीनें एक लहानसा बंगला बांधिला आहे. त्यांत फर्निचर (सामान)

कांहीं ठिकाणीं ठेविलें आहे. यांत जेवणाच्या टेबला-वरील सामान नसून जेवण करण्यास आचारीही नाहीं. याचा उपभोग घेणारांस रोजची फी २ रुपये द्यावी लागते. या बंगल्याला नेहमीं कुलूप असून त्याची किल्ली सुपरिंटेंडंटसाहेबांच्या आफिसांतील ओव्हरसी-यरजवळ असते. ती सुपरिंटेंडंट साहेबांकडे मिळ-ण्याबद्दल अर्ज केला ह्मणजे कोणासही मिळते. तेथील सुखोपभोग घेण्याचें मनांत आल्यास प्रथम तेथें शिधा-सामुग्री पाठवावी आणि नंतर सकाळीं निघून तेथें जावें, हा उत्तम पक्ष होय. त्या बंगल्याला जाण्याचा रस्ता केवळ उन्हाळ्यांत माणसें जाण्यासारखा केला आहे. महाबळेश्वर गांव किंवा देवळापावेतों मालकम-पेठेहून चौचाकी गाडी नेण्यास कांहीं हरकत नाहीं. परंतु तेथून पुढें मात्र टांगे किंवा घोडीं जाण्यासारखाच रस्ता आहे. त्या बंगल्यांत वनभोजनास जाण्यासंबंधीं दुसरी एक अवश्य तजवीज करावी लागते ती ही कीं, त्या बंगल्याच्या मागील बाजूस बंगल्याला लागूनच असलेल्या खडकांतून जो एक वाहता झरा आहे, त्याचें पाणी गांवच्या गुरामाणसांनीं खराब

करूं नये म्हणून बंदोबस्ताकरितां आदले दिवशीं किंवा आपण तेथें जाऊन पोंचण्याचे पूर्वी कांहीं वेळ एखादा माणूस पाठवावा लागतो. त्याचप्रमाणें थंडीचे दिवसांत तेथें कोणी जाईल तर त्यानें आपल्या स्वयंपाक्याला बंगल्यांत कोठें मधाची पोळी लागली आहे कीं काय ह्मणून पाहण्यास ताकीद द्यावी; नाहीं तर यांनीं स्वयंपाकाच्या चुलीचा धूर केल्याबरोबर जर बंगल्यांत एखादें मधाचें पोळें लागलें असलें तर त्या पोळींतल्या माशा एकदम येऊन सर्वांवर धाड घालतील, आणि सर्वांना " ऊठ कीं पळ " करून सोडतील. असा दोनदां अनुभव आल्यामुळें ही सूचना दिली आहे.

एल्फिन्स्टन पाइंटवरून आर्थर सीटला जाण्याची जी गाडीवाट आहे तिचे पहिले मैलांत ब्रह्मारण्यांतील भस्माचे जागीं जाण्यास डावे हातास एक पाऊलवाट आहे. तिला रहदारी नसल्यामुळें ती चांगली मळलेली दिसत नाहीं. यामुळें ती नवीन गैर माहीत लोकांना एकदम लक्षांत येत नाहीं. या फूटवाटेला एक बोर्ड लाविला ह्मणजे जिज्ञासु लोकांना तेथें गेल्यावर बुचक-

ळ्यांत पडल्यासारखें होणार नाहीं. ही जागा औरस चौरस सुमारें २० फूट असून एक पुरुषापेक्षां जास्त खोल आहे. याचा असा चमत्कार आहे कीं यांतील माती ( भस्म ) पांढरी असून लोण्यासारखी नरम आहे. यावर गवतसुद्धां उगवत नाहीं. यावरून ब्रह्मारण्याचे वर्णनांत सांगितल्याप्रमाणें ही यज्ञाचे स्थंडिला (altar) ची जागा असावी असें वाटतें. कारण, नुसत्या राखेंत ( ashes ) झाड किंवा गवत कधींही यावयाचें नाहीं असा नियम आहे. त्यास अनुसरूनच येथील वस्तुस्थिति आहे. भस्माचे जागेला लागून सावित्रीच्या उगमाचा प्रवाह अस्मान कड्यावरून खालीं पडून दरींतून चालला आहे तोही पाहण्याची मोठी मौज आहे. एल्फिन्स्टन पाइंटापासून आर्थर सीटपर्यंतचा गाडीरस्ता कड्याच्या किनाऱ्यानें असल्यामुळें कड्याच्या बाजूला पारापेट ( कठडेवजा ) भिंत घातलेली आहे. तथापि येथें गाडी बेतानेंच हांकावी.

## आर्थरसीट.

हा पाइंट मालकमपेठेपासून आठ मैल व महाबळेश्वरक्षेत्रापासून पांच मैल आहे. हा पाइंट ब्रम्हारण्याकडे आहे. या पाइंटला जाण्यास महाबळेश्वरक्षेत्राला जाऊन, तेथून पुढें बोर्ड लाविला आहे तिकडील रस्त्याला वळून, ब्रम्हारण्यांतून जावें लागतें. समुद्राचे पृष्ठभागापासून याची उंची ४४२१ फूट आहे. यावरून इकडील बाजूच्या शैलशिखरांचा हाच मेरुमणी आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. या पाइंटानजीकच्या खुल्या जागेंत आर्थर मॅलेट साहेब झोंपडी बांधून राहिले होते. म्हणून यास आर्थरसीट असें नांव पडलें आहे.

या झोंपडीच्या खुल्या जागेपलीकडील उतरणीच्या घट्ट जमिनीवर मातींत खोंदून केलेल्या पायऱ्यांवरून उतरून जातांना अंग तोलून धरून नेटानें पावलें टाकीत टाकीत गेलें ह्मणजे, मनुष्य या पाइंटाचे प्रचंड कड्याच्या अगदीं काठांवर येऊन पोहोंचतें. येथें आल्यावरही या तरवारीच्या धारेसारख्या उभ्या काळ्या ठिक्कर पाषाणाच्या

कड्याचे कांठांवरील पुढें झुकलेल्या खडकाच्या बैठकीवर जो कोणी छाती करून जाऊन बसेल व तेथून पुढल्या व खालच्या पांच हजार फूट खोलीच्या प्रदेशावर नजर फेंकून नीट न्याहाळन कांहीं वेळ पाहील, त्याच्या अंतःकरणांत भीति व आश्चर्य यांचा अननुभूत संकर झाल्यावांचून राहणार नाहीं. तसेंच एक वेळ मागें वळून पाहिल्यावर डोंगराच्या मुख्य भागास सोडून अंतराळीं असलेल्या कड्यावर आपण आहों, असें त्यास दिसतांच, त्यास चक्कर येऊन डोळे मिटून स्वस्थ बसावें, आणि बसल्याजागींच पालथें पडून खालच्या खडकास घट्ट धरावें असें वाटेल.

थोडा वेळ दम खाऊन भीति थोडी कमी झाली आणि आजुबाजूस नजर टाकतां येऊं लागली म्हणजे विचार आणि विकार यांची त्याचे मनांत एकच गर्दी होऊन जाईल.

या बसलेल्या जाग्यावरून पुढील अंगास तो वांकून पाहील तर इतका कांहीं खोल खड्डा दिसेल कीं, कड्याच्या अगदीं पायथ्याला जर एखादें

खेडेगांव असतें तर त्यांतील माणसें वारुळावर मुंग्या फिरल्याप्रमाणें दिसलीं असतीं. त्याचप्रमाणें सावित्री नदीच्या पाण्याचा प्रवाह अगदीं जवळच्या अस्मान उंचीच्या कड्यावरून खालीं पडून ठिकऱ्या ठिकऱ्या झालेला असा दृष्टीस पडून लागलीच दिसेनासा होतो तो पुनः फार दूरच्या अंतरावर पर्जन्यकाळअखेर दृष्टीस पडेल.

समोरचे बाजूस कोंकणपट्टीकडे खालीं सावित्रीच्या खोऱ्यामध्यें व पलीकडे अजमासें पन्नास पाऊणशें पर्वतांची पंक्ति उभी आहे तिच्या भयंकर व अक्राळ विक्राळ स्वरूपाकडे पाहिलें ह्मणजे काय होतें व काय दिसतें त्याचें वर्णनच करवत नाहीं. दहा दहा पर्वतांची एक एक ओळ याप्रमाणें कित्येक ओळी बसल्या आहेत. त्यांतील प्रत्येक डोंगर एकमेकांपासून भिन्न असून, त्याच्या मस्तकाचा नीट अणकुचीदार सुळा वर गेलेला आहे. शिवाय दोन्ही बाजवा करवताच्या धारसारख्या खालपावेतों पोंचल्या आहेत. या ठिकाणीं वनस्पतीचा लेश देखील नाहीं. या पर्वतपंक्तींचीं

शिखरें एखाद्या किल्याच्या कपाटावर चौंचीदार लंगरी खिळयाच्या रांगा असतात त्याप्रमाणें दिसतात. तेव्हां नागवे, बोडके, व मस्तकसहित सर्वांग भादरलेले, जळके, काळे कुळकुळीत, व मधून मधून किंचित् भोरे, अशा प्रकारचे जे हे शैलसमूह दिसतात त्यांचें उग्र व रौद्र रूप पाहून पाहणाराचें हृदय खरोखर भयाभीत व चंचल होऊन दृष्टि स्थिरपणें ठरत नाहीं, व मनांत कल्पना येते कीं, पर्जन्यवृष्टीच्या वेळेस अवज्ञा करून वृष्टि न करणारे जे मेघ त्यांना सुळी देण्याकरितां हें एक भयंकर यंत्र तयार केलें आहे कीं काय? अथवा इंद्रानें पर्वताचे पक्ष कापण्याकरितां या ठिकाणीं बर्च्या जमवून ठेविल्या आहेत कीं काय!

या सीटच्या दगडाला लागूनच एक खिडकीच्या कठड्यासारखा लहानसा खडपा आहे. याच्या दोन्ही आंगास उंच खडक असून मध्यें हा पातळ पाषाणाचा खडपा लांकडी फळीप्रमाणें पाहून येथें अगदी खिडकीचे कठड्याचा भास होतो. यावर जाऊन एकदां पाहोंचले ह्मणजे खालच्या खोऱ्याच्या

विलक्षण खोलीचा व आसमंतांतील प्रदेशाचा मोठा आचंबा वाटतो. हा कठडेवजा खडपा सुमारें तीन फूट उंच असल्यामुळें पाहणाऱ्यास त्याजवर खुशाल टेंकून खालीं निर्धास्तपणें पाहतां येतें. आणि फार पुढें होऊन वांकून पाहिलें तर तोल जाऊन कोंसळून पडण्याची धास्ती वाटत नाहीं. या ठिकाणीं उभें राहून खालील खोऱ्यामध्यें कांहीं हलका पदार्थ सोडला तर तो खालचे खोऱ्यांतलि तुफान वाऱ्याचे योगानें पुनः माघारा येतो, ही प्रत्यक्ष करून पाहण्याजोगी मोठी मजा आहे.

**आर्थरसीटच्या** पाइंटचा दगड आणि झोंपडीची खुली जागा यांच्या मध्यावर एक जिवंत पाण्याचें डबकें आहे, त्यास वाघाचें पाणी असें ह्मणतात. त्यांतील पाणी या अरण्यांतील हिंसक श्वापदें व विषारी जनावरें पीत असल्यामुळें त्याची चव घेण्याचें धाडस करणें चांगलें नाहीं. नाइलाज झाल्यास यांतील पाणी उपसून काढून पुन्हां नवीन आलेलें पाणी पिण्यास अगदीं प्रशस्त असतें.

या खडप्यावर येण्यास दुसरी एक लांबणीची परंतु सुलभ अशी पाऊलवाट आहे. ही वाट तशीच नीट कोंकणांतही गेली आहे. तिला ढवळाघांट असें ह्मणतात. या कठडेवजा खडप्याजवळ या वाटेला खडकांत एक सुमारें २० फूट खोलीचा खड्डा आहे. त्याचे पलीकडे जाण्यांस जंगली दाण-गट सोट उभे व आडवे बांधून शिडीसारखी सोय केली आहे. त्या वाटेनें कोंकणेलोक सडे व ओंझी घेऊन जातां येतां पुष्कळ दृष्टीस पडतात. जोर-खोऱ्याच्या बाजूस असलेल्या खेड्यापाड्यांतील लो-कांना प्रसंगोपात् महाबळेश्वरीं पावसाळ्यांत येण्याचें प्रयोजन पडल्यास ते वेदगंगेच्या उगमाचे वरील बाजूनें एका खिंडींतून येऊन त्या पाऊलवाटेला लागतात, आणि पुढें आर्थरसीटवर रस्त्याला मिळ-तात. या खिंडीचें नांव बहिरवदरी असें आहे. या बहिरवदरीजवळ वेदगंगेला एक ओढा मिळतो त्याचें नांव यतिरा असें आहे. यास उन्हाळ्यांत सात वेळां जास्त पाणी येतें असें तेथील लोक सांगतात.

ही वर सांगितलेली शिडी उतरून गेलें ह्मणजे उजवे हातास फार घोर अरण्य दिसतें. हें जोर-खोऱ्याचे हद्दींत आहे. यांस माणिकचौक असें ह्मण-तात. हा चौक पूर्वी जावलीचा राजा चंद्रराव मोरे यानें बांधून तयार केलेला होता. तो पुढें शिवाजी-महाराजांच्या हातीं आला तेव्हां ह्या जंगलांत गुप्त फौज व शिबंदी ठेवण्यास त्यांनीं ही जागा केली होती. आतां या वाटेनें या जंगलामुळें दिवसाही एकटें दुकटें येतांना मुठींत जीव धरून यावें लागतें. या जंगलांत हाताच्या वेंगेंत न मावणारे अशा मोठ-मोठ्या वृक्षांची झाडी इतकी दाट आहे कीं त्यांतून लंबायमान सूर्यकिरणांचा ऐन दोनप्रहरींसुद्धां प्रवेश होऊं शकत नाहीं. येथील खळ्या खणणारे पावसास या जंगलांत जमिनीवर थाराही मिळत नाहीं. वाघ, चित्ते, गवे वगैरे क्रूर हिंसक पशू यां-तील गारव्याचे ठिकाणीं खुशाल भ्रमण करीत असतात. अशा शांत, निर्जन, आणि हिंसक श्वाप-दांनीं गजबजलेल्या अरण्याचे जवळूनसुद्धां जाणाऱ्या एकट्या दुकट्या मनुष्यास जनावरें येऊन आलिंगन

देण्यास निःशंक बाहेर आलेलीं कधीं कधीं दृष्टी पडतात, तेव्हां अगदीं पांचावर धारण बसून जाते कारण अशा भयंकर चिंचोळ्या वाटेनें जाणाऱ्यास जीव घेऊन पोबारा करीन असें वाटल्यास तेंही अशक्य ! कारण, दोहींकडे अस्मान कडे ! वाघो-बाचीही स्वारी भक्ष्य मिळविण्याकरितां रानांतून हवी तिकडे भटकत असल्यामुळें त्याचीही केव्हां केव्हां मुलाखत होते. परंतु या रानचे सराईत कोंकणेलोक वाघास वाघरूं ह्मणून तेव्हांच धुडकाऊन देतात.

या गृहस्थास दिवसास रानांतील प्राण्याचें खाद्य सांपडलें नाहीं ह्मणजे रात्रीस महाबळेश्वर गांवांत शिरून तो बाहेर उघड्यावर बांधिलेल्या गुरांचा फन्ना उडवितो. चोहोंकडे अशा निर्जन वनांत अगदीं निःसीम शांतता असतांही खालील नदी कांठच्या मेंढरांच्या कळपांचें बेंबें ओरडणें, व गुरांच्या कळपांचें हंबरणें वर असलेल्या इसमास ऐकूंसुद्धां येत नाहीं. अशा खोल दरींत डोकावून पाहिलें तर भोंड येईल असें वाटतें.

सारांश, सर्व महाबळेश्वरांतील रमणीय स्थलापेक्षां या ठिकाणीं जो विशेष चमत्कार दृष्टीस पडतो तो खरोखर अवर्णनीय आहे. येथें मेघमंडळास भिडणारे उंच पर्वत, व त्यांच्या पायथ्यासभोंवतीं, कित्येक अगदीं नळीप्रमाणें चिंचोळीं असून वरून कड्यानें आच्छादित असल्यामुळें आंत सूर्याचा प्रवेश न होतां, अंधकार व तशांत निबिड छायेनें भरलेलीं अशीं, आणि कित्येक मगराप्रमाणें भयंकर तोंडें वांशीत जाऊन पुढें अफाट मैदानाला मिळतात अशीं, हजारों फूट खोलीचीं खोरीं आहेत. या निरनिराळ्या खोऱ्यांमध्यें पर्वतांतून उत्पन्न होऊन, व अजस्र कड्यांवरून हजारों फूट खालीं उड्या घालून ज्या नद्या विलक्षण विस्तार पावून देशसमृद्धीस कारण होतात, त्यांचीं पात्रें सर्पाकृति व उन्हाळ्यांत शुष्क आणि जलशून्य दिसत असतात. ज्या कड्यांवरून ह्या नद्या उड्या टाकितात, त्या कड्यांला हजारों वर्षांपासून पडलेले विस्तीर्ण घट्टे दिसतात. तसेंच समुद्रतीर व त्यावर असलेले बाळडोंगर सोंगट्या-

प्रमाणें दिसतात. पर्वतावरील ब्रह्मारण्यांत तपोवनामधील वृक्षसंमर्द, पुरातन तपश्चर्येचीं स्थानें, दऱ्या, व गुहा, इत्यादि यांचा एकत्र समुच्चय एकसमयावच्छेदेंकरून दृष्टिगोचर झाला म्हणजे जो लोकोत्तर निरतिशय, व अमानुष चमत्कार दृष्टीस पडतो आणि जी सृष्टीची नैसर्गिक स्थिति साक्षात् नेत्रांसमोर येते, त्याकडे लक्ष दिलें ह्मणजे पाहणारांच्या अंतःकरणाची वृत्ति काय होते हें त्यांसच विचारलें पाहिजे. कितीही मोठा पाषाणहृदयीं नास्तिक असला तथापि या ठिकाणीं आणून त्यास उभें केलें तर निमिषमात्राचा अवकाश न लागतां त्याच्या सर्व पाखंडमताचा भंग होऊन तो ईश्वरपरायण होईल यांत किंचित्‌ही संदेह नाहीं. आपल्या सारख्याचा तर ऊर दडपून गेल्याप्रमाणें होतो, आणि गर्व असल्यास सर्व हरण होऊन वृत्ति अगदीं लीन व नम्र होते. जिकडे पहावें तिकडे ईश्वर दिसूं लागतो. व अंतर्यामींची गडबड नाहींशी होऊन विचारास अवसर सांपडला ह्मणजे वाटतें कीं, जगदीश, जगन्नियंता, जगत्प्रतिपालक, सर्वज्ञ, सर्वसाक्षी, सर्वशक्ति, अनादि, अनंत, निराकार, नि-

विकार असा जो प्रभु त्याचा महिमा अपार व लीला अगाध आहे. आपण क्षुद्र व अकिंचन आहों. आपलें काय ! पण महान् महान् राजे व योद्धे ज्यांनीं शेंकडों वर्षें राज्य करून दिगंतरीं कीर्ति पसरविली त्यांचीही दुर्दशा आपल्याप्रमाणेंच आहे !

या गोष्टीचें प्रत्यंतर या ठिकाणीं तत्काल दिसून येतें. तें असें कीं, कमळगड, प्रतापगड, व पुरंदर हे तीन किल्ले येथून दिसत असतात. मुसलमानांचें राज्य असतां या प्रांतीं विजापुरकराचें ठाणें कमळगडावर असे. पुढें मराठ्यांनीं यवनांचा पराभव करून प्रतापगडीं आपलें ठाणें केलें. नंतर पेशव्यांनीं राज्यश्री भोगिली. परंतु ते यवन, मराठे व पेशवे आज कोठें गेले त्यांचा पत्ता नाहीं! त्यांनीं या ठिकाणीं राजविलास भोगले, शूर कृत्यें केलीं, आणि यावच्चंद्रदिवाकर आपली सत्ता चालावी म्हणून मजबूत व दुर्गम किल्ले बांधिले. पण हल्लीं ते किल्ले धुळीस मिळत चालले आहेत! हल्लीं सर्व राजसत्ता प्रस्तुतच्या राज्यकर्त्यांस प्राप्त होऊन त्यांनींही या शैलशिखरावर मालकमपेठ हें विलासाचें स्थान का-

यम केलें आहे, तेवढें मात्र शोभायमान दिसतें. बाकीच्यांचा लय झाला. तस्मात् हे ईश्वरा ! आह्मीं मर्त्य, अकिंचन, अनभिज्ञ मानव आहोंत. आमचें तुझ्या अमानुष शक्तीपुढें सामर्थ्य किती ? तुझा परम मित्र व भक्त जो अर्जुन त्यानें सुद्धां विश्वरूप पाहिल्यानंतर तुझा स्तव केला आहे. तेव्हां आम्ही या आर्थरसीटवरून ज्या जड वस्तु पाहून कुंठित होऊन गेलों आहों, त्या निर्माण करणाऱ्या जगच्चालका, तुझी मात्रा व शक्ति अगाध आहे त्यांची आह्मी पामर कल्पनाही करूं शकत नाहीं. याकरितां आमच्या कोते विचारानें झालेल्या प्रमादांची क्षमा कर.

---

## मुंबईपाइंट.

मुंबईला जळमार्गानें जाण्याच्या जुन्या रस्त्यावर हा पाइंट असल्यामुळें याला मुंबईपाइंट असें नांव पडलें आहे. मालकमपेठेपासून दोन मैलांवर रडतोंडीच्या घांटाच्या ऐन माथ्यावर हा पाइंट आहे. या रडतोंडीच्या घाटाला हल्लीं फिट्झल्र्ड घांट असें ह्मणतात. येथील सर्व पाइंटांत ह्या पाइंटाला येणारे लोक फार अस-

तात. या पाइंटावर गाड्या उभ्या करण्यास जागा चांगली प्रशस्त आहे. येथें बँड वाजविण्याकरितां उंच चबुतरा केलेला आहे. याला येण्यास दोन वाटा आहेत. एक रस्ता महाड रस्त्यानें जाऊन गव्हरमेंट हौसकडे जाण्याचा रस्ता उजवे हातास सोडून गेलेला आहे. दुसरा रस्ता महाड रस्त्यानें सुमारें पाऊण मैल गेलें, ह्मणजे डावे बाजूला फुटतो. अशा रीतीनें ह्या टोंकावर जाऊन उभें राहिलें ह्मणजे खालीं कोयना नदीचें खोरें तीन हजार फूट खोल आहे, तें पाहून डोळे फिरूं लागतात. समोर इतिहासप्रसिद्ध व आपल्या शिवाजीराजाच्या चरित्रानें परिपूत झालेला प्रतापगडचा किल्ला जमिनीवरून नीट सुळ्यासारखा जात आहे, तो नजरेस येतो. किल्ल्याच्या उजव्या बाजूस गर्द झाडीमध्यें लहानसें टुमदार पारगांव व पुढें पारघाटहीं दिसतात. नंतर पारघाटाच्या माथ्यावरून नवीन बांधलेली महाडची सडक नागिणीप्रमाणें नागमोडीनें उतरत येऊन कोयनेच्या खोऱ्यामध्यें अल्पकाळ गडप झाल्याप्रमाणें होऊन नंतर मोठ्या डौलानें

घाटमाथा चढत चढत महाबळेश्वरीं श्रीशंकराच्या-गळ्यांत माळेप्रमाणें वेष्टण घालण्यास जात आहे कीं काय असें वाटतें ! आपल्या डाव्या आंगास लहानमोठ्या पर्वतांची अस्ताव्यस्त गर्दी पसरलेली असते. हें पर्वतमंडळ व तसेंच आपण उभे राहतों त्या बाजूस व उजवे बाजूस पर्वतराज आहेत ते डोकीं उंच करून वीरश्रीनें लढण्यास अर्धरथी एकरथी व महारथी असे उभे ठाकलेले असतात. परंतु सर्वांत ठेंगणा तथापि पुराणविख्यात अभिमन्युप्रमाणें वक्राकृति, दुर्धर, अतिरथा जो प्रतापगडचा शैल तो सगळ्या गिरिवीरांस आपल्यापुढें अर्धचंद्राकार व्यूहरचनेनें उभे ठेवून त्यांच्यावर पाहरा करीत आहे कीं काय असा भास होतो. आणि प्राकाररूप वीरभूषणें मस्तकीं परिधान करून, व सुळ्याचे खड्ग हातीं घेऊन, प्रतापगड या नांवानुरूप साक्षात् कृति करण्यास आवेशानें सिद्ध आहे कीं काय असें वाटतें. परंतु महावीरांचीं मनें जितकीं कठोर तितकींच मृदुही असतात. या वचनाप्रमाणें प्रातःकाळीं प्रतापगड किल्ला पाहण्यास

गेलें म्हणजे त्या गिरिवीराची शोकावस्था दृष्टीस पडूं लागते. जणूं काय हा मागील गत गोष्टी मनांत येऊन ज्या पुण्यश्लोक, ईश्वरपरायण आणि गोब्राह्मण प्रतिपालकाच्या निवासानें श्रीजगदंबेचे पाय आपल्या मस्तकीं लागून राजगुरू व साधुश्रेष्ट राम-दासस्वामी यांच्या आगमनाचा लाभ होत होता, तो छत्रपति, तो राजश्रेष्ठ, तो स्वदेशाभिमानी, तो आर्यधर्मप्रतिपालक, तो गुणग्राही, उदार, पुण्य-श्लोक शिवराजा आतां आपणास नाहीं, त्याअर्थी आपलें जिणें व्यर्थ आहे अशा विचारानें पोटांत भडभडून आल्यामुळेंच दुःखांत निमग्न झालेला असतो आणि दिनमणीचा प्रकाशपडेपर्यंत मेघपटल-रूप वस्त्रानें आपलें तोंड झांकून घेतों असें दिसतें. सारांश, प्रतापगड पाहून विचारवंताच्या मनांत हे सर्व तरंग उठणें साहजिकच आहे.

### कारनाक व फॉकलंड पाइंट.

कारनाक व फॉकलंड हीं दोन गव्हरनरांचीं नांवें या दोन पाइंटांस दिलीं आहेत. मुंबई पाइंटपासून कारनाकपाइंट पाव मैल आहे; व फॉकलंड पाइंट

अर्धा मैल आहे. ह्या दोन्ही ठिकाणचे देखावे सारखेच दिसतात. मुंबई पाइंटापेक्षां या दोन ठिकाणांपासून सॅडलॅबगेटकडी समग्र दिसते. परंतु मुंबई पाइंट आड आल्यामुळें सूर्यास्ताच्या समयींचा चमत्कार तेवढा यांवरून दिसत नाहीं. फाकलंड पाइंटावर गाड्या क्षणभर उभ्या करण्यास जागेची वाण नाहीं. येथून बाबिंगटन पाइंटाचे कडे अगदीं साफ दिसतात. या दोन पाइंटाच्या आसपास डोंगरांची रांग नसल्यामुळें हे जमीनींतून उगवल्यासारखे दिसतात. या दोन पाइंटावर चौफेर दाट झाडी आहे. आक्टोबर महिन्यांत इकडील रस्त्यावरून शेवाळाची मजा दिसते.

**फाकलंड पाइंटच्या जवळच्या वनांतील रस्ता.**

या झाडींत तयार केलेल्या जागीं स्वच्छ उजेड वगैरे आला ह्मणजे मोठी मासलेवाईक शोभा दिसते. वनभोजनाकरितां येण्यालायक ही जागा आहे. येथें साहेब लोकांचा गोल्फचा खेळ चालतो. त्या खेळाला जशी पाहिजे तशी येथें झाडी आहे. वेस्टवुड व फर्न बंगल्यानजीक महाड रस्त्याला जे

अनेक रस्ते फुटले आहेत, त्यांतील डावे हातचा रस्ता थेट फाकलंड पाइंटावर जातो. तसाच डावी-कडे टायगरपाथ टाकून उजवीकडे नीट डोंगराच्या कडेनें जाण्यास एक लहान घोडे रस्ता आहे. तो जेथपर्यंत जाऊन पोहोंचला आहे त्या ठिकाणाला एको पाइंट अशी संज्ञा आहे. त्या रस्त्यानें खालील खोऱ्याची वनशोभा चांगली दिसते. म्हणून पायीं फिरण्यास जाणारांस हा चांगला मार्ग आहे.

## सासून पाइंट.

बाजाराकडून बाबिंगटन पांइटला जाण्याचा रस्ता आहे, त्या रस्त्यानें निम्यावर गेलें म्हणजे हा पाइंट येतो. याचे समोर लांबीचे अंतरावर फाकलंड पाइंट दिसतो. याचे पुढील सखल प्रदेशांत वुडलॉन बंगल्याजवळ टायगरपाथला एक रस्ता मिळालेला दिसतो. या रस्त्याचे उजवे बाजूस चिनी लोकांच्या बागा असून डावे बाजूस धबधबे आहेत, ते फारच मजेदार दिसतात. या रस्त्यानें हवा खाण्याकरितां पायीं व घोड्यावरून पुष्कळ लोक जात येत असतात.

## क्यानॉट शिखर.

यांचें मूळ नांव "तंदुळनदी" असें आहे. याची

उंची ४६४४ फूट आहे. याचा रस्ता लिलीकाटेज बंगल्यानजीक महाबळेश्वर रस्त्यापासून पेटिटरोडनें सुमारें ८०० पावलें गेलेवर फुटतो व नागमोडीनें वर जाऊन भिडतो, तसेंच दुसरा रस्ता महाबळेश्वर रस्त्यानेंही वर जातो. या पाइंटावरून चोहोंकडील प्रदेश फार रमणीय दिसतो. या पाइंटावर साफ जागा आहे त्याचे मध्यावर उच्चस्थानीं हल्लीं एक चवुतरामात्र आहे, व त्या लगत एक लहान झाड आहे. या शिखरावरून सूर्योदय आणि सूर्यास्त पहाण्याची फार मजा असते. याचा रस्ता गाड्या येण्यासारखा आहे. परंतु कांहीं ठिकाणीं चढ बराच असल्यामुळें गाड्यांतून हिंडणारे लोक इकडे फार कमी येतात. मुंबईच्या सैन्याचा नायक आणि राजकुलोत्पन्न ड्यूक आफ कयानाटसाहेबसुद्धां येथें आल्याची निरंतरची स्मृति देण्या करितां त्यांचें नांव या पाइंटाला देऊन डिमॉक सुपरिंटेंडंटसाहेब यांनीं या पाइंटास चिरंजीव करून ठेविलें आहे. पूर्वीं कामावर असलेवेळीं ह्यांनीं आपल्या आगमनानें हें ठिकाण मंडित केलें असलेमुळें त्यांचें नांव निघण्याची ही

करामत करून ठेविली आहे. यास **ड्यूक** पाइंट किंवा **क्यानाट** शिखर म्हणतात.

**गव्हर्मेंट हौस किंवा प्रास्पेक्ट पाइंट.**

गव्हरमेंट हौसचें दुसरें नांव बेलाव्हिस्टा आहे. ही इमारत पश्चिम बाजूस अगदीं डोंगराच्या शुंडेवर आहे. येथून थोडीं कदमें गेलें ह्मणजे एक छोटे-खानी पाइंट लागतो त्याचें नांव " **प्रास्पेक्ट** " असें ठेविलें आहे. ही इमारत उंच जोतें देऊन भरपूर दोन मजली उठविली आहे. ही अष्टपैलु आकाराची मुंबईधरतीच्या इमारतीप्रमाणें बांधलेली असलेमुळें **मालकमपेठेला** एक मोठें प्रेक्षणीय ठिकाण आहे. दुसऱ्या मजल्याला बहुतेक बाजूंना ग्यालरी केली असल्यामुळें तर ही सुरेख दिसते. येथें स्वस्थ बसून लांबलांबचे देखावे पाहण्याची फारच मजा आहे. कंपौंडांत आणखी लहान लहान सोईस्कर इमारती आहेत, व आराम घेण्याकरितां जागा केली आहे. येथें पियानोचें दालन आहे, बिलियर्ड हाल आहे व येथील विहिरीला पाणी काढण्याकरितां एक हातपंप लावून सर्व ठिकाणीं पाणी खेळविलें आहे. येथें नामदार.

साहेबांची स्वारी असतांना पाहणेस जाण्याची मनाई असते.

या बंगल्यासभोंवार नानाकृति व नानातऱ्हेच्या फुलांनीं सुशोभित असा नवीन व्यवस्थेशीर बगीच्या केलेला असलेमुळें तो फार रमणीय दिसतो. येथील कंपौंडांतच एक विस्तीर्ण लॉन्टेनिस कोर्ट केलेलें आहे. त्याचे आसपास दाट झाडी असून तें अगदीं पाइंटाचे माथ्यावर असलेमुळें दिवसा केव्हांही तेथें खेळण्यांत गुंग झालें तरी मुळींच श्रम वाटण्याचें कारण नाहीं. या इमारतीचे खालचे टप्प्यांत मुंबई पाइंटाचे वाटेवर औरस चौरस सुमारें १२०० फूट जागेतील झाडी तोडून पोलोच्या खेळाकरितां जागा तयार करण्यांत आली आहे. तेथें चालणारा सर्व खेळ येथील बागेंतून छानदार दिसतो. प्रास्पेक्ट पाइंटावर उभें राहिलें असतां, उजवे हातास एलफिन्स्टन व डावे हातास मुंबई पाइंट हे मूर्तिमंत उभे राहिलेले दिसतात. मागें वळून पाहिलें ह्मणजे एकसारखा हिरवागार विस्तीर्ण प्रदेश दिसतो. त्याची शोभा लिहिण्यापेक्षां पाहून चांगली समजेल.

## केटसूपॉईंट

याला येथील गांवचे लोक नाकेखिंड असें म्हणतात. हा येथून जुने पांचगणी रस्त्यावर फक्त चार मैल आहे. येथें पाहण्यासारखा एक विलक्षण मोठा खडक आहे. याची दर्शनी बाजू कृष्णानदीचे खोऱ्याकडे खांबाप्रमाणें उभी आहे व मागील बाजू दादर केल्याप्रमाणें आहे, तीवरून चढून जातात. जवळच सुमारें १०० फूट उंचीचा खडपा आहे. तो जणुं या मोठ्या खडकाचें पिल्लूंच बाहेर पडलेलें आहे कीं काय असा दिसतो. ह्या खडप्यापासून सहा फुटावर याचा जनक खडक उभा आहे. या दोघांची ताटातूट झाली होती परंतु आतां त्यांच्याच जातभाईनीं मध्यें पडून दोघांचा संबंध जोडला आहे. हे मध्यस्थ गृहस्थ फार कृश व किरकोळ घराण्यांतील असल्यामुळें थोरांप्रमाणें याजवर एकदम पुष्कळांची धाड घालण्याची गोष्ट तर एकीकडेच राहिली परंतु जो कोणी एखादा त्यास भेटण्याची इच्छा करील त्याला नम्रतेनें खालीं मान घालूनच गेलें पाहिजे. तो जर इकडे तिकडे पाहील तर त्याची या मध्य-

त्यांस फार चीड आहे. अशा रीतीनें जपून मोठ्या कड्याचे मस्तकावर जाऊन बसलें ह्मणजे देशाकडील बाजू लांबपर्यंत दृष्टीस पडते. परंतु इकडे देखावे वगैरे कांहीं मिळावयाचे नाहींत. तथापि खालील कृष्णानदीच्या प्रवाहाचीं वेडींवांकडीं वळणें व लहान लहान पिकाचीं असंख्य भातखाचरें यांची मात्र फार शोभा दिसते. कमलगड, पांडवगड व मांढरदेव हे डोंगर फार भव्य दिसतात. तायघाट मध्यंतरीं आड असल्यामुळें वांई मात्र येथून दिसत नाहीं. डोंगर अगदीं जवळ दिसलेमुळें पावसाच्या पाण्यानें खणून खणून पडलेल्या त्यांवरील पनाळी फार भयंकर दिसतात. रबरी धावेच्या गाड्या इकडे येण्यासारखा अलीकडे रस्ता केला आहे. पुणें रस्त्यानें वेण्णा तलावाच्यापुढें सुमारें दीड मैल गेलें ह्मणजे या पाइंटाचा रस्ता फुटतो. ही फुटवाट जुन्या मालकमपेठचे रस्त्यांत मोडत होती, तेव्हां हिला फेरीसाहेबाचा रस्ता असें ह्मणत असत. ही अगदीं पाउलवाट असून दह्याट गांवांकडून आली आहे.

## बेकवुइथसाहेबांचें थडगें.

येथील चर्चाचे मागलि बाजूस चर्चाला लागूनच उच्च ठिकाणीं बेकवुइथसाहेबांचें फारच उंच थडगें बांधिलें आहे, तें इतकें कीं पांचगणीकडून येथें ये-णारे लोकांना हें बऱ्याच अंतरावरून दिसत असतें. समुद्राच्या पृष्ठभागापेक्षां याची उंची ४९९८ फूट आहे.

यावर चढण्याची वाट हल्लीं फार खराब झालेली आहे. थडग्यावर ३० फूट उंचीचा साधा चौकोनी मनोरा आहे. हें सर्व काम या साहेबांच्या मित्रमंड-ळींनीं वर्गणी करून केलें आहे. यास एकंदर ३००० रूपये खर्च आला आहे. बेकवुइथसाहेब १८३१मध्यें या ठिकाणीं परलोकवासी झाले. त्या वेळीं हे सर्व हिंदुस्थानच्या सैन्याचे सेनापति होते. हिंदुस्थानांत लढाया सुरू झाल्यापासून वाटर्लूच्या लढाई-पर्यंत नांवाजलेले लोकांच्या मंडळींत यांची गणना होत होती, आणि अद्यापिही होत आहे. येथें वरील स्नेही मंडळींनीं एक शिलालेख करून बसविला आहे. दुसरा त्यांच्या अनाथपत्नी-

कडून संगमरवरी शिलालेख आलेला होता तोही आणखी येथें ठेविला आहे. परंतु येथील हवेनें हा दुसरा लेख १८४३ तच खराब होऊन लागेनासा झाला आहे. पहिला लेख तरी काळा झाल्यामुळें वाचण्याची पंचाईत पडतेच, तथापि दुसऱ्या इतकी याची दुर्दशा उडालेली नाहीं. यांतील गृहस्थ पिशाच होऊन लोकांना पीडा करूं लागल्यामुळें येथील लोक या थडग्यापुढें नारळ फोडितात, देणें देतात व कित्येक कौलही लावितात.

पहिला लेख पश्चिम बाजूस लाविला आहे त्यांतील मजकूर येणेंप्रमाणें:—

> " लेफ्टेनेंट जनरल थामस सिडणे बेकवुइथ K. C. B. मुंबईचे गव्हरनर आणि सेनापति व राणीसरकारच्या तोफखान्यावरील कर्नल यांचें स्मारक. "

पुष्कळ दिवस अप्रतिम नोकरी बजावून शेवटीं तारीख १९ माहे जानेवारी १८३१ रोजीं महाबळेश्वर पर्णकुटिकेंत यांस देवाज्ञा झाली. वय ६० वर्षें. " यांच्या दिलदार स्वभावाची व मनामिळाऊ-

पणाची शिकस्त वाटून त्यांच्या मित्र मंडळींनीं हें स्मारक केलें आहे."

पूर्वेच्या बाजूस दुसरा लेख आहे तो असा:—

"किलहेडच्या परलोकवाशी वुल्यम डगलस साहेब बार्ट याची मुलगी व बेकवुइथसाहेब यांची पत्नी मेरी हिनें आपल्या नष्ट भ्रताराच्या अपार प्रेमाचें सूचक ह्मणून हा शिलालेख करून बसविला आहे. यांच्या आकस्मित मृत्यूनें माझा सखा, सहचारी आणि उपदेशक मला जगांत राहिला नाहीं. ख्रिस्ती धर्माला साजणाऱ्या त्यांच्या आंगच्या मनमिळाऊ पणाचा लाभ व संसारसुखदु:खरहस्य यांला मी आतां अंतरलें. हा जो घाला पडला त्याचें शांतवन केवळ त्यांच्या आत्म्यास शांति मिळाली असें मनांत आणूनच केलें पाहिजे. दु:खानें होरपळून गेलेल्या माझ्यासारख्या अनाथ विधवेच्या अंत:करणांतील दोन शब्दांस त्यांच्या कळकळीच्या मित्रांनीं बांधलेल्या या थडग्यांत जागा दिली ही त्यांची मजवर मोठी दया आहे."

## दि लेडी नॉर्थकोट राइड
## व
## दि नार्थकोट पाइंट.

बॉबिंगटन पाइंटावरून खालच्या रस्त्यानें सुमारें सवा मैल ब्ल्यूव्हॅलीकडे जाण्याच्या रस्त्यानें गेलें असतां, उजव्या हातास फक्त स्वतःच्या किंवा घोड्याच्या पायीं फिरण्यासारखा एक बोळवजा नुकतांच ( सन १९०० सालीं ) मार्ग केला आहे, तो लागतो. त्यास आमच्या हल्लींच्या उदार व लोकप्रिय मुंबई सरकारच्याच पत्नीचें नांव देण्यांत आलें आहे. हा सुमारें दोन मैल लांब आहे. या रस्त्याचें काम करण्यास नार्थकोट साहेब आणि इतर युरोपिअन लोक यांनीं आपली खासगी वर्गणी करून पांचशें रुपयांची रकम घातली आणि या ठिकाणीं लेडी नार्थकोटसाहेबांची चिरकालची आठवण राहील असें करून ठेविलें आहे. तसेंच हा रस्ता जात जात ज्या विशाल कड्यावर जाऊन पोहोंचून पुढें जाण्यास वाव नसल्यामुळें पसरून जणुं काय खालीं उतरून जाण्यास मिळेल कीं नाहीं अशा स्थितींत वाटा

धुंडींत आहे असा दिसतो, त्या कड्याच्या ठिका-
णाला खुद्द आपले हल्लींचे इलाखाधिपति नामदार
नार्थकोट साहेब यांचं नांव दिलें आहे. याप्रमाणें
अलीकडच्या मुंबईचे गव्हरनरांपैकीं यांचेंच नांव
कायतें जुन्या बड्या साहेब लोकांच्याप्रमाणें महाबळे-
श्वरीं लोकांकडून अमर करण्यांत आलें आहे.

या मार्गानें गाडी तर मुळींच जाऊं शकत नाहीं.
कारण हा मार्ग जमीन खोदून काढून केला आहे,
यामुळें फारच अरुंद झाला आहे. परंतु गाडींतून
जाणारे लोक या मार्गानें जरी पायीं किंवा घोड्याव-
रून गेले, तरी त्यांस सूर्यकिरणापासून त्रास होण्याची
बिलकूल भीति नाहीं, अशी गर्द झाडी या मार्गाच्या
दोहों अंगांस राखून हा मार्ग काढला आहे. शिवाय
या झाडीमुळें वाटेचे चढउतार पार टाकून गेल्यानें
श्रम होऊन आंगाची जी तलखी होणार तिचेंही
कांहीं अंशीं निरसन होतें. याप्रमाणें या वृक्षमंडपांतून
(Glen) अगदीं पाइंटावर आल्यानंतर पुढील खोऱ्यांत
डोकावून पाहिलें असतां कोयना कांठचा (Koyana
valley ) लांबवरचा प्रदेश दृष्टीस पडतो. तो इतर न-

द्यांच्या कांठच्या प्रदेशाप्रमाणें उगीच सामान्य तऱ्हेचा नाहीं. ह्मणजे त्यांतील झाडी उंच आणि दाट वृक्षांची असल्यामुळें फारच भेसूर झाली आहे. कारण, मोठमोठाल्या तक्तपोशीच्या कड्या, गवत व शेवाळ हीं कोयना कांठाला जितकीं विपुल सांपडतात तितकीं दुसऱ्या ठिकाणीं सांपडत नाहींत. तसेंच रानटी श्वापदेंही येथें फार आहेत. यामुळें हा कोयनाकांठ वरून पाहणारांस एकसारखा हिरवा पट्टा काढल्यासारखा दिसत असल्यामुळें फार छान दिसतो. हा कोयनाकांठच्या प्रदेशाचा देखावा महाबळेश्वरच्या आणखी कोणत्या तरी गाडी रस्त्यानें जाऊन गाडींतून हिंडण्याचे पूर्ण शोकी गृहस्थ पाहूं म्हणतील, तर मात्र तो त्यांना कोठेंच दुसरीकडे दिसणार नाहीं. पुढील बाजूस सॅडलबॅगचा डोंगर फार स्पष्टपणें दिसत असतो. या लेडी नार्थकोट रस्त्यानें एक मैल गेल्यावर डाव्या हातच्या बाजूस ६ फूट रुंदीचा एक घोडेरस्ता दृष्टीस पडतो. तो या रस्त्याच्या खर्चाच्या रकमेंतून शिनशिन घळी (Robber' cave) पर्यंत दुरुस्त करून घेतला आहे.

या रस्त्यानें रोज सकाळीं हजारों लोक डोंकीवरून गवत वगैरे घेऊन मालकमपेठच्या बाजारांत विकण्या- साठीं कोयना खोऱ्यांतील आठ दहा कोसाच्या प्रदेशावरून लगबगीनें येतांना भेटतात. त्यांस तिक- डील लोकस्थितीची व जंगलाची वरील माहिती विचारली असतां सहज मिळणारी आहे.

## मालकम टेंकडी.

बाजारांतून पूर्वेकडे तोंड करून चाललें ह्म- णजे समोर हिरवा कोट व पांढरी टोपी घालून प्रमुखपणानें उंच बसलेली जी वामनमूर्ति दिसते तिलाच हें नांव आहे. हिच्यावर जो बंगला दिसतो, तो कार व हार्डिंग साहेबांच्या मालकीचा होता. परंतु आतां तो बोमनजी दिनशा पे- टिट यांनीं खरेदी घेतला आहे. या बंगल्यावरून मालकमपेठ गांव व इतर टेंकड्या पाहण्याची फार मजा वाटते. हा बंगला प्रथम या ठिकाणीं जान मालकमसाहेबानें बांधून आपल्या लाडक्या मुलीचें चार्लट असें नांव या बंगल्याला ठेविल्यामुळें याला " मौंट चार्लट " असें ह्मणण्याचा पाठ होता. परंतु

१८५२ मध्यें बिशपसाहेबांस असें दिसून आलें कीं गांवचे लोक मालकमचे घर असें ह्मणतात. तेव्हां लागलींच त्यांनीं त्याप्रमाणें नांव दिलें. याचे पायथ्याशीं सार्वजनिक उपयोगाकरितां बिशपसाहेबांनीं एक तलाव बांधला आहे त्यास बिशपतलाव ह्मणतात. या टेंकडीवरून प्रतापगडच्या पश्चिमेकडील बराच प्रदेश दिसतो, ही सांगण्यासारखी विशेष गोष्ट आहे.

### पाण्याचे धबधबे.

येथें तीन धबधबे आहेत, त्यांला हिंवाळ्यांत पाणी बरेंच असल्यामुळें ते प्रेक्षणीय असतात.

### चिनी धबधबा.

सासून पाइंट व फॉकलंड पाइंट यांच्या दरम्यानचे सखल जागेंत जे ओढे आहेत त्यांना मालकमगांव रस्त्याच्या दक्षणेस चिनी लोकांच्या बागेजवळ धबधबा आहे ह्मणून यास चिनी धबधबा ह्मणतात.

### धोबी धबधबा (फॉल).

हा धबधबा फार उंचावरून पडत नाहीं, यामुळें ह्या धबधब्याची मजा कमी वाटते असें नाहीं. हा फार

कोंडलेल्या जागेंत पडत असल्यामुळें त्या स्थळाला जी शोभा दिसते, तिचें सौंदर्य पाहण्यासारखें आहे. सिडने व एल्फिनस्टन् पाइंटाच्या मधल्या घोडेवाटेवर हा आहे. महाबळेश्वर वाटेनें थोडें लांब गेलें ह्मणजे डावे हातास धोर्वी फॉल अशी पाटी लावलेली दृष्टीस पडते, तेथून या धबधब्याची वाट फुटते. फक्त पायीं किंवा घोड्यावरून जाण्याच्या उपयोगाची ही वाट आहे. धबधब्याचे ठिकाणीं आलें ह्मणजे दोन लंबायमान खडप्याच्या चिंचोळ्या जागेंतून पाणी खालीं आदळत असलेलें दिसतें. भोंवतालीं हिरवीगार रंगाची घनदाट झाडी लागून गेलेली आहे. येथें चोहोंकडे सर्व शांतता असून फक्त पाण्याचा मात्र आवाज होत असतो, हें पाहून पुस्तकांतून वाचलेल्या अरण्याच्या देखाव्याचे वर्णनाचा बरोबर मोकबला आहे असें वाटून आनंद होतो. आजूबाजूच्या दाट झाडींतून या धबधब्याला जातांना व तेथें पोंचल्यावर एखादें श्वापद हळूंच पुढें येऊन आलिंगन देईल किंवा काय, अशी फार भीति वाटते. वाटेनें फार रहदारी नसल्यामुळें व आजू-

बाजूला वस्तीच्या मुळींच अभावामुळें वाऱ्यानें झा-डांचीं पानें हालून जो आवाज होत असतो तो ऐकून अगदीं पांचावर धारण बसून जाते आणि एखादें हिंसक जनावर आपली चाहूल झाल्यामुळें उठून खुजबुजलें असें वाटून अगदीं जिवांत जीव रहात नाहीं. याकरितां बरोबर मंडळीचा समुदाय असला ह्मणजे भीति न वाटतां चांगला दम येतो, याकरितां एकट्या दुकट्यानें येथें जाणें चांगलें नाहीं.

## वेण्णा धबधबा.

मालकमपेठ गांवानजीक पाचगणी रस्त्याचे बाजूस एक मोठें सरोवर आहे त्याच्याकडे या धब-धब्याचें जनकत्व आहे. पावसाळ्यांत अति पर्जन्यानें हें सरोवर जेव्हां उचंबळत आणि गुळण्या टाकीत असतें, तेव्हां वेण्णानदी या सरोवरांतून बाहेर पडल्या-बरोबर मंदगति जात आहेसें पाहून मनांत असा तर्क येतो कीं माहेराहून सासरीं जाणें हिला अगदीं नकोसें असल्यामुळें ही अशी रेंगाळत आहे कीं काय कोण जाणें! पण तिचें तें रेंगाळणें फार वेळ टिकत नाहीं. मंद स्थितींत सुमारें ३ मैल प्रवास

केल्यावर पतिसमागमाच्या आनंदलहरी तिच्या हृदयांत येऊं लागून तिचें पाऊल वेगानें पुढें पडूं लागतें, व प्रत्येक पावलास पुढें जाण्याची तिची उत्कंठा अधिकच तीव्र होते. अशा प्रेमलहरींनीं ती अगदीं बावरी होऊन जाऊन गर्जना करीत करीत ५०० फूट उंचीच्या कडयाखालीं उडी घेते तेव्हां तिला जे रागाचे कल्होळ येतात त्यामुळें दशदिशा भरून जाऊन आसमंतांतील इतर ध्वनि पंचत्वाप्रत पावल्यासारखे भासतात, आणि धबधब्याच्या आघातानें तळांत असह्य वारा उत्पन्न होतो. अशी बेफाम झाल्यामुळें सर्व उदकसंचय अत्यंत तप्त होऊन त्यास उसळ्या येत आहेत व त्यांतून स्फटिका सारख्या शुभ्र व हिऱ्यासारख्या तेजोमय, अंबुकणांच्या बाष्पांचे अनंत लोळ निघत आहेत कीं काय असा भास होतो ! यावेळीं हिच्या मैत्रिणी लांबलांब ठिकाणांहून येऊन हिला भेटत असतात. अशा झपाटयानें चाललेल्या स्त्रीस जर कोणी अडथळा केला तर तिचा क्षोभ होऊन ती ज्याप्रमाणें अडथळा करणाराला झिडकारून देतें त्याप्र-

माणें पाण्यांतून सोडलेले हलके पदार्थ धबधब्याच्या माथ्यावर परत उडून येतात.

कित्येक विचित्र जिज्ञासूंस या धबधब्याची शोभा तळाशीं कशी दिसत असेल हें जाणण्याची उत्कंठा असेल त्यांनीं ज्या ठिकाणीं धबधबा पडत असतो त्याचें समोर येऊन बसावें. या ठिकाणीं उभें राहून वर पाहणाऱ्याच्या अंगीं असामान्य धैर्य असेल तरच त्याचा निभाव लागतो. ज्यांचें धैर्य दगडासारखें असतें ते जिवावर उदार होऊन आपली उत्कट जिज्ञासा परिपूर्ण करण्यासाठीं आपले जीव आपल्या वाटाड्याच्या हवालीं करितात. हे वाटाडे येथील खेड्यांतील लोक असतात. यांना सहवासामुळें कसलीच भीति वाटत नाहीं. हे त्यास धबधब्याचे मागें घेऊन जातात. अशा ठिकाणीं उभें राहून पुढें पडणाऱ्या प्रचंड वारिप्रपाताकडे पहात, व रंध्रास भेदून जाणारा वारिनिर्घोष ऐकत, असतां मनाची जी स्थिति होत असेल तिची वाचकांनींच कल्पना करावी. अशा ठिकाणाहून जे सुरक्षितपणें परत येत असतील, त्यांस मृत्युमुखांतून बाहेर पड-

त्यासारखें होऊन, आपला पुनर्जन्म झाला असें वाटेल यांत शंका नाहीं.

आक्टोबर महिन्यानंतर या नदीचें पाणी कमी होऊन धबधब्याचा पाऊण हिस्सा खडक पुढें झुकल्यासारखा असल्यानें प्रवाह टप्याटप्यानें जातो आणि मग खालीं आपटतो; यामुळें जे स्फटिका-सारखे वारिबिंदु उडत असतात त्यांवर सूर्याचे किरण तिरकस पडून सभोंवार इंद्रधनुष्याचें कडें दिसतें तें फारच शोभा देतें. ज्या कडयांवरून धबधबा पडतो त्याच कडयांवर खालून वर मेटाकु-टीनें जातां येतें. परंतु अंगावरचीं पांघरूणें मात्र बहु-तेक तुषारांनीं ओलीं होतात.

याला जाण्यास दोन वाटा आहेत. एक सातारा रस्त्याला अडीच मैल गेल्यावर डावे बाजूनें लिंगमळा बंगल्याजवळून वाट फुटते ती पाऊल वाट, व दुसरी केट पाइंटानजिक पुणें रस्त्यापासून निघते ती. या दोन्ही वाटांनीं मनुष्य धबधब्याच्या माथ्यावर येऊन पोहोंचतो.

# लोकसंख्या.

सन १९०१ सालचे खानेसुमारीप्रमाणें खुद्द मालकमपेठेंत कायमचे राहणाऱ्या लोकांची संख्या ९३४७ आहे. याशिवाय जंगलांत चार ठिकाणीं धावड लोकांची वस्ती आहे, ती मालकमपेठ गांवांतच मोडली जाते. येथील मूळ रहिवाशी लोकांच्या चार जाती आहेत. त्या कोळी, कुळवाडी, धनगर आणि धावड ह्या होत. परंतु ह्या ठिकाणाची रानटीपणाची स्थिति जाऊन त्यास मैदानांतील शहराप्रमाणें व्यवस्थितपणाचें स्वरूप आल्याबरोबर व्यापारी वर्गाला लोभ उत्पन्न होऊन ते येथें येऊन दुकानें थाटून राहिले. यामुळें आतां सर्व जातीचे व सर्व धंद्याचे लोक निरंतरचे येथें राहणारे बनून गेले आहेत. जेथें जीवितास व वित्तास धक्का पोंचण्याचें भय नाहीं त्या ठिकाणीं हवापाणी वगैरेविषयीं कोणत्याही प्रतिकूळ व

अनुकूल गोष्टी मनांत न आणतां पोटाकारितां मनुष्य गेल्यावांचून राहत नाहीं. याच तत्वावर हल्लीं येथें ब्राह्मण, गुजर, मारवाडी, मुसलमान वगैरे जाती बरकतीचे धंदे करीत आहेत. सर्वांत खरे व्यापारी वाणी, गुजर आणि मारवाडी लोक आहेत; आणि त्यांचें साधारण वस्ती असेल तेथें दुकान नाहीं असें कालत्रयींसुद्धां होणार नाहीं. त्याप्रमाणें त्यांची या जंगली मुलखांतही बरींच दुकानें आहेत.

सर्वांत जास्त भरणा धावड जातीचा आहे. त्याचे खालोखाल कुळवाडी लोकांची वस्ती येथें व डोंगराखालीं आहे. धनगर व कोळी लोकांची वस्ती ह्मणण्यासारखी येथें नाहीं, डोंगराखालीं आहे. ह्या चार जातींच्या चर्येत व बोलण्यांत पुष्कळ तफावत आहे. कोळीलोक सर्वांत हुशार आहेत. ते लोक बांधेसूद असून त्यांची छाती रुंद व शरीर गोल्दार असतें. त्यांची ठेवण रांठ असून दिसण्यांत ते आडमुठे दिसतात. मध काढणें, शेतकी, मजूरी व पारध करणें हे त्यांचे नेहमीचे धंदे आहेत. कुळवाडी लोकही शरीरप्रकृतीनें सदृढ आहेत व कोळी

लोकांपेक्षा त्यांची सुरतही बरी दिसते. हे लोक सदांसर्वदां शेतांत खपत असतात. धनगर लोक पूर्वी फार भोळसर होते. त्यांचा त्यावेळीं दूध, व लोणी विकण्याचा धंदा होता. त्यांस वजन मापाची कांहींच माहिती नसे, त्यामुळें लोक त्यांस फार नाडीत असत. कोणी आपला पाय तागडींत ठेऊन माझा पाय दोन शेराचा आहे असें सांगून त्याच्या दडपण्यानें वाटेल तितका माल लाटित असत. कोणी तागडीला बोट लावून त्यानें पारडें दाबून धरून माझें बोट पावशेराचें आहे असें सांगून त्यांस अशा रीतीनें सपशेल फसवीत असत, असें सांगतात. परंतु अलीकडे ते फार हुषार झाले आहेत, तथापि त्यांचा स्वभाव तामसी नाहीं. हे लोक शरीरानें कृश असून कामाला कणखर नाहींत. हे लोक गुरें राखून आपल्या कुटुंबाचें पोषण करि-तात. देशावरील धनगर लोकांप्रमाणें यांच्या जवळ बकरीं किंवा मेंढरें नसतात. परंतु गुरें कांहीं तरी जवळ पाहिजेत, तीं नसल्यास त्यांचें लग्न व्हावयाचें नाहीं. या जातीची अशी समजूत आहे कीं ह्मशींना

जेव्हां वाघ किंवा चित्ते यांचा वास येतो तेव्हां त्या आपल्या पालकाच्या सभोंवार फेर धरून उभ्या राहतात आणि ज्या बाजूनें वास येत असेल त्या बाजूला शिंगें रोंखून शत्रूचा चुराडा करण्याकरितां पवित्र्यांत उभ्या रहातात.

धात्रड किंवा लोखंडओतारी लोक हे मूळ कऱ्हाड गांवाकडून पाऊणशें वर्षांपूर्वी येथें आले. यांची जात मोठी कष्टाळू आहे. इतर जातींतील लोकांपेक्षां यांचीं गालाचीं हाडें उंच, डोळे बारीक, ओंठ जाड व वर्ण काळा असतो. यांचा लोखंड काढण्याचा धंदा बुडाल्यामुळें जमिनी घेऊन शेतकी करण्याची यांना गोडी लागली आहे. परंतु मजूरीच्या दांडगट कामांत यांच्या बायकांचा किंवा पुरुषांचा कोणीही हात धरूं शकणार नाहीं. यांची वस्ती येथें फार आहे, तरी सर्व लोक मजूरीच्या धंद्यावर कमाई चांगली करून आनंदांत असतात.

## चरितार्थ.

मांस, दूध, आणि धान्य हीं मनुष्याच्या उपजीविकेचीं मुख्य साधनें होत. यांपैकीं

कोणत्याही एकावर, दोहोंवर किंवा साऱ्या तिहींवर मनुष्यास आपला चरितार्थ करतां येतो. शिकार-करणें; मेंढरें, गाई, म्हशी, वगैरे जनावरें पाळून दूध-दुभतें करणें; आणि जमीन तयार करून तींत धान्य भाजीपाला, फळफळावळ उत्पन्न करणें—या तीन गोष्टींपैकीं पहिलीपेक्षां दुसरीस, व दुसरीपेक्षां तिसरीस अधिक श्रम, अधिक आत्मसंयमन व अधिक दूरदृष्टी लागते, हें सहज समजण्यासारखें आहे. तेव्हां ज्या लोकांत उपजीविकेचीं हीं तिन्हीं साधनें अस्तित्वांत आलीं असून त्यांची अवश्यकता पडूं लागली असेल, ते लोक पहिल्या किंवा दुसऱ्या साधनांनीं उपजीविका करणारे लोकांपेक्षां अधिक उद्योगी असले पाहिजेत हें उघड आहे!

फक्त मनुष्यमात्र या तीन प्रकारच्या आहारांपैकीं पाहिजे तो आहार करून राहूं शकतो. पण जसजशी त्याला उन्नतावस्था येत जाते, तसतसा त्याचा मांसाहार कमी होत जाऊन उद्भिज्जाहार वाढूं लागतो, असें कित्येकांचें मत आहे. पण येथें विशेष लक्षांत ठेवण्या-सारखी गोष्ट ही आहे कीं, मनुष्याशिवाय इतर

प्राण्यांचे जे तीन वर्ग ( १ ) केवळ मांसाहारी ( २ ) केवळ धान्याहारी व ( ३ ) मांसधान्याहारी त्यांच्या निरनिराळ्या आहारांवरून केले आहेत, त्यांपैकीं कोणत्याही वर्गांतील प्राण्यांस आपलें भक्ष्य "गोपाल" वृत्तीचें, किंवा कृषीवलवृत्तीचें अवलंबन करून संपादितां येत नाहीं. अशा रीतीनें आपला चरितार्थ करण्याची बुद्धि व सामर्थ्य फक्त मनुष्यांतच आहे. मनुष्याशिवाय इतर प्राणिसंख्येची बुद्धि नैसर्गिक प्राण्युत्पत्तीवर व भूमिगत उद्भिज्जोत्पत्तीवर अवलंबून असते. ती कमी झाली कीं, त्यांची संख्या कमी होते, व अधिक झाली कीं, अधिक होते. मनुष्याची तशी गोष्ट नाहीं. त्याच्या शरीराच्या व मनाच्या विशिष्ट रचनेमुळें त्याला उपजीविकेस लागणाऱ्या पाहिजे त्या वस्तु हव्या तितक्या उत्पन्न करतां येतात. यामुळें मनुष्यांची संख्या आणि त्यांस लागणारें अन्न हीं एकसारखीं वाढत आहेत.

हल्लीं या ठिकाणच्या लोकांच्या स्थितीला हें वरील तत्व सर्वथैव लागूं पडतें. अशा येथील भयंकर जंगलांत महाबळेश्वर क्षेत्रानजिक नहर म्हणून गांव

होतें, तें हल्लीं मालकमपेठच्या गांवांत सामील झालें आहे. त्या गावांत शुद्ध धनगर लोकांची वस्ती असे. ते नेहमीं पुष्कळ गुरें बाळगून दुधदुभत्यावर आपल्या निर्वाहाची तरतूद करीत. सदरहूप्रमाणेंच जवळच्या खेड्यांतील स्थिति होती. कारण, मुलूख डोंगराळ असल्यामुळें शेतकीस जमीन फार बेताचीच. या डोंगरांत झाडी फारच गर्द असल्यामुळें मांसाहारी व उद्भिज्जाहारी जनावरांना मग काय तोटा! हीं मांसाहारीं जनावरें कोठें कांहीं भक्ष्य मिळेनासें झालें ह्मणजे मनुष्यवस्तीजवळ येऊन गुरांढोरांना फार त्रास देत. परंतु पुढें सुधारणा होऊन १८५३ सालीं येथील सरकारी जंगलाची हद्द ९ मैल ठरून मर्यादित झाल्यामुळें येथील लोकांच्या संवयींत पुष्कळ फरक पडला. जंगलांतील गवत मोफत मिळेनासें झाल्यावर धनगर लोकांच्या " गोपालवृत्ती " चा पसारा त्यांना गुंडाळून ठेवावा लागला. त्यावेळीं पुष्कळ व्यापारी येथून व्यापाराकरितां लोणी घेऊन जात, ते अगदीं बंद पडले. तेव्हां उद्भिज्जाहारी जनावरें नैसर्गिक भूमिगत उद्भिज्जोत्पत्तीची-

मनाई झाल्याबरोबर कमी झालीं त्यामुळें मांसाहारी जनावरांनाही नैसर्गिक प्राण्युत्पत्तीची वाण पडली. ह्या धनगरी जनावरांचीं अर्भकें केव्हां तरी मांसाहारींच्या भक्ष्यस्थानीं पडत, तीं पडेनाशीं झाल्यामुळें त्यांनाही उतरती कळा लागली. याच पुरातन प्रचारांवरून धनगर लोकांत अशी चाल पडली आहे कीं, ज्या जवळ निदान दोनसुद्धां गुरें नाहींत त्यांचें लग्न होण्याची मुष्कील असते.

नंतर त्यांनीं कृषिवलवृत्तीचा स्वीकार केला. ते कुणबी लोकांप्रमाणें पांच मैलांतील खोऱ्याच्या तळभागांत शेतकी करूं लागले. डोंगराळ प्रदेशांत सर्व जंगल राखून ठेविलें, या व्यवस्थेंत शेतकऱ्यांचीच नुकसान झाली, आणि शेतकीला एकंदर जमिनींतून एक तृतीयांश जमीन मिळून तीही अगदीं संपुष्टांत आली. म्हणजे माणशी सरासरी अडीच एकर जमीन राहिली. पैकीं सातवा हिस्सा जमीन मात्र पाण्या खालचा ऊस, भात, खपली वगैरे पिकें होण्यास लायख अशी राहिली. इतक्या जमिनीवरच्या शेतकीवरच जर बहुतेक

लोकांनीं निर्वाह करण्याचें पूर्वींप्रमाणें अवसान घातलें असतें, तर त्यांना नुसती जगण्याचीसुद्धां पंचाईत पडली असती. आणखी या शेतकीची–शेतकीच्या उत्पन्नाची अगदीं अनास्था झाली आहे, त्यामुळें कृषीवलांतही कांहीं त्राण नाहींसा झाला आहे.

तथापि वर सांगितल्याप्रमाणें मनुष्यांची वाढ कमी झाली नाहीं. शेतकीची अशी आबाळ झाल्यामुळें महाबळेश्वरच्या भोंवतालच्या खेड्यांतील लोकांची स्थिति घांटावरील खेडगळ लोकांपेक्षां निकृष्ठतेस आली आहे, या कारणास्तव सडकेच्या कामावर किंवा मालकमपेठ येथें मोलमजूरी करून त्यास गुजारा करावा लागत आहे. मालकमपेठेस बाहेरून हवा खाण्यास पुष्कळ चैनी लोक येतात; त्यांच्याकडून यांना बरेंच काम मिळतें. तसेंच जंगलांत होणाऱ्या फुकटच्या व उपयुक्त जिनसांचा बराच खप असल्यामुळें त्यांत तर यांस याहून जास्त फायदा होतो. गुरांस खाण्यास व घराचीं छपरें करण्यास गवताची पुष्कळ चणचण असल्यामुळें, तें आणून विकण्यांतही त्यांना किफायत होते. त्याचप्रमाणें सर्पण, काठ्या, फणस, आंबे,

करवंदें, मधोंचीं पोळीं, नेचे, आर्चिड, शेवाळ वगैरे किरकोळ जिनसाही ते लोक आणून विकतात. ह्या जिनसा काढून आणण्यास जितके श्रम होतात व दिवस मोडतात त्या मानानें पाहिलें असतां घेणारांस जरी त्या जिनसास पुष्कळ पैसे दिलेसें वाटतें, तरी ते त्यांच्या मोडलेल्या दिवसाच्या मजूरीइतकेच पड-तात. बांबूशिवाय बाकीचे जिन्नस फुकट आणतां येतात. आणि बांबूबद्दलसुद्धां ह्मणण्यासारखी फी द्यावी लागत नाहीं. एकंदरींत लागवडीची तूट जंगलांतील जिनसांनीं भरून काढावी लागत आहे.

सन १८५३ सालच्या फेरफारामुळें त्यावेळच्या कृषीवलवृत्तीच्या वर्गास जें नष्टचर्य प्राप्त झालें होतें तें हें मालकमपेठ गांव अशा रेघारूपाला येईपर्यंत पुरलें. अंगमेहनत करून पैसा मिळण्याचा क्रम १२ महिने चालत नसल्यामुळें शेतकीसारखें यांत सतत राबावें लागत नसे. असो. असा कामाठीपणाचा धंदा करणारे लोकांस त्यांचे जातभाई प्रथम हलके मानूं लागले व ते कमजातीचे लोक बनून गेले. पुढें सर्वांनांच दिवस वाईट आल्यामुळें कालगतीनें त्यांच्या

वरचा कलंक नाहींसा झाला आहे. मुक्रार जंगलाच्या हद्दीचें क्षेत्र ४,२३९ चौरस फूट ठरविलें आहे आणि त्यांत लोकांचे पूर्वींचे हक्कांत फेरफार केला नाहीं.

मनुष्याच्या आहारवस्तु कष्टसाध्य आहेत, व त्यांची उपभोगेच्छा अमर्याद आहे, येवढ्या दोन गोष्टी स्पष्टपणें ध्यानांत घेतल्या ह्मणजे, त्यास इतर प्राण्यापेक्षां शेंकडोंपट अधिक उद्योग कां केला पाहिजे, हें सहज समजणार आहे. हें ज्यांस पक्कें समजेल तो सहसा निरुद्योगी होणार नाहीं. याशिवाय निरुद्योगी लोकांस उद्योगी लोकांच्या वश होऊन किती त्रास सोसावा लागतो, हें ज्यांस कळलें असेल तो तर स्वतः उद्योगी होईल इतकेंच नाहीं तर इतरांसही उद्योग करण्यास प्रवृत्त करील. विशेष उद्योगी मनुष्याचें सान्निध्य नसल्यास सामान्य उद्योग करून आयुष्य घालविणें शक्य आहे. पण कोणत्याही कारणानें उद्योगी मनुष्याशीं गांठ पडल्यास, एक तर त्यांच्या प्रमाणें उद्योग करण्यास, किंवा त्यांच्या आधीन होऊन तो ठेवील त्या स्थितींत राहण्यास तयार झालें पाहिजे. उद्योगाचे

दोन भेद आहेत. एक नियामक व दुसरा उत्पादक. पहिल्या वर्गांत, राजे, मंत्री, शिपाई पोलिस वगैरे फक्त समाजयंत्राचे चालक किंवा व्यवस्थापक येतात. दुसरे वर्गांत शेतकरी, कोष्टी, सुतार वगैरे सर्व प्रकारचे धंदेवाले येतात. येथील बाजारांत व आजुबाजूला सर्व दुसरें वर्गांत येणारे लोकांची गर्दी आहे. त्यांचा उद्योगही दीर्घ आहे. वाण्याचे दुकानांत वाण जिन्नस असून आणखी भुसारमालही मिळतो; गंधी असून तो पटवेकऱ्याचेंही काम करितो; असा यांना उत्पादक उद्योगाचा कंटाळा नसल्यामुळें जंगलांत बसले तरी सर्व, व्यापारी लोक कसे टुमटुमीत आहेत.

## धावड कोळी वगैरेंच्या चालीरीती.

येथें सर्व लोकांना मराठी भाषा समजतें. फक्त धावड व मुसलमान लोक खेरीज करून सर्वांची घरांतील बोलीही मराठीच आहे. धावड लोकांची भाषा मराठीच आहे, परंतु त्यांत हिंदुस्थानी शब्दांची बरीच भेसळ आहे. मुसलमान लोकांची मुसलमानी भाषा आहे. येथील सर्व लोकांच्या घरां-

वर व बंगल्यांवर कारोगेटेड पत्रे असून भिंती व लांकूड काम चांगलें मजबूत केलेलें असतें. प्रत्येक घराला किंवा बंगल्याला पुढें किंवा मागें जी खुली जागा असते, तिचे सभोंवार तांबडे लहान मोठे माणसाच्या डोक्यासारखे गुंडगुळे दगड गोळा करून आणून गडगडा घातलेला असतो. अशी दुसरीकडे कोठेंही पद्धत नसल्यामुळें परकीय मनुष्यास याची मौज वाटते. पेठेंत प्रत्येक घरामध्यें सुमारें तीन फुटाचा बोळ टाकून घरें बांधलेलीं आहेत; व घरांपुढें रस्त्यानजिक दाट छायेचा एकेक वृक्ष राखिला आहे; त्या झाडापासून उपद्रव झाला तरी म्युनिसिपालिटीच्या हुकुमावांचून त्याला धक्का लावण्याची मनाई आहे.

पेठेशिवाय आजुबाजूला झोंपडीवजा जंगलभर बंगले पसरलेले दिसतात. त्यांजबद्दलचे पद्धतशीर कांहीं नियम नसावे असें वाटतें. सर्व बंगल्यांना कंपौंड असून त्यांत सर्वत्र जंगली झाडांची छाया होऊन गेलेली असते. यामुळें बंगल्यांत बसलें ह्मणजे नेहमीं गार वारा येत असतो. बंगल्याच्या कंपौंडांत नवीन

इमारत करणेकरितां झाडें तोडण्याची आवश्यकता पडल्यास त्याजबद्दल सुपरिंटेंडेंट साहेबांची परवानगी घ्यावी लागते. कोळी व कुणबी नेहमीं पाणी नजिक असेल तेथें झोंपडें बांधून राहतात.

धावड व धनगर लोक येथील कायमचे रहिवासी झाले आहेत. धनगरलोक नेहमीं गाई, ह्मशी बाळगून, दिवसभर त्यांस चरणीला नेऊन त्यांचे मागें फिरत असतात. त्यांना शेतवाडी क्वचित् असते. यांजवळ देशाप्रमाणें, मेंढया, बकरीं वगैरे नसतात धावड लोकांना दाढी असते, व त्यांचा पेहेराव मुसलमानी धरतीचा असतो. बाकीच्या सर्व जातींचा पोषाख पुष्कळ अंशीं सारखाच असतो. कोळी लोकांचा धर्म हिंदु आहे. धनगर, कोळी व कुणबी यांचा एक ग्रामदेवता व दुसरी पालण करणारी देवता असते, त्याप्रमाणें येथील ग्रामदेव अनेक असून जन्नी ह्मणून एक रक्षक देवता आहे. तिला कांहीं सार्वजनिक संकटनिवारणार्थ देणें घेऊन जाण्याची येथें पूर्वापार चाल आहे, त्याप्रमाणें हल्लीं ब्राह्मण,

वाणी उदमीसुद्धां वागूं लागले आहेत. येथें वन-
देवता, वेडे व पितर यांची आराधना करून आपल्या
कार्याला त्यांची अनुकूलता संपादण्याची फार चाल
आहे. या देवतांची पूजा वगैरे करणारे गुरव देवळां-
तच असतात. त्यांना देवापुढें येईल तें घेऊन राह-
ण्यानें चांगलीच प्राप्ति होते. याशिवाय देवळांत
आणखी दोन मनुष्यें असतात त्यांस देवर्षी किंवा
देवाचे भक्त म्हणतात. त्यांच्या भाकणीला देव भाक
देतो अशी येथील मराठे, कोळी वगैरे लोकांची
समजूत असल्यामुळें त्यांजकडून हे गांवढळ लोक कौल
लावितात, आणि कौलांचा जबाब मागवितात. ह्यावर
येथील बहुतेक लोकांची फार श्रद्धा असते. इकडील
लोकांचा पिशाच्चयोनविर फार भरंसा आहे. आणि
त्या योनीपैकीं वेडे, पितर, मनुष्याचें बरें वाईट करणारीं
दैवतें आहेत असें मानून हे लोक त्यांस फार भजत
असतात. यामुळें त्यांच्या भगत लोकांची चलती
चांगली चालते. हे लोक आपल्यापैकीं ज्यानें कोणी
आपलें नुकसान, घातपात, चोरी वगैरे करून उप-
द्रव दिला असेल त्या इसमाचें कांहीं अनिष्ट करण्या-

बद्दल त्या भक्ताकडून देवाला गाऱ्हाणें घालितात व त्याचा सूड घेण्याचा यत्न करितात. यामुळें सर्व लोक एकमेकांला वचकून असतात. या निरनिराळ्या जातींचा सोयरसंबंध होत नाहीं. हा फक्त जातींतल्या जातींतच होतो. तथापि या सर्व जातींपैकीं उंच जातीच्या मनुष्यानें स्वयंपाक केला असला तर त्यापेक्षां कमी व त्याच्या जातीचे सर्व लोक तो घेऊन जेवण करितात. कोळी, कुणबी, धनगर या सर्व जातींचे लोक चांगले धट्टेकट्टे असतात. त्यांची कुटुंबेंही फार वाढतात. ह्या जातींचीं माणसें लौकर थकून मरत नाहींत.

हिंदु धर्म व मुसलमानी धर्म यांचें मिश्रण होऊन धावड लोकांचा धर्म बनला आहे. हे सर्व मांसाहारी असून सांपडेल तेव्हां पारध करितात. यांचें नेहमींचें खाणें धान्याचें आहे. तें ते अस्सल प्रतीचें आणून चैनीनें खातात. ही जात फार कष्टाळु आहे, आणि नेहमीं मोलमजुरी करून उपजीविका चालविते. या लोकांचे घरीं हिंदूंचे देवही असतात. व त्या देवांचे ते हिंदू धर्माप्रमाणें पूजन करितात. हिंदूंचे

सर्व सणाला हिंदुंप्रमाणें खाणें ठेऊन पोशाख नेहमींपेक्षां ते चांगला करितात. ही जात फार दारूबाज आहे.

---

## बाजार.

येथील बाजार अगदीं भरवस्तींत आहे. बाजार बसला आहे त्या जागेला डोंगराचा उतार ( slope) आहे, परंतु त्यांत टपे टपे ठेऊन थोडथोडी सपाट जमीन काढली आहे आणि त्यांत दुकानें घातलीं आहेत. लांबून ख्रिस्ती देवळाची उंच इमारत दिसते, त्याचे दक्षिणेस हा बाजार आहे. या मालकमपेठच्या वस्तीला, पूर्वपश्चिम दुतर्फा घरें असलेल्या तीन सडका आहेत. यांपैकीं दोन सडकाच्या बाजूंनीं दुकानें बांधलेलीं असून नेहमीं त्यांत वस्ती असते. ख्रिस्ती देवळालगतच्या बाजूला सुमारें ४।५ घरें आहेत. येथें राहणारे सर्व लोक व्यापारी व नौकर आहेत. येथें इनामदार किंवा भिक्षुकी करून सुखवस्तु राहणारे लोक नाहींत. या बाजारानें २३ एकर १०७० यार्ड जागा भरून काढली आहे.

पेठेचे मध्यभागीं सर्व दुकानें आहेत, या भागालाच मुख्यतः **मालकमपेठ** असें म्हणतात. दुकानाच्या मागलि दारीं या दुकानदारांचीं कुटुंबें राहतात.

| | | |
|---|---|---|
| **ब्राह्मण** | **मराठे** | **वाणीपंचम** |
| **पारशी** | मुसलमान(काजी) | **धावड** |
| **धनगर** | **कोमटी** | **मारवाडी** |
| **गुजर** | **जैन मारवाडी** | **शिंपी** |
| **रोटीवाले** | **भोरी मुसलमान** | |
| **मेमन मुसलमान** | **चांभार** | **बुरुड** |

इत्यादिकांची वस्ती आहे. यांपैकीं वहुतेक जातीच्या लोकांचीं दुकानें आहेत. त्यांत सर्व प्रकारचा माल मिळतो. परंतु तो **सातारा वांईकडून** येत असल्यामुळें महाग विकतो.

कोणते जातीचे लोक काय व्यापार करितात तें खालीं देतों:—

**ब्राम्हणलोक**—सराफी, अडाणी लोकांचीं पत्रें वगैरे लिहिणें आणि देवघेवीचे व गाहणापाणाचे व्यापार हे धंदे मुख्यत्वें करून करितात. त्यांचीं दुकानें आहेत.

पारशी--मेल कंत्राटदार व इतर लोकांस टांगे, फेटर्णा भाड्यानें देणें, युरोपस्थ लोकांस लागणारे दारू वगैरे पदार्थ, आगाऊ सूचना दिली म्हणजे फिश आणून देणें, बर्फ, सोडावाटर वगैरेचीं दुकानें या लोकांचीं आहेत.

मुसलमान--यांची चावडीनजिक म्युनिसिपालिटीनें बांधलेलीं भाजीपाला व फळफळावळीचीं दुकानें आहेत. त्यांत हंगामाचे दिवसांत बटाटे, कोबी, फुलावर, नवलकोल, बीट, वाटाणे, या इंग्रजी भाज्या; कांदे, लसूण व इतर सर्व एतद्देशीय फळभाज्या व पालेभाज्या; स्ट्राबेरी, राजबेरी, गूजबेरी हीं इंग्रजी फळें; नागपूरकडील फळें; वसईचीं लाल केळीं; रत्नागिरी व गोमांतकचे हापूस पायरीचे आंबे; पुण्याकडील संत्रें, सफरचंद, अंजीर, द्राक्षें, चकोत्री, पेरू, आननस, सोनकेळीं, करवंदें, जांबळें, लिंबें, आलें, तोरणें, अंबोळकी वगैरे एद्देशीय फळें कालमानाप्रमाणें मिळतात. इंग्रजी फळें व भाज्यांखेरीज सर्व माल वांई, सातारा वगैरेकडील असतो. इंग्रजी तऱ्हेचा माल मात्र येथें कोरतात.

**मराठे, धनगर, कुणबी**—येथें मराठे धनगरलोक गाई ह्मशी आणि शेरड्या बाळगून दूध व लोणी यांचा व्यापार करितात, हें वर सांगितलेंच आहे. शिवाय सीझनमध्यें **वांईचे** गवळीलोक आपलीं दुभतीं जनावरें घेऊन येऊन येथें राहतात. जवळ पासच्या खेड्यांतील लोकही लोणी सांठवून येथें विक्रीस आणतात. येथें डेरी ( लोणीखाना ) नाहीं. **पांचगणी** येथील डेरीचें व **मुंबईचें** लोणी येथें विक्रीस येतें, तें पारशी व साहेबलोक मात्र घेतात.

**मारवाडी**—कापडाचा व भुसार माल ( बाजरी, जोधळें, तांदुळ, दाळ, मीठ. ) वगैरेंचा व्यापार करितात.

**शिंपी**–शिप्यांचीं दुकानें येथें वरींच आहेत. कांहीं कापडाचा व्यापार करून शिवण्याचाही धंदा करितात. कांहीं नुसतें शिलाईचें काम करणारे आहेत. पावसाळ्यांत काम नसलेमुळें बहुतेक निघून जातात.

**वाणी, पंचमवाणी, तिराळे, गुजर व कोमटी**–यांचीं किरकोळीनें वाणजिन्नस व भुसार माल विकण्याचीं दुकानें आहेत. तेथें सर्व प्रकारचें धान्य, गोडें तेल, खो-

बरेल, तूप, स्टेशनरी, वगैरे सामान मिळतें. बाजरीचें पीठ, मैदा, रवा, वगैरेही मिळतात.

रोटीवाले—येथें रोटी चांगली मिळते, परंतु ती २० वर्षांपूर्वीं मिळत होती तशी मिळत नाहीं. याचें कारण असें सांगतात कीं, ताडीवर जकात फार बसल्यामुळें ताडी येथें आणण्याचें परवडत नाहीं. ह्मणून बटाटे व दुसऱ्या वनस्पतींच्या दारूचा यांत उपयोग करावा लागत असल्यामुळें ताडीनें होत होत्या तशा रोट्या हल्लीं उत्तम होत नाहींत.

बोहरी व मेमन—यांच्या दुकानांत कांचेचे दिवे, त्यावरील चिमण्या, चिनी बशा पेले, स्क्रू, खिळे वगैरे व दुसरें पुष्कळ नकली सामान असून तूप, मेण मुंबईस, पाठविणें वगैरेचाही हे व्यापार करितात.

धावड—हे मजूरीचीं कामें, गवंडी काम, शेतकी व बागाईताचें काम करितात, व जंगलांतून निरनिराळ्या प्रकारच्या काठ्या आणून विकतात, व कोणी हेलकऱ्याचींही कामें करितात.

**चांभार**--हे लोक उत्तम प्रकारचे बूट, स्लिपर व चढाव बांधितात. याशिवाय इतर घाटाचे जोडे करणारे चांभार येथें फार कमी असतात.

**बुरूड**—बुरूड लोक वेताचे करंडे, खुर्च्या, वगैरे-चीं विणकर कामें करितात. शिवाय बांबूंचे तट्टे, पारसलें पाठविण्याचे करंडे, आणि दुसरे सुपें वगैरे हर तऱ्हेचे जिन्नस करितात.

**खाटीक**—भाजी मंडईचेनजिक मटन मारकेट आहे तेथें बकऱ्याचें व मेंढ्याचें मांस, कोंबडीं व कोंबड्याचीं अंडीं मिळतात. याचे पलीकडे बीफ ( गोमांस ) विकण्याचा बाजार आहे. या व्यापा-राला सरकारांनीं मर्यादित केल्यास डोंगरमाथ्या-वर पुढें गुरांचा तोटा पडण्याची भीति राहणार नाहीं.

याशिवाय गाड्या नीट करणारे घिसाडी, टिनचे डबे, कंदील करणारे टिनमन व फर्निचर भाड्यानें देणारे हौउस एजंटही येथें आहेत. दवाखान्याजवळ ट्रेचर कंपनीचें औषधाचें व दुसरे साहेब लोकांचे खान्याच्या सामानाचें दुकान आहे.

लांकूड फाटी व कोळसा येथें स्वस्त मिळतो, तो धावड कुणबी लोक जंगलांतून आणून विकतात. येथें गवत विकावयास पुष्कळ येतें, व तितकें सर्व खपून लागलींच लोक परत घरीं जातात. बटाटे, मध व मेण या मालाची येथें उतारपेठ आहे. कोळी लोक जंगलांतील हजारों रुपयांचा मध आणून बाजारांत विकतात. तसेंच इमारतीचें जंगली कांपीव लांकूडही बाजारांत आड्यावर विकावयास बरेंच येतें. कोंकणे तांदुळ, देशी तांदुळ वगैरे धान्यही येतें. कडबा, कोळंब, ताबीट, कारवी, सागाचीं पानें, सापड्या, वासे वगैरे माल सकाळीं विक्रीस येतो.

मार्च महिन्यापासून येथें लोक येण्यास सुरुवात होते, तेव्हां दिल्ली वगैरेकडील जवाहीर विकणारे, काश्मीरकडील लोकरी कपडे विकणारे, दिल्ली आग्र्याकडील सतरंज्या विकणारे, फळफळावळ विकणारे यांची येथें गर्दी होऊन जाऊन बंगलोंबंगलीं विक्री करण्याकरितां ते फिरत असतात.

पेठेंत पश्चिम अंगास रोमन कॅथालिकचर्च आहे, व त्याच्या पलीकडे नवीन बांधलेली लायब्ररीची

टोलेजंग इमारत आहे. तेथून नर्जीक दवाखाना आहे. पूर्वबाजूस पेठेंत अमेरिकनचर्च आहे; व त्याचे मागील अंगास मराठी शिकण्याची २ स्कूलची इमारत आहे. येथें एक धर्मशाळा चांगली बांधलेली आहे. नर्जीक फारेस्ट आफिसची सरकारी इमारत आहे. २ स्कूलच्या मागील अंगास सार्वजनिक पायखाने असून खाटीक लोकांना गुरें, बकरीं कापण्याची जागा केलेली आहे. व येथेंच महार व मांग लोकांच्या झोंपड्या आहेत. या मैदानाला बॉनी व्ह्यू असें नांव आहे. ही घाण या मैदानांतून काढून दुसरीकडे नेली ह्मणजे सॅंडल बॅककडे तोंड करून घरें बांधण्यास फार चांगली जागा आहे.

प्रत्येक महिन्याचे पहिले तारखेस बाजारभावाची निरखपट्टी चावडीवर व फ्रिअरहालमध्यें लावितात. परंतु त्यांतील दराप्रमाणें विकण्यास कोणी बांधले जात नाहींत. तथापि त्यांत विशेष फरक होत नाहीं.

---

# हॉटेलें. ( HOTELS )

महाबळेश्वरक्लबाखेरीज येथें युरोपियन किंवा पारशी लोकांकरितां तीन हॉटेलें ( खाण्याराहण्याची सोय असलेल्या संस्था ) आहेत. ( १ ) रिपन हाटेल येथील तार आफिसालगत आहे. त्यांत राहण्याची जागा, फर्निचर वगैरे उत्तम प्रकारचें असून सभोंवारची झाडी सूर्याच्या प्रखर तेजाचा तर मुळींच आंत शिरकाव होऊं देत नाहीं. यामुळें ही हाटेल फारच सुखकर झाली आहे. तसेंच ही हाटेल अगदीं मध्य वस्तींत असून फ्रिअर हाल, जिमखाना, पोस्ट व तारआफिस याच्या निकट आहे. ( २ ) फाउंटन हाटेल दक्षिण बाजूस सासून पाइंटाच्या रस्त्यावर आहे. ह्या हाटेलला फार रमणीय ह्यू आहे. ( ३ ) हाटेल पूर्व भागास या शैलाशिखराच्या शेंवटास रेसव्ह्यू नांवाच्या इमारतींत आहे. येथून वेण्णा सरोवराचा व त्याच्या आसमं-

ताच्या झाडीचा चमत्कार व जिमखान्यांतलि खेळांची धुमश्चक्री पाहण्यास छानदार सांपडतें. ह्या तिन्ही ठिकाणीं रोजचा आकार ४ रु० पासून ७ रु० पर्यंत मिजासीचे मानानें द्यावा लागतो.

यहुदी आणि पारशी लोकांच्याकरितां येथें विश्रामालयें आहेत तीं—रे व्हिला, रायल फॅमिली व महाबळेश्वर क्लब. या संस्थांच्या व्यवस्थितपणाचा अनुभव घेतलेल्या एका प्रवाशानें असें लिहून ठेविलें आहे कीं जे कोणी लोक यास उदार आश्रय देतात त्यांस त्यांचे चालक चांगली बरदास्त ठेवून खूष करितील. या विश्रामालयांत येऊं इच्छिणाऱ्या प्रवासी जनांनीं त्यांचे चालकांस त्याप्रमाणें सूचना मात्र आगाऊ लिहून दिली पाहिजे.

महाबळेश्वरीं सर्व कांहीं चांगलें आहे पण एक मात्र चांगलें नाहीं; तें काय ह्मणाल, तर राहण्याची सोय. पण ही गोष्ट अंमलवाल्या, पैसेवाल्या इंग्रज लोकांस आणि फक्त पैसेवाल्या हिंदु, पारशी व मुसलमान लोकांस लागं नाहीं. पंचाईत पडते ती कायती गरीब लोकांची ! अगोदर भीक, त्यांतून रोजगार मिळाला तर बायका

पोरें व इतर नातलग पोसावयाचे असल्यामुळें सदोदित हातातोंडाशीं गांठ असते. तेव्हां येथें येऊन राहण्यास अद्वातद्वा खर्च कोठून करणार! शिवाय परतंत्रता विघ्नसंतोषीपणा करण्यास तर एका पायावरच तयार असते. आतां जे लोक धंदाउद्योग, शेतकी वगैरे करून दोन पैसे मिळवितात, व संचय करितात त्यांना ऐपत असते. परंतु त्यांना येथें जाण्यापासूनचे फायदे कळत नाहींत. सारांश महाबळेश्वर आपलें असून तेथील सुख आपलें दैवीं नाहीं. पण गरीब लोकांनीं असें ह्मणून पोटांत काय घालावयाचें आहे? यांच्या खेरीज अंमलदारांचा आणि श्रीमंत लोकांचा निभाव कसा लागावा? साहेबाला शिरस्तेदार पाहिजे, कारकून पाहिजेत, पटेवाले पाहिजेत. सारांश, बहुतेक त्यांचें हापिस पाहिजे. संस्थानिकांना त्यांचे कारभारी, त्यांचे शिक्षक, त्यांचे कारकून, त्यांचे चारदोन स्नेही, हुजरे, पाणके, आचारी, वगैरे लोक पाहिजेत. या लोकांची मात्र व्यवस्था नीट रीतीनें लागत नाहीं. संस्थानिकांच्या आश्रितांची स्थिति थोडी बरी असते. कारण, हे

आपल्या मालकाच्या बंगल्यांत कोठें तरी पडून राहतात.

पण साहेब लोकांच्या हापिसांतील नोकरांची फार त्रेधा उडून जाते ? सरकारांतून कितीही मोठे भाडें मिळालें तरी तेवढ्यानें उन्हाळ्यांत येथें राहण्यास चांगलें घर मिळत नाहीं. महिन्या दीड महिन्यासाठीं, पंचवीस तीस किंवा चाळीस रुपये देऊन कोणाला एखाद्या वाण्याच्या अंधाऱ्या माजघरांत, कोणाला एखाद्या ब्राम्हणाच्या धुरकट स्वयंपाक घरांत, कोणाला एखाद्या कुणबटाच्या खोपट्यांत गुजारा करावा लागतो! तसेंच येथें पाण्याचीही मोठी सक्त मेहनत आहे. पाणी लांब असून खोल असल्यामुळें विहिरींतून एक घागर किंवा हंडा वर काढून घरीं आणून टाकी तोंपर्यंत हातागायास आणि पाठीच्या कण्यास चांगलाच व्यायाम होऊन जातो ! कोणी विशेष वातबद्ध स्त्री असेल तर तिच्याकडून येथील विहिरींच्या दहा बारा घागरी रोज आणवाव्या, ह्मणजे एका पंधरवड्यांत तिचा बहुतेक वात झडून

जाईल असें आह्मांस वाटतें ! अशा अडचणीमुळें स्वयंपाक करण्यास ज्यांस फार ताप होत असेल कशा भांडींकुंडीं व शिधासामुग्री यांची जुळवाजुळव करण्यास कपाळास पित्त येत असेल त्याला येथें ब्राह्मणाच्या एका व शूद्राच्या बऱ्याचशा खाणावळींत स्वस्थ बसून जठराग्नि शमन करण्याची सोय आहे. त्याबद्दल ब्राह्मणाचे खाणावळींस दरमाहा रुपये ८ पासून १० पर्यंत व शूद्रांच्या खाणावळींत कमी प्रतीचें खाणें खाल्यास दरमाहा रु० ५ पर्यंत आकार पडतो.

कोणी एखादा गरीब मनुष्य येथें येऊन आपली झोळी सजवीन ह्मणेल तर तेवढी मात्र सोय नाहीं. कारण येथें कोणत्याही जातीचें एकसुद्धां भिकार कोठेंही दृष्टीस पडत नाहीं. परंतु जर कदाचित् कोठें दृष्टीस पडलें तर त्यास पोलिस धरून हाकून लावितात. येथें गरीब भिकारी लोकांकरितां एक फंडाची रक्कम वर्गणी करून जमविलेली आहे, त्यांतून त्यांस पैसा वांटतात. हा पट्टा जमविण्याकरितां वर्गणीचें बूक सर्वांकडे घेऊन जाऊन त्यांच्या मर्जीप्रमाणें

त्यांजवर आंकडा घालून लागलींच धर्मखात्याचा पैसा त्याप्रमाणें देऊन टाकितात.

तात्पर्य, जाग्याचे इतके हाल सोसून देखील येथें महिना दीड महिना काढणें फायदेशीर आहे. ज्याप्रमाणें तरूण स्त्रीला सासुसासऱ्याचा, नणंदाजावांचा किंवा दुसऱ्या कोणाचा कितीही जाच असला तरी जर तीवर नवऱ्याचें पूर्ण प्रेम असेल, तर त्याची तिला फिकीर वाटत नाहीं; उलट माहेरापेक्षांही सासरच अधिक सुखावह वाटतें. त्याप्रमाणें अवांतर गोष्टींपासून कितीही त्रास झाला तरी एका हवेच्या सुंदरपणामुळें बाकीच्या सर्व संकटांअडचणींची कोणास कांहीं दिक्कत वाटत नाहीं.

येथील सुखाची काय प्रौढी वर्णावी ? बर्फ न घालतां गार व गोड पाणी; कोठेंही पडलें तरी गार व स्वच्छ हवा; गोठ्यांत पडा कीं पडवींत पडा, जमिनीस आंग लागल्याबरोबर निद्रेची मिठी, अतिशय भिकार जागेंत देखील एक ढेंकूण, डांस किंवा पिसू दिसण्याची मारामार; कितीही श्रम झाले तरी सदरा काढून टाकून जरासें हुश्श हुश्श

केलें, पाण्याची एखादी चूळ भरून टाकली, पानसुपारीचा एखादा बार भरला, किंवा चिलमीचे-( साध्या चिलमीचे ) व विडीचे चार दोन झुरके घेतले, कीं पुनः आपले पहिल्यासारखे हुशार! कांहीं खाल्लें तरी साफ पचावयाचें-आणि कितीही खाल्लें तरी अधिकच खावेंसें वाटावयाचें अशी जेथलि हवा, अशा ठिकाणीं जागेच्या अडचणीपासून होणाऱ्या त्रासाकडे कोणी फारसें लक्ष्य देत नाहीं. या कारणास्तव महाबळेश्वरीं जाण्याचें जरी फुकाचें नाहीं तरी ज्यांना नोकरीचा धोशा पाठीमागें नाहीं असे लोकही येथें येतात. परंतु त्यांची संख्या फार थोडी असते, व पैसा खर्च केल्याचें पूर्ण फळ त्यांना मिळतें, इतकेंच नाहीं तर द्विगुणितही मिळतें.

अशी जागेची चणचण आहे तर मुंबईचे किंवा पुण्याचे सावकार लहान लहान घरें किंवा चाळी येथें येणाऱ्या कोणा सामान्य स्थितीच्या लोकांकरितां कां बांधून ठेवित नाहींत, अशी कोणी शंका घेईल; पण पैसेवाले लोक आपल्या रक्कमा येथें चाळींत वगैरे गुंतवून ठेवण्यास कां धजत नाहींत याचें

उत्तर असें आहे कीं,–उभ्या वर्षाचें भाडें येथें एप्रिल व मे या दोन महिन्यांत उभें करावें लागतें. ह्मणजे बारा महिन्याचें भाडें या दोन महिन्यांच्या सीझनवर किंवा ऋतूवर लादावें लागतें ! व त्यामुळें दिसण्यांत त्या भाड्याची रक्कम फार जबर दिसते. पण वास्तविक पाहतां इतकें भाडें घेऊन घरांच्या मालकांस ह्मणण्यासारखा फायदा होत नाहीं. बाकीच्या गांवोगांव घरांत कोणी रहात नसल्यास कुलूप घालून जातां येतें, परंतु येथें त्यास निदान पावसाळ्यांत कुलूप लावून ठेऊन चालत नाहीं. कारण पर्जन्यातिशयामुळें पावसाळ्यांत घराचा बचाव करण्यास गवताचा वगैरे बराच खर्च लागतो; व त्यावर नेहमीं नजर ठेवावी लागते; तथापि ज्याप्रमाणें बाजारांत येणारा माल आणि तो घेणाऱ्या ग्राहकांची संख्या यांचा एकमेकांवर परिणाम घडतो, त्याप्रमाणें येथें जसजशी अधिक अधिक सोईचीं घरें मिळूं लागतील तसतशी आरामासाठीं येणाऱ्या लोकांची संख्या वाढत जाईल असा आमच्या स्वतःच्या घरांवरून आह्मास अनुभव आला आहे.

---

## बंगले.

---

या महाबळेश्वरच्या हवापाण्याची प्रशंसा करावी तितकी थोडीच आहे यांत कांहींच संशय नाहीं, हें केवळ आह्मीच ह्मणतों असें नाहीं. परंतु याची सत्यता श्रीमान युरोपियन व नेटिव कामगार व विद्वान डाक्तर लोकांच्या चिकित्सेनें चांगल्या आरोग्य वर्धनीय ठरलेल्या हवेचा अनुभव घेतलेले इतर सधन लोक यांच्या कृतीवरूनही उघड दिसत आहे. कारण या सानिटेरियमच्या सुखकर जागेवर येऊन राहण्याचे सोयीसाठीं कसलें तरी बरें वाईट, " हट किंवा काटेज" नवीन बांधून ठेवण्याचा किंवा पूर्वीं बांधलेले असेल तें या ठिकाणच्या अतिवृष्टीपासून, सुरक्षित राखण्याचा क्रम फार दिवसापासून चालला आहे. त्याचें पाऊल दिवसेंदिवस पुढेंच पडत आहे. यांचे मालक कोणी विलायतचे, कोणी मुंबई, पुणें, इंदूर, मिरज, जमखिंडी, असे दूरचे प्रदेशांतील राह-

ारे असतांही त्यांनीं व आमचे मुंबई सरकार यांनीं थें हजारोंच्या हजारों रुपयांचा खर्च करून या भकर जंगलांत वसाहात करून टाकिली आहे. असा ा लांब लांब ठिकाणच्या श्रीमान लोकांच्या मनावर ो परिणाम घडला तो वस्तुस्थिति तदनुरूप असयाशिवाय घडणार नाहीं हें आतां कोणीही कबूल करील.

या बांधलेल्या इमारतींत मालकांस प्रतिवर्षाच्या थंड व उष्ण काळांत जरी राहण्यास झालें नाहीं तरी त्यांच्या इमारती भाड्यानें देण्याची त्यांची खुषी असल्यास त्या रिकाम्या राहत नाहींत एवढेंच नाहीं, परंतु त्यांचें चांगलेंच रेलचेल भाडें मालकास मिळतें. हें पुढील लिस्टावरून दिसेल. या प्रमाणें येथील बंगले, घरें, खोपटें इतर जमीनजुम ल्याप्रमाणेंच उत्पन्नाच्याबाबी झाल्या आहेत. अशा हवापाण्याचे सौख्योपभोगाकरितां दरसाल शेंकडों रुपयांचा येथें येण्यानें चुराडा झाला तरी त्याची कांहीं फिकीर वाटत नाहीं. असें समजूनच बडेबडे साहेब लोक, महाराज छत्रपति कोल्हापूर,

महाराज होळकर, महाराज गायकवाड, कच्छचे राव, महाराज भावनगर, मिरज, कुरुंदवाड, व अक्कलकोट वगैरे ठिकाणचें सरदार, मारवाड उत्तर हिंदुस्थान वगैरे ठिकाणचे राजे लोक, लिमडीचे संस्थानिक, मोठमोठे जज्ज, वकील, बारिस्टर यांची येथें बरीच गर्दी झाल्यामुळें थोडें दिवस शहराची रोषनाई येऊन अगदीं जणूं कांहीं घटोत्कचाचा बाजारच बनून जातो.

महाबळेश्वरीं येण्यांत खर्चाची मुख्य रक्कम ह्मटली म्हणजे घरभाडें होय. मोठमोठ्या साहेब व इतर बडे लोकांचे बंगले मालकमपेठेच्या वस्तीपासून दूर आहेत. त्यांपैकीं कांहीं बंगल्यांत मात्र मालकाखेरीज कोणी लोक भाड्यानें राहत नाहींत. त्यांस पुढील यादींत आदमासिक भाडें सांगितलें नाहीं. ज्यांचें भाडें दाखल केलें आहे तेसुद्धां त्यांच्या मालकांस नकोसें असतील तेव्हांच दुसऱ्यास मिळतात. अशा भाड्यानें मिळणाऱ्या एकेका बंगल्याचें भाडें हिंवाळ्याकारितां व उन्हाळ्याकारितां निरनिराळें ठरवावें किंवा दोही ऋतूंचें एकदम ठरवावें. त्याचा साधा-

रण मगदूर किती आहे हें आम्ही पुढील कोष्टकांत दिलें आहे. या ठिकाणीं भाडें ह्मटलें ह्मणजे आठ दिवस राहिलें तरी सीजनचेंच भाडें द्यावें लागतें. कारण घरवाल्यांना वर्षाचें भाडें आठ महिन्यांत वसूल करून घ्यावें लागतें. कदाचित् कोणास वाटेल कीं इतकालें भाडें घेतात त्याअर्थीं घरवाल्यांची चैन असेल; परंतु ही समजूत खोटी आहे; कारण, साधारण बंगला बांधण्यास देखील पैसा व श्रम फार लागतात. या दुःखासही घरवाले इतके भीत नाहींत. परंतु पावसाळ्यामध्यें घरें जतन करण्याचें काम फार कठीण असतें. कारण पाऊस फार अवखळ व वादळें फार असल्यामुळें घरांचा खुळखुळा होऊन जातो व बांधण्याच्या खर्चापेक्षां डागडुजींतच पुष्कळ पैशाचें नुकसान होतें. इतकेंही असून हे बंगले महालासारखे मोठे विस्तीर्ण किंवा सोईचे असतात असें नाहीं. त्यांना बहुधा ' हट ' अगर " काटेज " अशी संज्ञा असते व त्याचप्रमाणें त्यांचें स्वरूप असतें. मुख्य सुख इतकेंच कीं हरएक बंगल्यासभोंवार सुखप्रद, रमणीय आणि गर्द झाडी असते, तेणेंकरून

पूर्वींच्या ऋष्याश्रमाची किंवा पर्णकुटिकेची कल्पना मनांत येते. नामदार गव्हरनरसाहेब, डेविड सासून व सर दिनशा पेटिट यांचे बंगले राजकीय आहेत; परंतु अशा घरांची संख्या मोजण्यास हाताचीं बोटें देखिल फार आहेत. मध्यम प्रतीच्या गृहस्थास मालकमपेठेंत वाण्याउदम्याचीं रिकामीं घरें व दुकानें राहण्यास मिळतात. कित्येक झोंपड्या मोकळ्या जागेवरही आहेत. त्यांस मात्र भाडें बेताचें पडतें.

या पुढें दिलेल्या यादींत दोन्ही ऋतूंचें प्रत्येक बंगल्याचें साधारणपणें पडणारें भाडें दाखवून त्याच्या कंपौंडाचें क्षेत्र व त्याचें भुइभाडेंही सरासरीनें दिलें आहे, तें अशाकरितां कीं यांपैकीं एखादा बंगला खरेदीच घेण्याचें कोणाच्या मनांत आलें तर हें पुस्तक संग्रहीं ठेविल्यानें त्यासंबंधी सर्व माहिती त्यास काढीत बसण्याची बहुतेक तसदी पडूं नये.

या सर्व बंगल्यांना तबेले व नोकर राहण्याच्या सोई केलेल्या आहेत यामुळें येथें येऊन राहण्यांत गाड्या घोड्याची हयगय होण्याची काळजी पडत

नाहीं. व कोठें कोठें बंगल्यांत विहिरीही काढलेल्या असतात.

बंगला लहान किंवा गैरसोईचा असल्यास आणखी नजीकच चालचलाऊ गवती छपरें करून घ्यावीं लागतात. येथें हाटेलांतून उतारूंची गर्दी होऊन गेली म्हणजे असले गवती तंबु लोक राहण्यास नेहमीं करितात. हल्लींच्या पत्र्यांच्या घरांना व बंगल्यांनासुद्धां पूर्वी असेंच गवती आच्छादन असे. परंतु त्याची जळून खाक होण्याची किंवा वावटळानें वावडी उडण्याची फार धास्ती करीत बसूनही पुन्हां तें दर दोन वर्षांनीं पावसानें कुजल्यामुळें जुनें काढून नवें करावें लागेच; या सर्व कारणांमुळें आतां जिकडे तिकडे पत्र्याच्या इमारती झालेल्या दिसतात, तथापि पूर्वीचा नमुनाही कोठें कोठें नजरेस येतो.

या पुढील लिस्टाचा अनुक्रम सरकारी बंगला ( गव्हरमेंट हौस ) येथें असलेल्या सर्व बंगल्यांत अप्रतीम असल्यामुळें मूळारंभीं धरून एकंदरीची यादी केली आहे.

## महाबळेश्वर येथील बंगल्यांच्या नांवांचें लिस्ट.

| | बंगल्याचें नांव. | मालकाचें नांव. | क्षेत्रफळ. एकर गुंठे. | भाड्याचें प्रमाण. थंडऋतु १५आ. ३१जा. | भाड्याचें प्रमाण. उष्णऋतु १५ मा. १५ जून | लोकलफंडसहित आकार. (अजमासें) | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | वेलाग्हिस्टा. | सरकारी. | | | | | | |
| २ | टेरेसिस. | ,, | | | | | | |
| ३ | पार्कहाल. | मि. तुळशीदास केशवदास. मुंबई. | ११८७ | १५० | ६५० | ३९ | ६ | ० |
| ४ | वेस्टवुड. | मनमोहनदास रामजी. | ,, | २०० | १००० | ,, | ,, | ,, |
| ५ | राकडेल. | नसरवानजी धनजीशहा. | १५८३३ | २०० | ८०० | ४७ | ५ | ६ |
| ६ | जिजीलाज व धन-काटेज. | मि० फेरोजशा बोमनजी | ९८१० | २०० | १००० | ३१ | १ | ३ |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ७ | हरमिटेज. | भाईशंकर नानाभाई. | ५८७ | १० | ४०० | १०३ | ५ | ३ |
| ८ | मोनेस्टरी. | ,, | | १५० | ७०० | | | |
| ९ | मिथिबाई काटेज. | मि० केरावाला. | | १०० | ४०० | | | |
| १० | एलफिन्स्टनकोटज. | मि० केरावाला. | १५ | | | ४७ | १३ | |
| ११ | ब्रायर्स. | श्री० पंतसचीव भोर, | ७८७ | १०० | ५०० | ३८ | १ | १० |
| १२ | परिवेराव्हिला. | मि० केरावाला | | १५० | ८०० | | | |
| १३ | ईंगलसनेस्टे. | मूळराज खटाव. | ११८२५ | १५० | ६०० | ३७ | १० | |
| १४ | सिडनीहौस. | अहमद हबीबभाई. | ४८१३ | १५० | ७०० | ४५ | १५ | |
| १५ | हरूनव्हिला. | मि० हाजी इब्राहिम. | ४८२२ | २०० | ८०० | ४८ | ५ | ६ |
| १६ | वुडलॉन | एच. वकील. | १४८२४ | ३०० | १६०० | ४६ | ८ | ९ |
| १७ | न्युजन्टलाज. | शेख अहमद इमाम. | ४ | २०० | १००० | ४२ | १२ | ३ |
| १८ | क्रेग. | छत्रपति कोल्हापूर. | ३३८३३ | | | ३६० | १५ | ९ |
| १९ | हिलस्टोन. | धनजीशा जमशेटजी. | ५८२४ | १५० | ६०० | १९ | १२ | |
| २० | केन्हिलवर्थ. | मि. हिरजीभाई धनजीशा | ८८२० | २०० | १००० | १३ | ८ | ९ |
| २१ | एलफिन्स्टनहाल. | जयशंकर रामनाथ. | ५८६ | १०० | ६०० | ५१ | ८ | |
| २२ | व्हॅलेंटाइनलाज. | ,, | | १०० | ४०० | | | |
| २३ | विश्रामहाल. | गोपाळराव गायकवाड. | ५८३४ | १५० | ८०० | १७ | १३ | ३ |

| | बंगल्याचें नांव. | मालकाचें नांव. | क्षेत्रफळ. एकर गुंठे. | भाडयाचें प्रमाण. थंडऋतु १५अ ३१ जा. | भाडयाचें प्रमाण. उष्णऋतु १५ मा. १५ जून | लोकलफंडसहित आकार. ( अजमासें ) | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २४ | सीव्ह्यू. | खा. बहादूर रतन मंचरजी | २८३० | २०० | ८०० | ८ | १२ | ३ |
| २५ | बेलमान्ट हौस. | शेट त्रिभुवनदास. | ४८४ | | | २१ | १२ | ३ |
| २६ | आयर्नरूफ. | मि. लक्ष्मणसिंग. | ५८३३ | | | ६१ | १४ | ३ |
| २७ | लाडविकलाज. | मि. माणिकजी बोमनजी. | वे स्टजप्र ० | १०० | ५०० | | | |
| २८ | ग्वालियरलाज | हजीअदम सुलेमान. | ७८३१ | १५० | ७०० | २४ | | |
| २९ | न्यु.गव्ह.बंगलेनं. १ | सुपरिंटेंडेंट महाबळेश्वर. | | १५० | ६०० | | | |
| ३० | नं० २ | | युरोपियन लोकांस म्युनिसिपालिटी भाडयानें देते. | | | | | |
| ३१ | नं० ३ | | | | | | | |
| ३२ | नं० ४ | | | | | | | |
| ३३ | नं० ५ | | | | | | | |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३४ | वेव्हरली, अनबाई व्हिला. | मि. हिरजीभाई धनजीशहा. | २ | १५० | ८०० | ४२ | ८ | |
| ३५ | व्हॅलिव्ह्यू. | हजीअदम सुलेमान. | ६८२४ | १५० | ७०० | २१ | | |
| ३६ | इव्हॅनो. | बाळकृष्ण सायन्ना. | ५८३३ | ३०० | १००० | ६१ | १४ | |
| ३७ | ग्लेंगरी. | मि. जे मॉकडोनल. | १३८८ | २०० | ८०० | १४० | | |
| ३८ | क्लिफ्टन काटेज. | मि. मंचरजी रस्तमजी. | ४८१४ | १५० | ६०० | ४७ | | |
| ३९ | न्यू क्लिफटन लाज. | श्री. संस्थान मुधोळ. | ४८१२ | २५० | ७०० | १४ | | |
| ४० | बर्डसूनेस्ट. | मि. एदलजी दिनशा. | ६ | १५० | ६०० | ६३ | १२ | |
| ४१ | बारचेस्टर. | मि. जे. बी. मर्झबान. | ७८५ | १०० | १००० | ७५ | | |
| ४२ | बेलाव्ह्यू. | | ६८२४ | २०० | १००० | | | |
| ४३ | फाउन्टन हाटेल आणि बेलूव्हिडेरी. | मि. कुंवरजी कावसजी. | | २०० | ८०० | | | |
| ४४ | बोनीव्ह्यू. | डॉ. मूर. | ६८७ | १२० | ५०० | ६५ | १ | १ |
| ४५ | जुबिली काटेज. | मि. डॉ आरिआ. | ८८१ | १०० | ४०० | | | |
| ४६ | रोज काटेज. | मि. कर्सनदास, मुंबई. | ३८१० | | | ३४ | ८ | ६ |
| ४७ | मलबरी काटेज. | मि. रणछोडदास त्रिभुवनदास, मुंबई. | | ७५ | ३०० | | | |

| | बंगल्याचें नांव. | मालकाचें नांव. | क्षेत्रफळ. एकर गुंठे. | भाडयाचें प्रमाण- थंडऋतु १५ऑ. ३१ जा. | उष्णऋतु १५ मा. १५ जून | लोकलफंडसहित आकार. (अजमासें) | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ४८ | सनीसाईड. | मि. ना. वि. मंडलिक मुंबई. | | १०० | ५०० | २ | १४ | २ |
| ४९ | सनीकाटेज. | | | | | | | |
| ५० | सनीलाज. | | २२०।१२ | ५० | १७५ | | | |
| ५१ | अपनाकाटेज. | कुवरजी आरदेसर. | २८२५ | १०० | ४०० | २१ | ४ | |
| ५२ | स्प्रिंगफील्ड. | मि. भगवानदास, मुंबई. | ५८४ | | | १६ | ५ | |
| ५३ | वाडियाकाटेज. (जुनी शाळा.) | मि. रस्तमजी फ्रामजी वाडिया, मुंबई. | | | २५० | | | |
| ५४ | वाडियालाज. | मि. धनजीशा जमशेटजी. | | ७५ | ३०० | | | |
| ५५ | रिपन हाटेल. | मि. खरशेटजी दादाभाई. सातारा. | ५०२५ | हाटेल. | हाटेल. | २९ | १४ | |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ५६ | स्टोन हाऊस. | मि. नसरवानजी डोसाभाई, पुणें. | | २०० | ८०० | | | |
| ५७ | वेस्ट काज. | मि. माणिकजी बमनजी. | १८२७ | २०० | १००० | | | |
| ५८ | रिट्रीट. | मिस. वुड्लसन. | | १०० | २०० | | | |
| ५९ | पोस्ट आफिस. | सरकारी. | | | | | | |
| ६० | टेलिग्राफ आफिस. | सरकारी. | | | | | | |
| ६१ | सेंट क्लेअर व्हिला. | मिस. वुड्लसन. | | १५० | ७०० | | | |
| ६२ | क्लिफटन हौस. | मि. एच. ब्रामले. | | २०० | ८०० | | | |
| ६३ | डुलसी डोमम. | मि. एच. ब्रामले. | | १५० | ६०० | | | |
| ६४ | किली काटेज. | प्रो. ओ. ही मूलर. | १२८२३ | | | २३ | १५ | ६ |
| ६५ | सॅन्डहर्स्ट क्यासल | दादाभाई हारमसजी डुबास. | ७ | ५०० | २००० | ७० | | |
| ६६ | नेलसन काज. | मि. दामोदरदास तापीदास | ५८३ | १५० | ७०० | १६ | | |
| ६७ | झोमर्स काटेज. | ” | | ५० | १५० | | | |
| ६८ | बोहिमिया. | मि. एस्. डी. सासून. | २४८३८ | २०० | १००० | २६५ | १ | ६ |
| ६९ | माउंटडग्लस. | अमेरिकन मिशन. | १०१७ | | | ५० | | |
| ७० | व्हिक्टोरिया काटेज. | मि. बाळाजी पांडुरंग. | ५८३४ | | | १७ | १४ | |

| | बंगल्याचें नांव. | मालकाचें नांव. | क्षेत्रफळ. एकर गुठे. | भाड्याचें प्रमाण. थंडऋतु १५आ. ३१जा. | भाड्याचें प्रमाण. उष्णऋतु १५ मा १५ जून | लोकलफंडसहित आकार. ( अजमासें. ) | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ७१ | ग्लेन ओगल. | मि. इ. डी. सासून. | ७८३१ | २०० | १००० | ८२ | | |
| ७२ | दि विक्रोज. | मि. नसरवानजी सोराबजी. | | १५० | ७०० | | | |
| ७३ | रेडक्यासल. | श्री. जमाखिंडीकर. | १५८२१ | २०० | ८०० | ८२ | ८ | |
| ७४ | मुरारजी क्यासल. | मि. धरमसी मुरारजी. | १०१२ | | | ११ | १३ | |
| ७५ | निरा क्लाज. | मि. आरनीसिम. | ४८२७ | | | ५० | | |
| ७६ | माउंट माल्कम. | मि. बमनजी दिनशा पेटिट | ४२८१५ | | | ४५० | ३ | ९ |
| ७७ | फाउंटन हाल. | सर दिनशा पेटिट | | | | | | |
| ७८ | टॅंपल हाल. | मि. दादाभाई हारमसजी. | ५०११ | ४०० | १५०० | २८ | | |
| ७९ | प्रास्पेक्ट काटेज. | मि. मंचरजी दोराबजी. | २८५ | १५० | ७०० | २२ | ८ | |
| ८० | ग्रेस काटेज. | अमेरिकन मिशन. | | | | | | |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ८१ | युनिअन हाऊस. | धनबाई कुंवरजी. | | २०० | ८०० | | | |
| ८२ | मरे हाऊस. | अमेरिकन मिशन. | | | | | | |
| ८३ | पारसनेज. | दादाभाई हारमसजी डुबास. | २८३१ | ५०० | १५०० | १५ | | |
| ८४ | अबेरी. | मि. नरोत्तमदास मुरारजी | १०८३८ | २०० | ८०० | ३५ | | |
| ८५ | ख्रिस्तिचर्च. | | | | | | | |
| ८६ | व्हिक्टोरियालाज. | मि. धनजीशा जमशेटजी. | | १५० | ७०० | | | |
| ८७ | आक्टेगान. | मि. दादाभाई हारमसजी. | | १५० | ६०० | | | |
| ८८ | वुडसाईड | सुपरिंटेंडन्ट म्युनिसिपालिटी | | | | | | |
| ८९ | नानपरेल्व्ह्यू. | मि. मंचरजी दोराबजी. | | २०० | ८०० | | | |
| ९० | मिनिएचरव्हिला. | | ५८५ | १५० | ६०० | ५४ | ७ | |
| ९१ | शापूर हाल. | मि. शापुरजी एदलजी. | ३८३९ | २०० | १००० | ४२ | ३ | ९ |
| ९२ | माउंट युनिक. | मि. खरशेटजी दादाभाई. | | ३०० | १६०० | | | |
| ९३ | क्लिफ. | अमेरिकन मिशनरी. | ८८६ | | | ८६ | ९ | ६ |
| ९४ | ग्रीन हिल. | मिशनरी | | | | | | |
| ९५ | सेक्रेटरीएट आ० | सरकारी. | | | | | | |
| ९६ | नाईम. | आर. पी. वाइल्डर. | | १५० | ७०० | | | |
| ९७ | आयोना. | मिशनरी. | | | | ४२ | ८ | |

| | बंगल्याचें नांव. | मालकाचें नांव. | क्षेत्रफळ. एकर गुंठे. | भाड्याचें प्रमाण. थंडऋतु १५ऑ. ३१जा. | भाड्याचें प्रमाण. उष्णऋतु १५ मा. १५ जून | लोकलफंडसाहित आकार. ( अजमासें. ) | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ९८ | आबरलिन काटेज. | रेव्हरंडबिनसर. | | १५० | ७०० | | |
| ९९ | न्यू हौस. | एच. एच. आगाखान. | | | | | |
| १०० | फ्लॉरेन्स हाल. | हिज हायनेस आगाखान. | | | | | |
| १०१ | साऊथव्ह्यू. | मि. गोपाळराव लिंबाजी गायकवाड इंदूर. | | ३०० | १००० | | |
| १०२ | सिडोला पार्क. | श्री. मिरजकर | | | | | |
| १०३ | व्ह्यूव्हॉलिहाल. | मि० कमरुद्दिन तय्यबजी. | | ३०० | १५०० | | |
| १०४ | तयबजी लाज | नामदार तय्यबजी. | | १५० | ८०० | | |
| १०५ | पॅरडाईज लाज. | मि० आदरजी दोराबजी. | ७८२१ | १५० | ५०० | | १५ |
| १०६ | क्लीजन लाज. | बी. डी. डी. खंबाटा. | ११८२ | २०० | ८०० | ११५ | १३ |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १०७ | आलबर्ट व्हिला. | मि. हिरजीभाई धनजीशहा. | | १५० | ७०० | | | |
| १०८ | कीन काटेज. | मि. एफ्. आर. | | १५० | ७०० | | | |
| १०९ | काकेट काटेज व बीहाइव्ह. | मि० पी. माईट. | | १०० | २०० | | | |
| ११० | फोर ओक्स. | मि. दिनशा जमशेटजी. | ८८९ | ३०० | ८०० | ४३ | ११ | |
| १११ | मालकम काटेज. | मि. रणछोडलाल छोटालाल | ८८११ | १५० | ५०० | २७ | ५ | |
| ११२ | ओक्स. | | | २०० | ७०० | | | |
| ११३ | दि ग्रोव्ह. | जयशंकर रामनाथ निम्र बत इंदूर. | ४८९ | १५० | ६०० | | | |
| ११४ | दि बावर. | | | १०० | २५० | ४२ | ४ | |
| ११५ | हीथ व्ह्यु. | मि० गुलबाई कुवरजी. | ६८२२ | १०० | ८०० | ३४ | १२ | |
| ११६ | लॅघम हौस. | हि. हा. अगाखान. | ७८३४ | महाब० | हाटेल | ८३ | ६ | ६ |
| ११७ | लॉघम लाज. | | | | | | | |
| ११८ | होप काटेज. | मंचरजी दोराबजी. | | १५० | ६०० | | | |
| ११९ | इस्मायल हाऊस | मि० कासम साजन. | | १०० | ६०० | | | |
| १२० | स्टीव्हनसनलाज. | | | १०० | ४०० | | | |
| १२१ | मार्फि काटेज. | मि. इब्राहिमभाई हसनभाई | | ३०० | १००० | | | |
| १२२ | हेझलडेन. | मिस वुइलसन. | | १०० | ४०० | | | |

| | बंगल्याचें नांव. | मालकाचें नांव. | क्षेत्रफळ. एकर गुंठे. | भाड्याचें प्रमाण. थंड ऋतु १५ आ. ३१ जा. | उष्ण ऋतु १५ मा. १५ जून | लोकलफंडसहित आकार. (अजमासें) |
|---|---|---|---|---|---|---|
| १२३ | माइट कॉटेज. | | | | | |
| १२४ | रेव्हिला. | नूरमहंमद जयराम पीरभाई | | | | |
| १२५ | रेसव्ह्यू. | मि. हाजीकासम कद्दा. | | ३०० | १५०० | |
| १२६ | गेस्ट हाऊस. | मि. कासम साजन. | | १०० | ३०० | |
| १२७ | क्लबहाऊस. | मि. इब्राहिम रहिमतुल्ला. | | १०० | ४०० | |
| १२८ | हासम कॉटेज. | मि. कासम साजन. | | १०० | ४०० | |
| १२९ | रस्टमकाज. | मि० बाटलीवाला. | | ३०० | ८०० | |
| १३० | आनंदाश्रम. | श्री. आनंदराव खंडेराव | | | | |
| | | रास्ते. | | २०० | ५०० | |
| १३१ | साजन व्हिला. | मि. कासम साजन. | | २०० | ८०० | |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १३२ | कँडी व्हिला. | मि. फजिलभाई मिरभाई चिनाई. | | १०० | ४०० | | |
| १३३ | गॉलफव्ह्यू. | नारायणजी द्वारकादास. | | १५० | ६०० | | |
| १३४ | चारलट व्हिला. | कुवरजी आरदेसर. | ४८१६ | १५० | ७१० | ४६ | १२ |
| १३५ | महाबळेश्वरलाज. | मि. एच. बी. हस्कटेपी. | | १५० | ७०० | | |
| १३६ | हेक्टरलाज. | मि. कासम साजन. | | १०० | ४०० | | |
| १३७ | एस्कडेल काटेज. | जाफर सुलेमान. | ६८५ | १५० | ६०० | ६५ | १ |
| १३८ | वेण्णालाज. | मि पुरुषोत्तमदास. | | १०० | ७०० | | |
| १३९ | महाबळेश्वर ( मि शनहैास. ) | कासम साजन. | | | | | |
| १४० | एकार्न व्हिला. | मि. डोसाभाई नसरवानजी मुंबई. | ३८२५ | ३०० | १५०० | ३६ | ४ |
| १४१ | आस्केट हाल. | मि. विठ्ठलदास दामोदरदास | २८१९ | ३०० | १२०० | ७ | ७ |
| १४२ | लेकव्ह्यू. | गुलबाई कुंवरजी | २८७ | १५० | ५०० | ३१ | १ |
| १४३ | गुळजर ( माउंट हासम. ) | मि. नुरमहंमद जैराजभाई. | | १५० | ६०० | | |
| १४४ | पार्वती व्हिला. | मि. नारायणजी द्वारकादास | ५८२० | ३०० | ८०० | २८ | ५ |

| | बंगल्याचें नांव. | मालकाचें नांव. | क्षेत्रफळ. एकर गुंठे. | भाड्याचें प्रमाण. थंडऋतु १५आ. ३१ जा. | भाड्याचें प्रमाण. उष्णऋतु १५ मा. १५ जून | लोकलफंडसहित आकार. ( अजमासें ) |
|---|---|---|---|---|---|---|
| १४५ | माणिक व्हिला. | मि. नारायणजी द्वारकादास | | ३०० | ८०० | |
| १४६ | पी. डब्ल्यू. डी. बंगला. | सरकारी. | | | | |
| १४७ | रोजरी. | मि. दादाभाई डुबास. | | ३०० | ८०० | |
| १४८ | दुकान ट्रेचरकंपनी. | ट्रेचर कंपनी दुकान. | | | | |
| १४९ | सेन्ट जेम्स काटेज. | मि दादाभाई हारमोसजी. | | ३०० | १००० | |
| १५० | हास्पिटल. | सरकारी. | | | | |
| १५१ | क्लब फ्रियरहाल. | सरकारी. | | | | |
| *१५२ | स्पेन्सर व्हिला. | मि. नारायण आणि व्यंकू हरी शिंपी. | १६ ३४ | १५० | ८०० | १९ १२ |

* या सर्व बंगल्याच्या भाड्याची व दुसऱ्या तऱ्हेची माहिती पाहिजे असल्यास देऊन ते मिळवून देण्याची तजवीज कसोशीनें होईल. बंगला, घर, फर्निचर, इतर सामान व जमिनी भाड्यानें किंवा विकत घेण्यादेण्याचीही तजवीज ज्यांचे त्यांचे ऐपतीप्रमाणें माफक कमिशनानें करण्यांत येईल,

येथील बंगले, जमिनी, घरें किंवा दुकानें वेचून टाकण्याचीं असल्यास त्यांस गिऱ्हाइकें गाठून देण्याचें किंवा खरेदी घेणारांस यांपैकीं कोणत्याही सोईवार मिळकती दाखवून देण्याचें कामही कमिशन घेऊन काळजीपूर्वक करूं, परंतु याबद्दल लेखी सूचना मात्र मिळाली पाहिजे,

D. K. DIXIT.

# पाहण्यासारखीं प्रसिद्ध ठिकाणें.

महाबळेश्वरापासून दहापांच मैलांत पाहण्यासारखीं जीं ठिकाणें आहेत तीं पाहण्याचीं तखलीफ घेतली असतां धर्मश्रद्धा, सृष्टिसौंदर्यविलोकनाकांक्षा, व ऐतिहासिकस्थानदर्शनेच्छा तृप्त झाल्यावांचून रहाणार नाहीं. पृथ्वीवरील अशा भव्य वस्तु पाहून मनुष्याच्या चित्तास इतका आनंद व इतकें समाधान कां होतें, अशी एका कवीस शंका येऊन त्यानें पुष्कळ विचार केल्यावर त्या शंकेचें असें समाधान केलें कीं, भव्य वस्तूंच्या निरीक्षणापासून विश्वास उत्पन्न करणारी मनुष्याच्या चित्तांत असलेली अगम्य शक्ति तिचा प्रेक्षकांच्या मनास क्षणभर बोध झाल्यासारखा होऊन तें एक प्रकारच्या अनिर्वचनीय आनंदसुखांत गढून जातें. तेव्हां ज्यास अनुकूल असेल, व ज्याला अशा वस्तूंच्या प्रेक्षणापासून होणाऱ्या आनंदाचा अनुभव घेण्याची योग्यता आली असेल

त्यानें केव्हांतरी त्या पाहण्यास चुकूं नये, असें आमचें सांगणें आहे. महाबळेश्वराच्या आसपास असलेल्या या प्रेक्षणीय स्थळांचीं नांवें अशीं आहेत:— प्रतापगड, मकरंदगड किंवा सॅडल्ब्याक्, पारूत, चंद्रगड, कमलगड, चोराची घळ,राजपुरी, पांडवगड, दुतोंडी घळ, गायदरा किंवा गुलेरा घळ. ”

## प्रतापगड.

प्रतापगड हें गांव महाबळेश्वराप्रमाणेंच घाटमाथ्यावर आहे. हें महाबळेश्वरच्या पश्चिमेस सुमारें १० मैलांवर आहे. प्रतापगड किल्ला समुद्राचे पृष्ठभागापासून ३५४३ फूट उंच आहे.

प्रतापगड किल्ल्याचें वर्णन.

जावली प्रांत व निरा आणि कोयना यांचे कांठचा प्रदेश हस्तगत केल्यावर, तेथें जाणें येणें सुलभ व्हावें ह्मणून आणि पारघाटाचें नाकें आपल्या माऱ्यांत रहावें या हेतूनें या पारघाटानजीकचे टेंकडीवर हा नवीन किल्ला शिवाजीमहाराजांनीं बांधिला. हें काम साताऱ्याच्या पिंगळे घराण्यांतील मोरो-

पंत पिंगळे पेशवे अथवा मुख्यप्रधान यांचे देखरेखी खालीं सन १६५६ सालीं पुरें झालें. याला चोहोंबाजूंस तट आहेत ते दुहेरी आहेत. त्यांपैकीं बहुतेक ठिकाणीं किल्ल्याच्या कडेला स्वाभाविक काताळ खडक अगदीं तटासारखा उभा आहे, व ज्या ठिकाणीं असा खडक नाहीं त्या ठिकाणीं जंग्या राखलेले बुरूज जागजागीं असलेला तट काळे दगडांनीं बांधून काढलेला आहे. परंतु हल्लीं तटाचें काम बहुतेक ठिकाणीं नादुरस्त होत चाललेलें पाहून मनांत येतें कीं ज्या विख्यात छत्रपति शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीपासून बरेच दिवस महान् महान् पराक्रम करून ज्यानें स्वदेशसेवा उत्तम प्रकारें बजाविली आणि आपल्या नांवाचा डंका वाजवून सोडला, तो हा प्रचंड परंतु आतां अगदीं दीन दिसणारा किल्ला आपल्या उतारवयामध्यें त्या शिवाजीमहाराजांच्या वेळचे आपले भरभराटीचे दिवस, व आपल्याला बक्षिस ह्मणून दिलेली " प्रतापगड " नांवाची पदवी व प्राकारादि अलंकारभूषणें मिळण्याचे निरनिराळे प्रसंग, आठवून

व तो वीरश्रेष्ठ, त्याचें युद्धकौशल्य आणि प्रजावात्सल्य स्वप्नवत् झालेलें पाहून जणूं काय शोकावस्थेनें दिवसें-दिवस खचतच चालला आहेसा वाटतो.

मालकमपेठेच्या बाजूनें त्यावर जाण्यास रस्ता फार राजमान्य आहे. तो मुंबईपाइंटाचे खालून फिट-झरल्डघाटानें अगदीं वाड्यापर्यंत जाणारा उत्तम गाडीरस्ता आहे. या रस्त्यानें गेलें ह्मणजे एका तासांत वाडागांव येतें, तेथें गेल्या-वर आराम पाहिजे असल्यास रहदारी बंग-ल्यांत किंवा दुसरीकडे गांवांत जावें. आणि थोडा विसावा खाऊन मग गडावर चढण्यास कंबर बांधावी. पायानें जाण्याचें अवसान असल्यास एका पाऊण तासांत वर दरवाज्यापाशीं माणूस जाऊन थडकतें; परंतु तसें जाण्याला ज्याला नेट नसेल त्याला खुर्चींत बसून जाण्याची सोय होते. फक्त तेथील मावळ्यांच्या पोटाला दोन अडीच रुपये देण्याचा उदारपणा केला ह्मणजे झालें. शिवाजीच्या हाताखालीं ज्या अडाणी लोकांनीं तोंडांत बोटें घालण्यासारखे जि-वावरचे धाडसाचे पराक्रम करून मुसलमानांची

खोड मोडली, व इतिहासांत आपलें नांव चिरायु करून सोडिलें, त्या मावळ्यांस पोटाची वीतभर खळी भरण्यासाठीं मडमांस, पारशिर्णीस, साहेबांस आणि रावसाहेबांस खुर्च्यांत घालून खांद्यावर वहावें लागत आहे, यावरून दैवाची गति मोठी विचित्र आहे. या प्रामाणिक, कृश, व गरीब लोकांकडे पाहिल्याबरोबर पोटांत असा विचार उभा राहतो. डोंगरांतील वाटेला दुतर्फा झाडांची झालर आहे त्यामुळें भोंवतालचा वारा लागून रस्ता तुडवीत जाणारांस फारसा शीण होत नाहीं. वर गेलेवर तटाबाहेर एका लहानशा टेंकडीवर थडग्यासारखी एक इमारत आहे. तींत विजापूरचे बादशाहाचा आफजुलखान सरदार शिवाजीमहाराजांबरोबर लढण्यास आला असतां, त्यास मारून त्याचें डोकें पुरलें आहे असें सर्व लोक सांगतात. पुढें आंत जाऊन गडाचे तटावर उभें राहिलें असतां एकीकडे महाबळेश्वरच्या डोंगराची आणि दुसरीकडे कोंकण घांटमाथ्यापर्यंत पसरलेल्या विस्तृत मावळप्रांताची विलक्षण शोभा दिसते. खुद्द किल्ल्याचें टिकाऊ

व मजबूत बांधकाम पाहून जुन्या लोकांनीं हीं एव-
ढालीं अवाढव्य कृत्यें यंत्राच्या साह्यावांचून शरीरक-
ष्टानें कशीं केलीं असावीं, याचा चमत्कार वाटतो.
आणि ज्यांच्या पूर्वजांनीं टोलेजंग किल्ले बांधिले
त्यांच्या वंशजांत मर्दुमकी अशी मुळींच राहिली
नाहीं हें पाहून पराकाष्ठेचा विस्मय होतो. डावे
बाजूचे रस्त्यानें आंत गेलें म्हणजे पूर्वेच्या सखल
बाजूस भवानीचें देऊळ दृष्टीस पडतें. या देवाल-
याचें काम काळ्या दगडाचें आहे. सभामंडप मात्र
लांकडी आहे. तो ५० फूट लांब, ३० फूट रुंद व
१२ फूट उंच आहे. सभामंडपाच्या पिंजरीस वरून
तांब्याचा पत्रा सातारचे प्रतापसिंह महाराजांनीं
मारलेला आहे. गाभाऱ्यांत काळे पाषाणाची भवा-
नीची शाळुंकामूर्ति स्थापन केलेली आहे. ती सुमारें
१॥ फूट उंच आहे. तिच्या अंगावरील वस्त्रालंकार
अगदीं पाहण्यासारखे असून मौल्यवान आहेत. सूर्यो-
दय झाल्यानंतर आरशानें हिचे तोंडावर किरण पाडून
तें पाहिलें असतां मूर्ति स्पष्ट दिसून तोंडावरील चक्र

व आंगावरील अलंकार पाहून विलक्षण मौज वाटते. हें पाहण्यास येथें आरसा मुद्दाम ठेविला आहे.

प्रतापगडच्या लढाईनंतर राजकार्यामुळें आपली कुलस्वामिनी जी तुळजापुरची भवानी, इचे दर्शनास जाण्यास शिवाजीमहाराजांस सवड मिळेना म्हणून देवीचें स्थान संनिध असल्यानें नेहमीं दर्शन होत जाईल, या हेतूनें सन १६६१ मध्यें त्यांनीं ह्या देवालयाची स्थापना केली. शिवाय आफजुलखान हा शिवाजीचा सूड उगवण्यासाठीं संधि पहात होता. हें शिवाजी महाराजांच्या मातोश्री जिजाबाई यांना समजलें होतें; ह्मणून महाराज भेटीस जाणार असें कळलें, त्या वेळीं त्यांची मातोश्री जिजाबाई इणें तुळाजापुरच्या देवीस नवस केला कीं, माझा शिवाजी यशस्वी झाला म्हणजे मी लोटांगण घालीत तुझ्या दर्शनास येईन. त्याप्रमाणें यश मिळाल्यावर प्रतापगडास देवीची स्थापना करून तिनें तो नवसही फेडला. याशिवाय येथें केदारेश्वर नांवाचें शंकराचें देवालय पुरातनचें आहे.

पुढें आपले ताब्यांत असलेले मुलखांपैकीं जवळ पासची १ हरोसी, २ कुमठे, ३ बिरमणी ४ हात-लोट, ५ माचूतर, ६ बिरवाडी, ७ करंबे, ८ गौंडी, ९ केळघर, १० कुचुंबी, ११ डांगरेघर, १२ कऱ्हार, १३ कावडी व १४ जावली या गांवचे ५००० रुपयांचें उत्पन्न करून दिलें. हें उत्पन्न हल्लीं चौथाई वगैरे जाऊन ४००० रुपयाचें देवीकडे दयाळु इंग्रजसरकारांनीं चालविलें आहे. याची व्यवस्था पंचामार्फत चालू आहे. त्यांतून देवीचा नंदादीप, नवरात्र उत्सव, रोजचा अन्नसत्र व नोकरांचा पगार वगैरेंचा खर्च होतो. देवीचे देवळापुढें एक लहानसा तलाव आहे, त्यांत पाणी चांगलें असून विपुल असतें. याशिवाय दुसरा तलाव आहे. पुजारी, पुराणिक, चौघडा वाजविणारे गुरव इत्यादिक गडावर राहून नित्य सेवाचाकरी करीत असतात. व यांच्याच वस्तीचीं सुमारें ८।१० घरें वरच आहेत. याशिवाय येथें वस्ती नाहीं, याचे पश्चिम आणि उत्तर बाजूला अस्मान कडे तुटलेले आहेत. त्यांची खोली ७००।८०० फूट आहे. अशा ठिकाणीं उभें राहून

सूर्यास्ताचे वेळीं कोंकणपट्टीकडे नजर फेंकिली असतां, समुद्राचा किनारा फार रमणीय दिसतो. प्रतापगडावर शिवाजीमहाराजांच्या वेळेपासून मराठ्यांची बखर आहे. किल्याचें पठार अर्ध मैल लांब आहे.

प्रतापगडची लढाइ. अफजुलखानाबरोबर जो इतिहासप्रसिद्ध प्रसंग झाला त्याची थोडी हकीकत येणेंप्रमाणें आहे:—

शिवाजी महाराजांचें प्राबल्य फारच वाढत चाललें असें पाहून विजापुरचे बादशहा यांनीं त्याचें शासन करण्याचा निश्चय केला व या कामीं आफजुलखान नामें एका नामांकित सरदाराची योजना केली, आणि त्यास बऱ्याच सैन्यासह शिवाजी महाराजांस जेर करण्यास पाठविलें. यावेळीं शिवाजी महाराज प्रतापगडींच होते. पुढें आफजुलखान वांईस आला हें वर्तमान महाराजांस कळतांच त्यांनीं त्याजकडे वकील पाठवून गरिबीचें बोलणें लाविलें. त्यांत कांहीं बेआदबीचे शब्द वापरल्यामुळें खानाच्या अंतर्यामीं राग येऊन शिवाजीचा घात करण्याचा

आपला हेतू सफल होण्याची संधि तो पहातच होता. अफजुलखान गर्विष्ट असल्यामुळें फार चढून गेला आणि त्यास अंतर्यामीं फार आनंदही झाला कीं, आपण आलों असें ऐकतांच शिवाजी इतका वंगला. त्या गुर्भीतच शिवाजी महाराजांनीं किल्ल्यावर यावें म्हणून बोलावणें केलें, तेंही त्यानें मान्य केलें. प्रतापगडावर शिवाजीचे भेटीस जाण्यास निघते वेळीं त्यानें बरोबर १५०० फौज घेतली होती व एक सय्यद हत्यारबंद शिपाई घेतला होता. काय प्रसंग येईल याचा नेम नाहीं अशी शिवाजी महाराजांच्याही मनांत मोठी धास्ती वाटून त्यांनीं स्वरक्षणासाठीं भेटीच्या ठिकाणाजवळ गुप्तपणें थोडें सैन्य ठेविलें आणि स्वतः स्नान करून नित्य नियम उरकून आपली मातुःश्री जिजाबाई इच्या पायावर मस्तक ठेवून आशीर्वाद घेतला; अंगांत चिलखत चढवून व त्यावर आंगरखा घालून, उजव्या अस्तनींत एक बिचवा गुप्त ठेविला, व डाव्या हातांत वाघनखें घालून स्वारी खानाच्या भेटीस निघाली. खाशाबरोबर फक्त त्याचा बाळमित्र सरदार तानाजी मालुसरे हा होता. ( मालुसरे गांव

येथून ४ मैल आहे) भेटीची वेळ येतांच पहिल्यानें **आफजुलखानानें** एका हातानें **शिवाजीस** गच्च धरून वार केल्यावर **शिवाजीनें** खानाच्या पोटांत वाघनखें खुपसलीं आणि त्याचीं आंतडीं बाहेर काढलीं, त्यासरसा खानाला त्वेष येऊन त्यानें **शिवाजीचें** डोक्यावर वार केला, तेव्हां **शिवाजीनें** बिचवा काढून त्याचा प्राण घेतला. खानाच्याबरोबर असलेल्या हत्यारबंद शिपायाला **तानाजी मालुसऱ्यानें** ठार केलें. यांत **शिवाजी महाराजांनीं** दगलबाजपणा केला नाहीं. अशी माहिती जुने पवाड्यावरून मिळते तो असाः—

॥ **अबदुल्यानें** कव घातली ॥
॥ **शिवाजी** गवसून धरला सारा ॥
॥ चालवी कटारीचा मारा ॥
॥ शिल्यावरी न चले जरा ॥
॥ राजानें बिचवा लावून दिला ॥
॥ वाघपंज्याचा केला मारा ॥
॥ त्याचे फोडिलें उदरा ॥

स्काट वारिंगचे इतिहासांतही अशीच हकीकत आहे. असें झाल्यावर त्याचें डोकें कापून किल्ल्यावर पुरून त्यावर कबर बांधिली आणि धड किल्याखालीं पुरलें. त्यावरही अद्यापि कबर आहे. नंतर त्यांच्या सैन्याची कत्तल करून सर्व सामुग्री लुटून आणिली. इ० स० १६५९ सालीं महाराजांनीं अशी तरवार बाहदरी केल्यावर त्यांची फार कीर्ति झाली यावेळीं शिवाजीचें वय सुमारें ३२ वर्षांचें होतें. या ऐतिहासिक प्रसंगामुळेंच प्रतापगड हें स्थळ इतिहासांत फार प्रसिद्धीस आलें. या प्रसंगापासूनच मोंगलांवर मराठ्यांचे वर्चस्वाची सुरुवात झाली. पुढें पेशवाईंत सन १७७८ मध्यें याच गडावर नानाफडनवीस यांनीं सखारामबापु बोकील यांस कैदेंत ठेविलें होतें. असो. हा किल्ला शिवाजीमहाराजांस यशस्वी झाला व त्यांच्या दौलतीचा मूळखांब बनला. त्यामुळें त्याबद्दलचा मोठा अभिमान सर्व मराठ्यांस वाटणें साहजिक आहे. परंतु आतां जरी वैभवालंकार जाऊन नुसतें कलेवर राहिलें आहे तथापि प्राणोत्क्रमण झालें असतांही ज्याप्रमाणें

स्नेहाळु जननीस अपत्यकलेवर सोडवत नाहीं त्याप्रमाणें सहृदय महाराष्ट्रीयांस याचे जवळ आल्यावर एकवार तरी प्रेमपूर्वक त्याचें दर्शन घेतल्यावांचून रहावत नाहीं, हें अगदीं उचित आहे.

यावेळीं शिवाजीचा उत्कर्ष कसकसा होत गेला व त्याची स्वधर्मावर असलेली निःसीम श्रद्धा कशी त्यास फळास आली याबद्दलची हकीकत फार रसाळ आणि श्रवणीय असल्यामुळें थोडक्यांत येथें देतों:—

शिवाजीचा इतिहास.

जावली प्रांतांत शिरके मराठे यांस विजापूर बादशहाचे तर्फेनें राज्यव्यवस्था पाहण्याकरितां नेमलें होतें. परंतु हे त्यांस बिलकुल जुमानीत नसत. कारण सह्याद्रीचे पहाडामध्यें बादशाहाचे फौजेचा बिलकुल इलाज चालत नसे. आणि ह्मणूनच प्रतापगडच्या लढाईंतसुद्धां आफजुलखान वांईस तळ देऊन बसला होता. पुढें कालगतीचे योगानें शिरक्याचा लय होऊन, त्यांचा मुलूख चंद्रराव मोरे यास इनाम मिळाला. त्यांचें राज्य सन १६५५ पर्यंत

अव्याहत चाललें होतें. पुढें याजपासून शिवाजी महाराजांनीं घांटमाथा काबीज केला. यावेळीं महाराज हमेशा महाडास राहत असत व सह्याद्रिमार्गानें त्यांचें घाटांवर येणेंजाणें असे. पुढें महाराजांनीं वासोटा किल्ला सर केला, तेणेंकरून संपूर्ण जावली सस्थान त्यांचे स्वाधीन झालें; तेव्हां सन १६५६ मध्यें महाराजांनीं विजापुरवाल्याचा सरदार मोरे याचा वाडा पाडून त्याचीं लांकडें व दगड प्रतापगडचे कामास आणून गडाचें काम केलें, आणि हें जावली प्रांताचें सदर ठिकाण करून टाकिलें. याचे पूर्वीं इ० स० १६४७ मध्यें राजगड किल्ला महाजांनीं तोरण्याजवळ मोरबद या नांवचे टेकडीवर बांधिला. बाणकोट किंवा मंडणगड–रगतगड व रोहिला हेही पूर्वींच बांधिले होते. हे किल्ले कोंकणांत आहेत.

विजापूरच्या बादशाहानीं शिवाजीस पुष्कळ वेळां धमकी देऊन पाहिली व लालुचही दाखविली. परंतु सर्व प्रयत्न पाण्यांत गेले असें पाहून आफजुलखानास सैन्यासह महाराजांवर

पाठविलें. तो पूर्वी वांईस सुभेदारीचे कामावर असल्यामुळें वांईस येऊन राहिला. हें शिवाजीस कळतांच तो प्रतापगडावर येऊन दाखल झाला आणि सन १६५९ सालीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्रतापगडच्या लढाईंत त्याचा त्यानें पराजय केला. नंतर त्यावर्षी (१६५९ त) पावनगड व पन्हाळा हे विजापूरबादशहाचे किल्ले घेतले. हे किल्ले जवळ जवळ आहेत. ह्याच सालीं घोसाळ्याजवळचा बिरवाडीचा किल्ला प्रतापगडच्या लढाईनंतर बांधिला. सन १६६० मध्यें विजापूरच्या बादशाहांनीं पुन्हां शिद्दीजोहार यास महाराजांवर पाठविलें, तेव्हां महाराज पन्हाळ्यावर होते. शिद्दी जोहारानें तेथें पुष्कळ दिवस तळ देऊन वेढा दिला होता. शेवटीं महाराज रांगण्यावर गेले व शिद्दीजोहार याचे हातीं पन्हाळा लागूं दिला नाहीं. पन्हाळा व पावनगड हे मजबूतीविषयीं फार प्रसिद्ध होते, असें महाराजांचे पवाड्यावरून समजतें. असा महाराजांचा राज्यविस्तार वाढत चालल्यामुळें तुळजापूरचे कुलस्वामिनी देवीस जाण्यास फुरसत होईना म्हणून त्यांनीं

प्रतापगडावरच त्या देवीचें नांवानें एक देवी करून बसविली. असें करण्यास त्यांस तुळजापुरचे देवीचा दृष्टांत झाला होता.

महाराज रायगडीं असतां त्यांनीं कीर्तनांत गोसाव्याचे तोंडून सद्गुरूवांचून मोक्ष नाहीं असें ऐकिल्यावर त्यांना मोठा विचार पडला. तेव्हां ते आपली कुलस्वामिनी जी भवानी इची प्रार्थना करण्याकरितां प्रतापगडीं आले, आणि गुरु कोणास करावें याविविषयीं आज्ञा व्हावी ह्मणून त्यांनीं देवीची आराधना केली, तेव्हां देवीनें सांगितलें कीं, “ रामदासस्वामी यांसच शरण जावें, कारण ते तुम्हांकरितांच उत्पन्न झाले आहेत. ” हा दृष्टांत झाल्यावर महाराज स्वामींच्या दर्शनाकरितां चाफळास आले. स्वामी तेथें नव्हते ह्मणून स्वामींचा शोध करीत महाराज बरेंच फिरले, परंतु शोध न लागल्यामुळें प्रतापगडीं राज्यकारणामुळें निघून आले. आणि पुनः देवीची प्रार्थना केली कीं प्रयत्न केला असतांही दर्शन होत नाहीं याचें कारण काय? त्याच दिवशीं रात्रीं स्वप्नामध्यें--पायीं पादुका, कटीं

कौपीन, हातीं माळ, कांखेस कुबडी, मस्तकीं जटा-भार याप्रमाणें रामदास स्वामींची मूर्ति महाराजांपुढें उभी राहिली, व नारळ प्रसाद दिला, आणि आपण कोण ह्मणून महाराजांनीं विचारल्यावर स्वामींनीं सांगितलें कीं " आम्ही गंगातिरीं राहणार परंतु सांप्रत तुमच्याकरितां कृष्णातिरीं आलों आहोंत, व तुम्हाला एवढेंच सांगणें आहे कीं, तुम्ही जें राज्य-साधन आरंभिलें आहे तेंच चालवावें, आणि धर्माचा उच्छेद झाला आहे त्याची स्थापना करून देव-ब्राह्मणांचे ठायीं सादर असावें. " इतकें म्हणून स्वामी अदृश्य झाले व महाराज जागृत झाले. पुढें मातोश्रीची आज्ञा घेऊन महाराज निघाले ते महाबळेश्वर, वांई व माहुलीपावेतों गेले तों त्यांस स्वामींकडून पत्र आलें. त्यावरून स्वप्नाचें मजकुरास जास्त पुष्टी-करण मिळालें. तें पत्र असें:—

निश्चयाचा महा मेरू । बहुत जनासी आधारू ।
अखंड स्थितीचा निर्धारू । श्रीमंत योगी ॥ १ ॥
परोपकाराचिया राशी । उदंड घडती जयाशीं ।
ज्याचे गुण महत्वाशी । तुलणा कैची ॥ २ ॥

नरपती हयपती । गजपती गडपती ।
पुरंधर आणि शक्ति । पृष्ठभागीं !! ३ ॥
यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत वरदवंत ।
पुण्यवंत आणि जयवंत । जाणता राजा ॥ ४ ॥
आचारशील विचारशील । दानशील धर्मशील ।
सर्वज्ञपणें सुशील । सर्वांठायीं ॥ ५ ॥
धीर उदार सुंदर । शूर क्रियेशीं तत्पर ।
सावधपणेशीं नृपवर । तुच्छ केले ॥ ६ ॥
तीर्थ क्षेत्रें तीं मोडिलीं । ब्राह्मण स्थानें विघडलीं ।
सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥ ७ ॥
देवधर्म गोब्राम्हण । करावयासी रक्षण ।
हृदयस्थ जाहला नारायण । प्रेरणा केली ॥ ८ ॥
उदंड पंडित पुराणिक । कवीश्वर याज्ञिक वैदिक ।
धूर्त तार्किक सभानायक । तुमचे ठाईं ॥ ९ ॥
या भूमंडळांचे ठायीं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ।
महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं । तुह्माकरितां ॥ १० ॥
आणखी कांहीं धर्म चालती । श्रीमंत होऊनि कित्येक असती ।
धन्य धन्य तुमची कीर्ति । विश्वीं विस्तारिली ॥११॥

कित्येक दुष्ट संहारिला । कित्येकांस धाक सुटला ।
कित्येकांस आश्रय झाला । शिवकल्याण राजा॥१२॥
तुमचे देशीं वास्तव्य केलें। परंतु वर्तमान नाहीं घेतलें।
ऋणानुबंधें विस्मरण झालें । बा काय नेणूं॥ १३ ॥
सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ती । सांगणें काय तुह्मांप्रती ।
धर्मस्थापनेची कीर्ति । संभाळिली पाहिजे ॥ १४ ॥
उदंड राजकारण तटलें । तेथें चित्त विभागलें ।
प्रसंग नसतां लिहिलें । क्षमा केली पाहिजे ॥ १५ ॥

हें वाचून शिवाजीनें उत्तर लिहिलें कीं आशिर्वादपत्र पाहून परमानंदातें पावलों. दर्शनाची इच्छा धरून येत आहें. शेवटीं हें पत्र व आपण स्वतः स्वामिस एकाचवेळीं प्राप्त झाल्यावर स्वामींनीं त्यांस एक नारळ प्रसाद दिला आणि मूठभर खडे, मूठभर माती व मूठभर लीद दिली. त्याचा अर्थ–नारळ स्वकल्याणार्थ; माती दिली त्याचा अर्थ पृथ्वी प्राप्त होईल; खडे दिले त्यावरून किल्ले ताब्यांत राहतील; लीद दिली याचा अर्थ पागा ताब्यांत राहील. तसेंच सन १६५९ पूर्वीं तुकारामबोवांनीं शिवाजीस पत्र

लिहिलें होतें त्यांत " छत्रपाति " हें विशेषण स्पष्ट-पणें दिलेलें आहे, तें असें:--

शिवनाम तुझें । ठेविलें पवित्र । छत्रपति सूत्र ।
विश्वाचें कीं ॥ १ ॥

यावरून छत्रपति हें नांव प्रतापगडच्या लढाईचे वेळीं व त्यापूर्वीं सर्व लोकांत प्रसिद्ध होतें. पुढें महाराजांनीं गुरूपदेशाप्रमाणें हिंदुधर्माचें व गोब्राम्हणाचें रक्षण केलें. हल्लीं याच महाराजांच्या घराण्याची शाखा कोल्हापुरास आहे व तेथील गादीला पूर्वी ईश्वरी प्रसादानें मिळालेली " छत्रपति " ही पदवी अद्यापि चालत आहे. शिवाजी महाराजांच्याच उपदेशाची स्मृति चोहोंकडे राहून त्यांच्या राज्याच्या सर्व शाखा अशाच चिरकाल आणि निर्विघ्नपणें चालोत, अशी परमेश्वरास आमची प्रार्थना आहे. असे रामदासस्वामींसारखे अवतारी पुरूष धर्माची निकृष्टावस्था होत चालली म्हणजे परमेश्वरी अंशरूपानें जगांत निर्माण होतात, हें गीतेंतील कृष्णाच्या वाक्यावरून सिद्ध होतें:--

परित्राणाय साधूनां । विनाशायच दु-
ष्कृतां ॥ धर्मसंस्थापनार्थाय ॥ संभवामि
युगे युगे ॥ १ ॥

## मकरंदगड.

मकरंदगड यास येथील लोक घोणसपूर असें म्हणतात. हाही प्रतापगडाप्रमाणेंच डोंगरी किल्ला आहे. परंतु यावर प्रतापगडाप्रमाणें एकादें युद्ध झालें असतें तर त्यांचें नांव इतिहासांत प्रतापगडाप्रमाणें अमर होऊन राहिलें असतें. तथापि याचा उपयोग जरी प्रत्यक्ष रीतीनें स्वदेशसेवा करण्यास झाला नसला, तरी हा आड बाजूला असल्यामुळें शत्रूचा घाला आला असतां छपून बचाव करण्यास किंवा वासोटा वगैरे किल्यावर जाण्यायेण्यास ह्यानें अनेक वेळां चांगली मदत दिली. सन १६५६ मध्यें जेव्हां प्रतापगड बांधिला त्याच वेळीं शिवाजी महाराजांनीं याचीही दुरुस्ती करून घेतली. याची उंची ४०५४ फूट आहे. याचें पठार उंच सखल आहे.

हा किल्ला मालकमपेठेपासून दक्षिण दिशेस ७ मैल अंतरावर आहे, याला त्याच्या बाह्यस्वरूपाव-

रून " सॅडल बॅक " असें नांव प्राप्त झालें आहे. याला उंटावर घालण्याच्या खोगिराचा आकार आला आहे. तो फार चमत्कारिक दिसतो. याच खुणेवरून अपरिचित मनुष्याला या शैलसमुदायामध्यें त्याची ओळख करून देतां येतें. **सासून** व **बार्लिंगटन** पाइंटापासून हा उत्तम दिसतो. याच्या अगदीं शिखारावर जाण्यास १० किंवा १२ मैल चालून जावें लागतें. या किल्ल्यावर जाण्यास **बार्लिंगटन** पाइंटाच्या पलीकडून एक पाऊलवाट आहे ती **मांघर**, **चतुरबेट** गांवांवरून इकडे **घोणसपूर** गांवावर गेली आहे, व ही फारशी त्रासदायकही नाहीं. या डोंगराला जीं दोन पूर्वपाश्चिम शिखरें आहेत, त्यांपैकीं पूर्वेकडील बाजूचे शिखराची वाट सोपी आहे व त्या शिखरावर जाण्याची तसदी घेतली, तर कांहीं सृष्टिचमत्कार पाहून सार्थक होण्यासारखें आहे. परंतु वाट अरूंद असून दोन्ही बाजूला कडे तुटलेले असल्यामुळें वर जाईपर्यंत जिवांत जीव असत नाहीं. पश्चिम बाजूच्या शिखराची वाट फारच खडतर असून वर कांहीं रमणीय देखावाही

नाहीं. पूर्वबाजूच्या शिखराचे पायथ्याशीं घोणसपूर ह्मणून गांव आहे. तेथून वर गेलें ह्मणजे तेथील देखावा पाहून मनास मोठा विस्मय वाटतो. त्याच-प्रमाणें चोहों बाजूला तट पडित झालेला पाहून आर्यमातेच्या मुलांनीं आपल्या कर्तबगारीच्या दिवसांत अशा दुर्घट स्थळीं हा तट कसा बांधला असेल, याचें सानंद आश्चर्य वाटतें व आतां असा त्याचा त्राता कोणी राहिला नसल्यामुळें तो उध्वस्त झालेला पाहून मागल्या अमदानीची आठवण होऊन मन उद्विग्न होतें. तेथील मल्लिकार्जुनाचें देऊळाची व्यवस्था आतां कोणी मुळींच पहात नाहीं यामुळें आकाशां-तील सृष्टिक्रमाप्रमाणें तें पंचतत्वाला मिळत असलेलें पाहून पूज्यबुद्धि वाटून मनाची व्यग्रता होतें. याच किल्ल्यावर पेशव्यांचे कारकिर्दींत पूर्वी ज्या ताई तेलि-णीनें पुष्कळ दिवस टिकाव धरून बापू गोखल्या-सारख्या शूर सरदारास दाद लागूं दिली नाहीं तिनें खोदून काढलेले एक पाण्याचें तळघर फार आराम-दायक आहे. त्यामध्यें खोदलेली जागा सुमारें आठ खणी दुजोडी सोप्याइतकी पैस असून मधून मधून

खांब खोदलेले दिसतात. यांत नेहमीं जिवंत पाणी भिंगासारखें स्वच्छ भरलेलें असतें. वर जाऊन हें पाणी प्यालें ह्मणजे पूर्ण श्रमपरिहार झाल्यासारखें वाटतें. ज्यांनीं पुण्याचे गाडीरस्त्यावरील खंडाळ्याच्या घाटांतला खांनटकीचा तलाव पाहिला असेल, त्यांस या तळघराची प्रतिमा जलद डोळ्यापुढें येईल. हा डोंगरमाथा प्रतापगडापेक्षांही जास्त उंच असल्यामुळें चोहोंकडे फार अफाट प्रदेश दिसतो, आणि आकाश निरभ्र असल्यास बऱ्याच लांबीचा कोंकण-प्रदेश व समुद्रावरून बदकाप्रमाणें चाललेल्या आग-बोटी पाहून मजा वाटते. असा सर्वत्र भव्य देखावा पाहून आपल्या सूक्ष्मपणाविषयीं विचार मनांत येऊन आपलें मन अगदीं खट्टू होऊन जातें.

## कमलगड.

कमलगड हाही बांधिव किल्लाच आहे. या किल्यावर चोहोंबाजूला तटासारखा खडक आहे. तेथें विजापुरच्या बादशहाचे पदरचे चंद्रराव मोरे ह्मणून कोणी जावलीचे राजे जाऊन येऊन असत. या मोऱ्यांच्या सात पिढ्या पावेतों त्यांचें राज्य चाललें होतें,

तें सन १६५५ सालीं शिवाजी महाराजांनीं घाटमाथा काबीज केला त्यावेळीं घेतलें तेव्हां हा किल्ला महाराजांकडे आला. ह्या डोंगरांची उंची ४५११ फूट आहे. ही टेंकडी केटपाईंटाच्या उत्तरेस आहे. या टेकडीवर जावयाचें असल्यास केटपाईंटपर्यंत टांग्यानें किंवा घोड्यावरून जावें. तेथून पुढें शिडीदारें घाटाच्या पाऊलवाटेनें पायीं डोंगराखालीं उतरून वैंगांवावरून कृष्णानदीचे पलीकडे जावें. तेथून नांदगणें आणि परतवडी हीं गांवें डावे बाजूस सोडून डोंगरावर चढावयास लागावें. हा चढ तीन मैल आहे. चालणारा खंबीर असल्यास दोन तासांत गडावर जाऊन पोहोंचतो. ह्या डोंगराचे योगानें एका खोऱ्याचे दोन भाग झाले आहेत. ते एक कृष्णाखोरें व दुसरें जांबूळखोरें; कृष्णाखोऱ्यांत कृष्णानदी वाहत चालली आहे व जांबूळखोऱ्यांत वळखीनदी वाहत चालली आहे. आणि दोघींचा संगम कमलगडाचे पूर्व सोंडेकडे वेलंग गांवाजवळ झाला आहे. या डोंगरावरील माथ्याचा पठार १० किंवा १२ च एकर असेल. या किल्ल्याला भोंवता-

लून खडक आहे, त्यांतून आंत जाण्यास कोठें वाट नसल्यामुळें वरून चढून जाण्यास फार आयास होतात. पूर्वी खडकाच्या तळांतून वर जाण्यास एक भुयार असे, त्यांतून लोक येत जात असत. अली-कडे या भुयारांत एक मोठा थोरला दगड कोसळून पडल्यामुळें भुयारांत जाण्याची अगदींच बंदी झाली आहे. त्याच दगडाजवळ पायराच्या झाडावरून लोक वर जात येत असतात. येथें कोणी इमारती किंवा तट बांधिल्याचीं कांहींच चिन्हें दिसत नाहींत. येथें एक खोल विहीर आहे ती सर्व कावेच्या दग-डांची असून नेहमीं पाण्यानें गच्च भरलेली असते. हल्लीं इची खोली सुमारें ३० पासून ३५ फुटांपावेतों आहे. या विहिरींत कोनाडे होते. आरोपी लोकांना उपाशी ठेविलें असतां लवकर जीव देणें बरें किंवा उपासमार होत होत मरणें बरें वाटतें, हें पाहण्याक-रितां हा कोनाड्यांची तजवीज केली होती असें ह्मणतात. परंतु हे कोनाडे कोठें आहेत तें आतां विहीर बुजत आल्यामुळें दिसत नाहींसें झालें आहे.

या टेंकडीवर मुळींच वस्ती नाहीं. या गडाच्या दोहों अंगास लहान झुडपांची पुष्कळ दाट झाडी आहे. भोंवतालच्या खडकाचे पायथ्याजवळ पाण्याचा झरा आहे व त्याचे पश्चिमेस गोरखनाथाचें एक ओबड-धोबड देऊळ आहे. हा डोंगर हल्लीं अजगांवाखालीं आहे. यावर एप्रिल व मे महिन्यांत डुकरांचा बराच प्रळय होतो. त्या वेळीं त्यांची पारध करण्याची फार मौज असते.

## चोरांची घळ.

मालकमपेठेपासून सुमारें ९ मैलांवर दक्षिण अंगास एक घळ आहे ती पाहण्यास बरेच लोक जात असतात. तिकडे जाण्यास बाबिंगटन पाईंट पासून पुढें वाट फुटलेली आहे. ही फुटवाट एक मैलपर्यंत गाडी किंवा घोडें जाणेसारखी आहे. नंतर पायानें जाण्याची पाऊलवाट लागते. ती एका खडकाळ मैदानांत गेली आहे. ह्या मैदानाचे एका बाजूस ही घळ आहे. मालुसरे गांवच्या धावड लोकांची या पाउलवाटेनें फार रहदारी असते. या घळीसंबंधानें लोकांनीं निरनिराळीं अनुमानें केलीं

आहेत, परंतु याबद्दलची निश्चयात्मक माहिती मिळ-त नाहीं. कांहीं लोकांचें असें म्हणणें आहे कीं पूर्वीं येथें अरण्यांत राक्षस राहत होते, त्यांचें हें व-सतिस्थान असावें; कांहींचें असें म्हणणें आहे कीं, ऋषींनीं तपश्चर्या करण्याकरितां अशा एकांत जागीं गुहा केली असावी; कांहीं आधुनिक मंडळींचें असें मत झालें आहे कीं, पूर्वीं येथील धावड लोकांचा लोखंड काढण्याचा कारखाना होता त्या वेळीं त्यांनीं येथून दगड नेऊन नेऊन ही जागा खोदून टाकिली असावी. परंतु या शेवटच्या कल्पनेवर अशी शंका उत्पन्न होते कीं, लोखंडी दगड येथी-ल जमीनीचे पृष्ठभागावरच जर हवा तितका सांप-डतो तर जमीनीचे आंत खोदून दगड काढण्याचें त्यांस काय प्रयोजन होतें?

ही घळ आंत सुमारें १६० फूट लांब आहे. घळीचें तोंड १० फूट रुंद असून न ओणवतां आंत जाण्यासारखें उंच आहे. मध्यभागची जमीन सखल होत आली आहे. कांहीं वर्षांपूर्वीं ही घळ म्हणजे एक ५०० फूट लांबीचा आरपार जाण्या-

सारखा बोगदाच होता असें सांगतात. हल्लीं ही येथील कहरी पावसाच्या पाण्याचे लोंढ्यांनीं आंत गाळ येऊन भरत चालली आहे असें दिसतें. या घळीच्या आसपास झाडी गर्द असून त्यांत हिंसक जनावरांची जाग ( चाहूल ) आहे. तेव्हां तीं या घळींत जाऊन स्वस्थ पडत असण्याचा बराच संभव आहे. यामुळें जवळपासच्या खेड्यांतील लोक आंत जाण्यास फारसे धजत नाहींत. या घळीला येथील लोक शिन शिन घळ किंवा भयंकर रस्ता असें म्हणतात.

## दुतोंडी घळ.

ही घळ सिंडोला डोंगराची ओळ व पांचगणी रस्ता यांपासून जेथें केट पांइटला जाण्याचा रस्ता फुटतो त्यांचे दरम्यानचे सखल जागेंत केलेली आहे. ही वर सांगितले घळीपेक्षां लहान आहे, तथापि ही फार प्रसिद्ध आहे आणि पुष्कळ लोक ही पाहण्यास येतात.

## पारूत.

दक्षिणेस कोयना खोऱ्याच्या बाजूस या डोंगराचे शैलबाहूवर हें एक खेडें आहे. हें बाबिंगटन

पाइंटापासून सुमारें ६ मैल आहे. याला जाण्यास पाऊलवाटच आहे, पण चांगली आहे. या गांवचे आसपास फार किर्र झाडी आहे. त्यांत डुकरें, भेकरें, ससे, सांबरें, पांखरें वगैरे पुष्कळ प्राणी आहेत. या गांवाच्यापलीकडे सुमारें १०।१२ मैलांवर बामणोली गांव आहे त्याचे जंगलांत अस्वलें, सांबर हीं जनावरें आहेत. बामणोलीला जाण्यास मेढें गांवावरून चांगली पाऊलवाट आहे. हीं ठिकाणें शिकारी लोकांना रंजविण्यासारखीं आहेत व यांवर मैदानांतील हौसी लोकांना झाडीची मजा पाहण्यासारखीं आहेत.

## चंद्रगड.

प्रतापगडच्याच दिशेकडे मालकमपेठपासून सुमारें ६ मैलांवर आर्थरसीटचे बाजूस भैरव दऱ्यानें ढवळ्या घाटालगत एक टेंकडी आहे तिला चंद्रगड असें ह्मणतात. या गडाचे भोंवतालच्या जगलांत मोठ मोठे हिंसक पशू आहेत. त्यांचा पारध करण्यास येथून लोक कधीं कधीं जातात.

## पांडवगड.

कमलगडाच्या पलीकडे ५ मैलांवर पांडवगड आहे.

त्याला जाण्यास रस्ता पांचगणीपर्यंत उत्तम गाडीचा आहे. तेथून तायघाटानें खालीं उतरून धौम अंबेपुरीवरून पाऊलवाट गेलेली आहे. पायथ्यापासून माथ्यापर्यंत दीड मैल चढून जावें लागतें. हा किल्ला चोहोंबाजूंनीं चांगला बांधलेला आहे. याची उंची ४१७७ फूट आहे. येथून फार लांबीचा प्रदेश दिसतो. या किल्ल्यावर पाणी फार चांगलें आहे. येथेंच पांडव पूर्वीं अज्ञातवासांत असतांना येऊन छपून राहिले होते अशी आख्यायिका आहे. कारण डोंगराचे माथ्यावरून जमीन पोंखरून तळापर्यंत वाट केलेली तीन चार जागीं आहे तीस पांडवदरा असें म्हणतात. हल्लीं हा आंतून पडल्यामुळें बुजून गेला आहे. पांडवाच्या मूर्तीही वर आहेत. त्यांस पांडवजाईचें देऊळ म्हणतात. येथें वार्षिक जत्रा भरत असतें. ह्या डोंगरांत तीन पाण्याचें हौद व एक गुहा आहे.

## राजपुरी.

पांचगणी गांवचे मागील बाजूस खिडींतून राजपुरी येथें येण्यास वाट आहे. ही वाट फक्त पायानें

जाण्यासारखी आहे. या वाटेनें सुमारें १ मैल गेलें, म्हणजे एक गुहा डोंगराच्या मध्यभागीं मुद्दाम कोरल्याप्रमाणें दिसते. ही गुहा कोणी कोरली असावी हें समजत नाहीं.या गुहेला बाहेरील बाजूस व्हरांड्यासारखी जागा असून त्यांत चौकोनी पाण्याचे दोन हौद बांधलेले आहेत. यांतील पाणी जिवंत असून नेहमीं भरलेलें असतें. हें पाणी क्षेत्र महाबळेश्वरचे पाण्याप्रमाणें गोड व थंडगार असते. पलीकडे देवळांतील गाभाऱ्याप्रमाणें एक अंधाराची सुमारें २० फूट लांबीची कोरीव घळ आहे, त्यांत खडबडीत पाषाणाची २ फूट उंचीची मूर्ति आहे. तीस कार्तिकस्वामी, असें ह्मणतात. हिंदु धर्माप्रमाणें फक्त पुरूष मंडळी याची पूजा करण्यास जाते बायका या देवास कधींही जात नाहींत. जत्रा कार्तिकी पौर्णिमेस भरते, त्या वेळीं येथें जवळपासचे पुष्कळ लोक जमतात हें कोरीव काम फार पैस असून मजबूत आहे.याची आजपावेतों कोणीही दुरुस्ती केली नाहीं तथापि अद्याप पावेतों तें कोठेंही भंगलेलें किंवा पडलेलें दिसत नाहीं.

## गायदरा किंवा गुलेरा घळ.

ही घळ पांचमैलाच्या हद्दीतील गोळेगांवचे रानांत जोर व गोळेगांव या गांवांच्या दरम्यानचे टापूच्या डोंगरांत सपाटीवर आहे. ह्या ठिकाणीं येण्यास वाट मालकंपेठेपासून महाबळेश्वरक्षेत्रपावेतों उत्तम गाडी रस्त्याची असून पुढें मात्र पायानें गेलें पाहिजे. ही पायवाट महाबळेश्वरीं गणेशदाऱ्यानें फुटते. ही मातट जमीनीची लहान पाउलवाट असून तिच्या दुतर्फा दाट झाडीची थाप लागून गेलेली आहे.त्यामुळें पादचारी लोकांना या वाटेनें त्या झाडीची थंडगार हवा लागून येतां जातां घामानें अंगावरची पैरण भिजून चिप होण्याची वेळ येत नाहीं. तळांतील जोरगांवचे लोक या वाटेनें डोकीवरून मोटमोठाले गवताचे भारे वगैरे आणून मालकमपेठेंत विकून टाकितात व लागलींच संध्याकाळीं परत घरीं जातात. खालीं उतरून जातांना डावीकडे व उजवीकडे डोंगराच्या बाजवा दाट झाडींनें आच्छादित झाल्यामुळें चोहोंकडे जमिनीचा किंवा पाषाणाचा यत्किंचित् भाससुद्धां होत नाहीं. परंतु मा-

थ्याच्या भागाचा उंच मान काढून उभा राहिलेला खडक सर्व ठिकाणीं उघडा व काळाभोर दिसून जवळ असल्यामुळें पाहणाराच्या मनास गर्भगळित करून टाकतो. डावे अंगास तळांतील सपाट जाग्यावर चिमुकले धनगरी पद्धतीचें कमलजा देवीचें देवालय व त्याच्यापुढील पटांगणास लागून वाहत असलेला वेदगंगेचा प्रवाह हीं त्या हिरव्यागार पसरलेल्या सृष्ट गालिच्यास चित्रविचित्र प्रकारची शोभा देतात. असें सुमारे तीन मैल डोंगर उतरून गेलें ह्मणजे जोरगांव लागतें. ह्या गांवास सपाटीची जागा नसल्यामुळें गावांतील केंबळी घरांची त्रेधा उडल्यासारखी दिसते. कोठें दोन, कोठें चार, अशीं जागजागीं खोपटीं केलेलीं दिसतात, यावरून देशावरील मनुष्यास हें गांव आहे किंवा सोंग आहे असें वाटल्यावांचून राहत नाहीं. पुढें डावेबाजूनें निघून चाललें ह्मणजे कृष्णानदीचें झुळझुळ वाहत चालणाऱ्या प्रवाहाचें लहान ओढ्यासारखें पात्र लागतें, तें आणि वेदगंगेचा मोठा प्रवाह यांचें येथें ऐक्य होऊन कृष्णाबाईचें मोठें प्रस्थ झालें

आहे. पुढें डोंगराच्या बाजूकडे जरा वळलें असतां ही घळ दिसूं लागते. तिची आंतून लांबी ५० हात, रुंदी २० हात व उंची १० हात आहे. तोंडाची रुंदी सुमारें १६ हात असून उंची १० हात आहे. ह्या घळीच्यावरून पाण्याचा प्रवाह बारा महिने पुढें पडून वाहत असतो. यावरून यांत मनुष्यवस्ति असावी असें अनुमान होतें. ही घळ सरकारी जंगलाच्या हद्दींत आहे. तथापि या ठिकाणीं मनुष्यांची व जनावरांची वर्दळ असल्यामुळें आंत जाऊन पाहण्याची धास्ती वाटत नाहीं. याजबद्दल जवळपासच्या गांवकरी लोकांची अशी कल्पना आहे कीं वाघ वगैरेच्या धाडी पडण्याची काळजी असल्यामुळें गुरें बंदोबस्तानें ठेवण्याकरितां ही घळ कोरली असावी. हल्लीं १०।६० गुरें मावण्यासारखी विस्तीर्ण जागा यांत असून ती स्वच्छ आहे.

---

# म्युनिसिपालिटी.

मालकमपेठची वसाहत इ० स० १८२७ पासून सुरू झाली, हें पूर्वी मालकम पेठ ऊर्फ महर या प्रकरणांत सांगितलेंच आहे. तेव्हांपासून इ० स० १८६६ पर्यंत या हिल्लस्टेशनची स्वच्छतेसंबंधी व्यवस्था पाहण्याचें काम सरकारतर्फे नेमलेल्या कांहीं मंडळीकडे होतें. यास हें काम करून घेण्यास जो खर्च करावा लागे, तो सरकारी खजिन्यांतून कांहीं एक ठराविक रकम घेऊन त्यांतून करण्याची या मंडळीस परवानगी होती. या रकमेस "स्टेशनफंड" अशी संज्ञा असे. पुढें इ० स० १८६५ मध्यें या स्टेशनची सुधारणा करण्याचें सरकारचे मनांत आल्यावर त्यांनीं या साठीं ज्यास्त लागणाऱ्या पैशाची जुळणी करण्याकरितां ही म्युनिसिपालिटी स्थापन करण्याची कल्पना काढली. त्याप्रमाणें इ० स० १८६७ तारीख १ माहे मे इसवी रोजीं ही मंडळी कमी करून सरकारानें गांवम्युनिसिपालिटीची स्था-

पना केली. इ० स० १८८६ मध्यें या गांवम्युनिसिपालिटीच्या ताब्यांत या हिल्लस्टेशनकरितां घेतलेली सर्व जमीन देण्यांत आली. इतकें झालें तरी म्युनिसिपालिटीस सरकारी मदत म्हणून जी रकम मिळत होती; ती होतीच आणि अद्यापिही ९२१६ रुपये दरसाल मिळत आहेत. परंतु सरकारानें प्रथम बंगल्याकरितां घेतलेल्या जागेबद्दल एका एकरास एक रुपयापासून १० रुपये पावेतों प्रमाणें कर घेण्याची शिस्त ठेविलीच आहे. या जागेबद्दल सरकारानें कित्येकांस २१, ५०, व ९९ वर्षांचीं लीजें ( कौल ) दिले आहेत. सन१८८८ पासून पुढें ज्याचें जुनें लीज संपून गेलेमुळें त्यास नवीन करून देण्याची पाळी येईल, त्यांनीं सरसकट एकरी १० रुपयेप्रमाणें कर सरकारास देण्याचें ठरविलें आहे. या शिवाय प्रत्येक बंगल्याच्या किंवा घराच्या मालकास वार्षिक भाड्याच्या मगदुरावर शेकडा २॥ रुपयेप्रमाणें म्युनिसिपालिटीस घरपट्टी द्यावी लागत आहे ती निराळीच. याही गोष्टी बंगल्यास किंवा घरास भाडें

ज्यास्त पडण्याचीं जीं कारणें बंगले या प्रकरणांत दिलीं आहेत, तीं वाचतांना लक्षांत ठेविल्या पाहिजेत.

ही म्युनिसिपालिटी निघाल्यावर निरनिराळ्या बाबींच्या उत्पन्नाची भर पडून आतां दरसाल म्युनिसिपल तिजोरींत सुमारें २०,४०० रुपये रकमेची जमा होत आहे. त्यांतून सुमारें १७,५०० रुपयांची रकम खर्चीं पडून बाकीची दरसाल शिल्क राहत आहे. या बाबी--फारेस्टकडे गेलेल्या-म्युनिसिपालिटीच्या जमिनीचें उत्पन्न; म्युनिसिपालिटीच्या बंगल्यांचें उत्पन्न; हौसटॅक्स, कान्सरव्हन्सी टॅक्स, व्हील व हॉर्स टॅक्स वगैरेचें उत्पन्न--फार लौकर पैसा जमविण्यास कारण झाल्या आहेत.

या हिलस्टेशनवर कायमचे रहिवाशी व हवापाण्याच्या सुखाची प्राप्ति करून घेण्याकरितां आलेली मंडळी यांजकडून पुढें दिल्याप्रमाणें गाडी व घोड्याबद्दल कर वसूल करून घेण्यांत येतात. येथें येणारे लोक एक पुरा महिनासुद्धां येथें राहणारे नसले तरी त्यांस महिन्याचाच कर द्यावा लागतो. सीझनचे केवळ तीन महिने जरी त्यांनीं येथें काढले

तरी त्यांस वर्षाचा कर भरणें भाग पडतें. गाड्या घोड्यांचें रजिस्टर ठेऊन त्यावरून कराची आकारणी करितात. गाडी किंवा घोडा स्वतःचा किंवा भाड्यानें आणलेला असो, ती वापरणारांसच त्याबद्दल कर द्यावा लागतो. त्याचें प्रमाणः—

| | दरमाह. | दरसाल |
|---|---|---|
| चारचाकी गाडी | ५ | १२ |
| दोनचाकी,, | ३ | ८ |
| सारवट गाडी | २ | ६ |
| रबरी धावास ( जास्त ) | १ | ३ |
| बसण्याचे घोडे | २ | ६ |
| " तट्टास | १॥ | ३ |

हा कर लष्करी खात्याच्या व मुंबई सरकारच्या तैनातीस असणारे नोकरांस पडत नाहीं.

जंगली पक्षांस त्यांच्या वाढीच्या दिवसांत मारणारे लोकांस मारून देण्याबद्दल नजर ठेवण्याविषयीं येथें येणाऱ्या सर्व गृहस्थांस म्युनिसिपालिटीची सूचना आहे. कारण यासंबंधाचा कायदा महाबळेश्वरासही लागूं केला आहे. तथापि त्यांच्या कांहीं

मुदती आहेत. त्यांत मात्र या सूचनेप्रमाणें व्यवस्था राहणेची आहे. त्या मुदती—पक्षी मारणेची बंदी तारीख १ माहे मार्चपासून तारीख १ माहे आक्टोबर पावेतों; सांबर मारणेची बंदी तारीख ३१ माहे मेपासून तारिख १ नोवेंबर पावेतों; भेकर मारण्याची बंदी तारीख ३१ माहे डिसेंबरपासून तारिख १ माहे मार्च पावेतों; हरीण मारण्याची बंदी तारीख ३० माहे एप्रिलपासून तारिख १ माहे डिसेंबरपावेतों; ससे मारण्याची बंदी तारिख ३० माहे सपटंबरपासून तारिख १ माहे मार्च पावेतों. या निर्दिष्ट केलेल्या मुदतींत ज्या कोणा-जवळ नुकतेंच मारलेलें किंवा धरलेलें तें तें जंगली पांखरूं किंवा तो तो प्राणी असल्याचें दिसून येईल, किंवा जो कोणी म्युनिसिपालिटीच्या हद्दींत त्या त्या जंगली पांखरांचा किंवा प्राण्यांचा पिसारा अगर कातडी काढून घेऊन येईल तो, ही पहिलीच वेळ असल्यास, १० रु० दंडास पात्र होईल. या परस्थलोकांकडे जो कोणी अशीं पांखरें किंवा प्राणी विक्रीकरितां घेऊन आलेला आढळेल यास

सुपरिंटेंडंटचे आफिसांत किंवा फौजदार कचेरींत अडकावून टाकून असले गुन्हे न होऊं देणेंबद्दल दक्षता ठेवील त्यास हे अल्पवयी जीव रक्षण केल्याचें श्रय मिळेल.

येथील म्युनिसिपालिटीचा मुख्य अमलदार सातारा जिल्ह्याचा कलेक्टर आहे. परंतु तो नेहमीं साताऱ्यासच राहत असल्यामुळें बहुतेक सर्व अधिकार येथील सुपरिंटेंडंटाकडेच सोंपविलेले असतात. येथील वस्ती फार लहान असल्यामुळें मेंबरांची निवडणूक सरकार तर्फेच होत असते. या मेंबरांपैकीं कांहीं मेंबरलोक सरकारी नौकर असतात, व कांहीं गांवचे मोठमोठे ठळक व्यापारी असतात. या म्युनिसिपालिटीचें सर्व आफिस पावसाळ्यांत साताऱ्यास जातें. या हिल्लस्टेशनावर फिरण्यासारखे गाडीरस्ते सुमारें ६४ मैलपर्यंत भरण्याजोगें चोहोंकडे पसरले आहेत. हे तयार करण्यास पूर्वीं येथें असलेले चिनी-बंदिवान लावून करून घेतलेले आहेत. याच कामावर त्यांस नेहमीं राबवून घेत असत. हल्लीं हे सर्व रस्ते पावसाळ्यांत खडी घालून दुरुस्त ठेविण्याचें काम

म्युनिसिपालिटीकडूनच होत असतें. तसेंच उन्हाळ्यांत येथील सडकांच्या बाजूस असणारे झाडांचा वाळलेला पाला पडून रस्ते कोठें अव्यवस्थित दिसल्यास ते झाडून साफ करण्याकरितां जागजागीं हातांत डाहाळ्याची झाडणी घेऊन बायकामाणसाची फरेट चोहोंकडे लागून गेलेली असते. यामुळें येथें केव्हांही व कोठेंही गलिच्छपणा दृष्टीस पडत नाहीं. अशी उत्तम प्रकारची म्युनिसिपालिटीची व्यवस्था असते, ती पाहून फार आनंद होतो.

## कानसरव्हन्सी टॅक्स.

येथें येऊन बंगल्यांतून राहणारे थोर लोकांनीं त्या बंगल्याच्या कंपौंडांत कागदाचे कपट्यांचा आणि इतर हरतऱ्हेचा कचरा पडून गलिच्छपणा न दिसेल अशी तजवीज मेहेरबानी करून ठेवावी; तो झाल्यास आपले नोकरांकडून एका जागीं गोळा करवावा ह्मणजे म्युनिसिपाल कमिटीच्या कचऱ्याच्या गाड्यांतून भरून टाकण्यास फार सोईचें पडतें. बंगल्याच्या सभोंवारचें जगंल स्वच्छ ठेवून

हवा न बिघडूं देण्याचे कामीं फार त्रास पडूं लागल्यामुळें आणखी या लोकांस अशी मुद्दाम सूचना देण्यांत येते कीं यांनीं आपले कंपौंडांत नोकर लोकांचे पायखाने तात्काळ तयार करून घ्यावे आणि त्यांतील मैला भंगीलोक लांब नेऊन डिपोंत टाकितात किंवा कोठें तरी जंगलांत फेंकून देतात यावर त्यांनीं करडी नजर ठेवावी अशी त्यांस विनंती आहे. कारण, त्यांच्या कामावर दुर्लक्ष्य केलें तर हे भंगीलोक जवळच्या झाडींत मैला टाकून हात हालवीत जाण्यास कधीं कमी करणार नाहींत. मागून मग तो कोणी टाकला व केव्हां टाकला ही चांभारचौकशी करण्यांत कांहींच उपयोग होत नाहीं.मैला टाकण्याची जागा कोणीकडे केली आहे ती समजून घेण्याकरितां आपल्या बरोबरच्या भंग्याला येथील कानसरव्हन्सी इनस्पेक्टरकडे पाठवून द्यावें. भंग्याची कामगिरी बरोबर न झाल्याचें सुपरिंटेंडंटसाहेबाच्या कानावर आलें, तर त्याबद्दल सक्त तजवीज केली जाईल.

**भंग्याचे दर**—बंगल्यांतील मुख्य मालकास दर-

महा २ रु० व १६ वर्षांवरील वयाच्या त्याच्या कुटुंबांतील प्रत्येक इसमास दरमहा १ रु० प्रमाणें भंग्यास पैसा दिला पाहिजे. १६ वर्षांच्या आंतील वयाच्या मुलांस भंगीपट्टी माफ आहे. आपले हिंदु नोकरांना दरमहा माणशीं चार आणे पडतात. एकंदरींत बंगल्यामागें ६ रुपयांपेक्षां जास्त मुशाहिरा मात्र भंग्याला देण्याचा नाहीं.

बंगल्याच्या मालकानें कंपौंडाची बाडी ( सुक्या दगडाचा गडगडा ) व पिलर चांगले दुरस्त राखले पाहिजेत; आणि पावसाळा खलास होतांच पावसाच्या निवारणार्थ केलेल्या झडद्या किंवा तत्संबंधी कांहीं गदळा असेल तो काढून सर्व जागीं स्वच्छता ठेविली पाहिजे.

कंपौंडांत गवती छपराचे पायाखाने, तबेले किंवा झोंपड्या तूर्तातुर्तीकरितां बांधण्याचें अवश्य पडल्यास त्याबद्दल सुपरिंटेंडट साहेबांकडून आगाऊ परवानगी मागितली पाहिजे.

कानसरव्हन्सीटॅक्स शेंकडा १॥ प्रमाणें ( अ ) तारिख १ मार्च पासून तारीख १५ माहे जून

तागाइतचे ऊष्ण काळाबद्दल बंगल्याच्या किंमती-वर असतो– व (ब) तारीख १० आक्टोबर पासून २८ फेब्रुवारीपर्यंतच्या थंड काळाबद्दल म्युनिसिपालिटीच्या हद्दींतील खासगी जागेंत कोठेंही जनावरांकरितां किंवा गाड्या वगैरेकरितां छपरें किंवा आडोशाची जागा हीं केल्यास त्याबद्दल दरएक सीजनला १०० चौ० फुटास दोन आणे प्रमाणें कर भरला पाहिजे.

**कानसरव्हन्सीटॅक्स** ज्या इमारतीस द्यावा लागत असेल त्या इमारतीचे कंपौंडांत तंबु लावला असेल किंवा झोंपडी केली असेल तर त्यांजबद्दल मात्र इतर ठिकाणीं लावलेल्या तंबूच्या किंवा केलेल्या झोंपड्यांच्या कराचा तिसरा हिस्सा कर दिला ह्मणजे झालें. पुढील इमारतीस कराची आकारणी होत नाहीं:—ज्या घराचें किंवा इमारतीचें वर्षास १६ रुपयांच्या आंत भाडें येतें त्या. ज्या म्युनिसिपालीटीच्या इमारतीस भाडें घेण्यांत येत नाहीं त्या आणि धर्मखात्यानें बांधून ठेवलेल्या धर्मार्थ इमारतीं·

## लेडी रे स्कूल.

मालकमपेठेची वस्ती वाढत वाढत इतकी वाढली कीं, ती पेठ वसविल्यापासून सुमारें ३० वर्षांनीं ह्मणजे सन १८६४ सालीं येथें मुलांची शाळा असावी अशी अवश्यकता वाटून ही शाळा स्थापन झाली. या वेळीं या शाळेला सरकारी इमारत होती, परंतु ती लहान असलेमुळें त्या इमारतीची विक्री करून पुढें सन १८८६ सालीं म्युनिसिपाल खर्चांतून शाळेकरितां ही नवीन इमारत बांधण्यांत आली. या संधीस मुंबईचे गव्हरनर नामदार लार्ड रे साहेब यांची स्वारी येथें आलेली असल्यामुळें, या नव्या इमारतीचा प्रवेशविधि त्यांच्याकडून करवून या इमारतीस त्यांच्या प्रियपत्नीचें नांव "लेडी रे स्कूल" असें देण्यांत आलें. त्या नांवानें ही शाळा अद्यापि प्रसिद्ध आहे.

या शाळेंत मराठी पांच इयत्तांपर्यंत अभ्यास चालतो. या शाळेंत पाऊस काळांत, जरी या वेळीं येथें कोणी बाहेरील गृहस्थ राहत नाहींत, तरी मुलांची संख्या १५० पर्यंत असते. ही संख्या, हिंवाळ्यांत

व उन्हाळ्यांत येथें बाहेरील लोक येऊं लागले ह्मणजे सुमारें २०० पर्यंत वाढते. या मुलांपैकीं बहुतेक मुलें मराठे व मुसलमान जातींचीं असतात. शाळेंत शिक्षक पांच आहेत. एक हेडमास्तर असून त्यांचे हाताखालीं आणखी चार असिस्टंट मास्तर असतात. ही शाळा येथील म्युनिसिपल कमिटीच्या ताब्यांत असून तिच्या संबंधाच्या सर्व प्रकारच्या खर्चाची व्यवस्था म्युनिसिपालिटीच्या उत्पन्नांतूनच होते.

## हॉस्पिटल.

फ्रियर हालच्या नजिक म्युनिसिपालिटीच्या आश्रयानें चालणारी स्टेशन हॉस्पिटल आणि धमार्थ दवाखान्याची संस्था आहे. तीवर येथील सुपरिंटेंडंटसाहेबांची तपासणी असते. येथें या साहेबबहादुरांचें हुकुमाप्रमाणें दवाखान्याचें काम करण्याकरितां एक हॉस्पिटल असिस्टंट व एक कम्पौंडर असे नोकर ठेविलेले असतात. ते दररोज सकाळीं ७ पासून १० पर्यंत व दुपारीं ५ पासून ७ पर्यंत

दवाखाना उघडा ठेवून औषधपाणी देण्याकरितां हजर असतात.

सर्व सरकारी नोकरांना व लष्करी खात्याच्या नोकरांच्या कुटुंबांतील माणसांना कांहीं सल्लामसलत किंवा औषध घेण्यास कांहीं एक छदाम द्यावा लागत नाहीं. सरकारी नौकर नसून इनकम-टॅक्स भरणारे लोकांस दवाखान्यांत येऊन प्रकृति दाखविण्याबद्दल आठ आणे व औषध घेण्याबद्दल तीन आणे मिळून आकरा आणे द्यावे लागतात. पुन्हा त्यांस दुसरे दिवशीं प्रकृति पाहण्यास चार आणे व औषधाबद्दल तीन आणे आकार पडतो. हॉस्पिटल असिस्टंटला दिवसा घरीं आणण्याचें कारण पडल्यास फी एक रुपया देऊन औषधाचे तीन आणे भरावे लागतात. रात्रीं आणण्याबद्दल औषधाशिवाय दोन रुपये फी पडते.

कोणास सिव्हिल सर्जनची सकाळीं अवश्यकता आहे असें वाटल्यास त्यानें त्यांस सकाळीं नऊ वाजण्याचें आंत चिठी पाठविली पाहिजे किंवा रात्रींची बोलाविण्याचीं जरूर वाटल्यास सायंकाळचे

पांचापूर्वीं त्यांस सूचना देऊन ठेवावी लागते. त्यांची फी दिवसास रुपये १० व रात्रीस रुपये २० आहे. या संस्थेचा खर्च म्युनिसिपालिटीकडून होत असतो.

## चावडी व फौजदार कचेरी.

या हिल्लस्टेशनवर सर्व प्रकारची व्यवस्था पाहण्यास दर दोन वर्षांनीं एक गोरा मुख्य अमलदार सरकारांतून नेमण्यांत येतो, त्यास " सुपरिंटेंडेंट " असा हुद्दा दिलेला असतो. हे येथें आक्टोबरच्या सुरवातीपासून तों जून १५ पावेतों राहून चोंहोंकडे देखरेख करीत असतात. हे नेहमीं सिव्हिल सर्जनच्या परीक्षेंत पसार झालेले असले पाहिजेत असा नियम आहे. यांस येण्याबरोबर दुसरावर्ग माजिस्त्रेटचा अधिकार मिळतो; व पुढें यांस केव्हां केव्हां पहिला वर्ग माजिस्त्रेटचाही अधिकार देतात. या माजिस्त्रेटखेरीज येथें एक दुसरा अमलदार तिसरा वर्ग माजिस्त्रेटचा अधिकार असलेला बारा महिने राहतो त्यास "महालकरी" असा हुद्दा असतो. याजकडे मुलकी व माजिस्त्रेटी काम चालतें. हे मेढें तालुक्याचे मामलेदाराच्या हाताखालील ठाणेदार या नात्यानें

काम करीत असतात. याशिवाय यास सुपरिंटेंडंट साहेबांसही येथील व्यवस्थेसंबंधानें मदत करण्यास झटावें लागतें. जिल्ह्याचे मुख्य मालक कलेक्टर साहेब हे या सुपरिंटेंडंटचेही वरिष्ट आहेत. कोणी संस्थानिक येथें येणार असल्यास किति लोकानिशीं येणार हें त्यास आगाऊ सुपरिंटेंडंटसाहेब यास कळवावें लागते.

या महालकऱ्याची कचेरी किंवा ज्यास चावडी असें ह्मणतात ती मालकमपेठेच्या ऐन मध्य वस्तींत बांधलेल्या एका सरकारी इमारतींत आहे. या इमारतींतच सरकारी तिजोरी असते. सीजनच्या दिवसांत येथें येणाऱ्या मोठमोठ्या अमलदारांच्या पगारवांटणीची खोटी होऊं नये म्हणून नेहमीं लाख रूपयेपर्यंत या तिजोरींत शिलक राखावी लागते.त्यासंबंधी देवघेवीचे व्यवहार करण्याचें काम खुद्द सुपरिंटेंडंट साहेबांकडे आक्टोबर ते जूनपर्यंत असतें. पुढें पावसाळ्यापुरतें महालकऱ्याकडे येतें. हुजूर डे० कलेक्टर यांचेकडे या तिजोरीचे हिशोब तपासणी होऊन रकमेचा तोटा आल्यास जिल्ह्याचे खजिन्यांतून पैसा

येतो. या करितां हे साहेबबहादूर आपल्या हेडक्लार्कांची योजना करून त्यास प्रत्येक महिन्याचा पहिला आठवडा, व पुढें प्रत्येक मंगळवार, गुरुवार, आणि शनिवार या दिवशीं दुपारीं १ पासून ४ वाजेपर्यंत हें काम करण्यास पाठवितात. मध्यंतरी **स्टांप ति-किटें** वगैरे घेण्याची किंवा नोटी मोडण्याची आव-श्यकता पडल्यास सुपरिंटेंडंटसाहेब यांजकडे लेखी अर्ज केल्यावर ते त्याकरितां तिजोरी उघडतात. या अडचणीमुळें येथें बाजारांत सामान घेण्याकरितां येणारे साहेबलोकांच्या बटलरांस वगैरे नोटी मोड-ण्यास सराफ लोकांकडे बटणावळ देण्याचा हमेषा प्रसंग येतो. मुंबईसरकारच्याच नोटा मात्र या खजि-न्यांत घेतात, इतर ठिकाणच्या घेत नाहींत. तसेंच या फार फाटक्या, चिताड किंवा दोन वेगळाले तुकडे जोडून केलेल्या नोटा केंव्हांही तिजोरींत घेत नाहींत. १०० रु. रकमेवरील किंमतीच्या नोटा मोडण्याचें असेल तेव्हां त्याबरोबर नोटांचे नंबर व त्या आणणारा मालक हें एका कागदांत दाखल करून तो कागद त्या नोटांलगत पाठवावा

लागतो. या तिजोरींत बँकेचे चेकचा पैसा मिळत नाहीं. कारण येथें ही तिजोरी बँकेचें काम करीत नाहीं.

या इमारतींत याशिवाय पोलीस कामगाराची कचेरी असते. त्याचा मुख्य कामगार फौजदार किंवा चीफ कान्स्टेबल नेमलेला असतो. त्याचे हाताखालीं फार तर पोलीसशिपाई व नाईक मिळून २५।३० पर्यंत लोक असतात. त्यांवर जमादार वगैरे वरिष्ट लोक सीजनच्या वेळीं जास्त नेमितात. अलीकडे हिंदुस्थानांत प्लेगचा प्रादुर्भाव झाल्यापासून या महाबळेश्वर सानिटेरियमवर दूषित भागाकडून येणारे कमी दर्जाचे लोकांस आब्झरव्हेशन कॅम्प-मध्यें ठेविण्याची फार कडक व्यवस्था आहे. त्याक-रितां प्लेग फौजदार व त्याचे सोईसाठीं लागणारे पोलीस कामगारही येथें सीजनभर ठेविलेले असतात. येथील पोलीस कान्स्टेबल दिवसा पेठेंतील रस्त्यावर उभे राहून गाड्या घोड्यांच्या तडाक्यांत कोणी सांपडूं नये ह्मणून चांगली दक्षता ठेवीत असतात. गवताचे किंवा जळाऊ लाकडाचे भारे विक्री क-

रितां घेऊन येणारे लोकांस पेठेंतून अगदीं उभे राहूं देत नाहींत. हे रात्रींस बरोबर भाले घेऊन रवणीस या पेठेच्या आसपास मात्र फिरत असतात. येथें रात्रींच्या प्रसंगीं कधीं कधीं जंगली हिंसक जनावरें दृष्टीस पडतात म्हणून ही भाल्याची कल्पना काढली आहे. येथील चावडीवर एक तास टांगलेला आहे, तोही पाहऱ्यावर असणारे शिपायाकडून वाजविण्यांत येतो. आणखी कोठें येथें आग किंवा रात्रीची मोठी चोरी वगैरे सार्वजनिक संकट आलें असतां हा तास एकसारखा घणघण असा बराच वेळ वाजवितात. तेणेंकरून गांवचे सर्व लोक संकट निवारणार्थ पोलिसच्या मदतीस एकदम गोळा होतात. सातार जिल्ह्याचे पोलीस सुपरिंटेंडेंट हे पोलीस खात्याचे मुख्य आहेत.

मेढें तालुक्यांत या पेट्याचा समावेश होत असल्यामुळें मेढ्याचा तालुका सबरजिष्टर मार्च, एप्रिल व मे या महिन्यांत पहिले सोमवारी येथें येऊन दस्त नोंदण्याचें काम करून जातो. तसेंच १०० रुपयाचे आंतील शेतकऱ्यांचे दस्त नोंदण्या-

करितां येथें कायमचा एक गांवरजिस्टर आहे. तो महिन्यांतील १५ दिवस तेथें काम करून १५ दिवस तालुक्यात दुसरे ठिकाणीं जातो. या शिवाय देवीडाक्तरही येथें येऊन देवी काढण्याचें काम करीत असतो.

---

# नेटिव जनरल लायब्ररी.

हल्लींची लायब्ररीची नवीन इमारत ज्या जागीं बांधण्यांत आलेली दिसते, त्याच ठिकाणीं मालकमपेठ नेटिव लायब्ररी नांवाची अगदीं नादुरस्त झालेली एक जुनी इमारत होती. सन १८७२ सालीं सरकाराकडून वर्षाचें ७½ रूपये प्रमाणें जुजवी भुईभाडे कामयचें देऊन ही जुनी इमारत लायब्ररीच्या त्या वेळच्या म्यानेजिंग कमिटीनें बांधली होती. ती इमारत साधारण रीतीची असून पुष्कळ दिवसांची जीर्ण असल्यामुळें अगदीं निरूपयोगी झाली होती. यामुळें येथें वर्तमानपत्रें वाचीत बसणाऱ्या पुष्कळ एतद्देशीय थोर गृहस्थांच्या मनांची सुप्रसन्नता नसे. म्हणून ही नवी करण्यासाठीं दानशूर शेट बोमनजी दिनशा पेटिट यांजकडे या सार्वजनिक कामास मदत मागितली. तेव्हां त्यांनीं इमारत नवीन बांधण्याचा सर्व खर्च आपण

देतों असें मनापासून कबूल केलें, आणि आपलें नांव इमारतीस द्यावें अशी अट घातली. तेव्हां पुढारी मंडळींनीं असें करण्याबद्दल सरकारची मंजुरी आणवून त्यांचे ह्मणण्याप्रमाणें व्यवस्था केली, आणि त्यांजकडून ही इमारत तयार करून घेतली. यास नुसत्या इमारतीच्या कामास सुमारें १९,००० रुपये लागून कपौंडचें लोखंडी रेलिंग व गेटच्या सुशोभित झडपा यांस आणखी २००० रुपये लागले. याप्रमाणें सर्वांत मोठी मदत यांजकडून झाल्यामुळें प्रवेशविधीच्या वेळीं नाम० गव्हरनर साहेबांनीं सुद्धां यांच्या दातृत्वाची फारच प्रशंसा केली. असा आमच्या लोकांवर त्यांनीं चिरकाळचा उपकार करून ठेविला. पुढेंही संस्था चालविण्यासंबंधानें लागणाऱ्या खर्चाची तरतूद ज्या रकमेच्या व्याजांतून व्हावयाची असें ठरविलें आहे, त्या रकमेच्या भरतीसही या उदार पेटिट घराण्यांतून १००० रुपयांची रकम कबूल करण्यांत आली आहे. बाकी कायम देणग्या व वर्गणी मिळून सुमारें ९५०० रुपयांच्या व्याजाचें उत्पन्न लायब्ररीचे खर्चाकरितां केलें आहे.

या इमारतीचें काम महाबळेश्वरच्या इतर प्रेक्षणीय इमारतीच्या तोडीचें झाल्यामुळें, हिनें या स्थलास जास्त शोभा येऊन ही फार लोकोपयोगी झाली आहे. हिची रचना ( design ) अलीकडच्या पद्धतीची असून चांगली साधली आहे. हिचें बांधकाम मजबूत, टुमदार व शोभिवंत झालें आहे. ही इमारत सखल जागेमध्यें असल्यामुळें कंबरे इतकें उंच जोतें बांधून वर इमारत केली आहे. इमारतींत दोन अंगास दोन लहान दालनें करून दरम्यान एक मोठा लांबलचक हाल केला आहे. यामुळें वर्गणीदारांस स्वस्थ बसून वाचण्यास फार पैस जागा झाली आहे. शिवाय कांहीं सार्वजनिक कारणानें सभा करणें इष्ट असल्यासहीं यानें मोठी सोय झाली आहे. इमारतीच्या रूफास आंतून छताप्रमाणें जस्ती पत्रा मारलेला फार मजेदार दिसतो खरा परंतु आवाज झाले बरोबर लागलींच प्रतिध्वनी होऊन थोडा गोंगाट होतो. या इमारतीच्या आंतील व्हरांड्याच्या जमिनी मिंटन टाइलस्च्या रंगीबेरंगी केलेल्या फार छान दिसून वरून चालणारास आनं-

दित करितात. त्यावर उत्तम प्रकारचें मुंबईहून आणलेलें लांकडी फरनिचर मांडलें आहे.

या इमारतीचे पुढील अंगास टेनिस खेळण्याचे एक मोठें पटांगण ठेविलें आहे. या पटांगणांचे व मुख्य इमारतीचे सभोंवार लाल दगडाची पारापेट भिंत घालून त्यावर नकशीदार ओतीव लोखंडी रेलिंग बसविलें आहे. त्यांचें ओतकाम करितांना त्याच्या प्रत्येक तुकड्यांत बोमनजी दिनशा पेटिट नांवाचीं आद्य अक्षरें (मोनोग्राम) इंग्रजींत ओतवून घेतलेलीं आहेत. त्यांनीं करून ठेविलेलें हें रेलिंग ह्मणजे येथील आबालवृद्धांच्या मनांत बोमनजींच्या उपकाराबद्दलच्या कृतज्ञपणाची सतत जागृति राहण्यासारखें रोज डोळ्यापुढें दिसण्याजोगें स्मारकच झालें आहे, असें ह्मटलें तरी चालेल. सभोंवार कुंड्या वगैरे मांडून व फुलझाडें लावून बगीच्या बनविला आहे तोही फार शोभादायक झाला आहे.

ही नवी लायब्ररी सुरू करण्याचा प्रवेशविधि नामदार गव्हरनर लार्ड नार्थकोटसाहेब यांचेकडून

तारीख २२ मे १९०२ इ. रोजीं मोठ्या समारंभानें झाला. त्यावेळीं गव्हरनरसाहेबांचें नांव घालून हुद्याचें मोर्तब (Coat of arms) कोरेलेली अशी एक मोठी रुपेरी चावी त्यांच्या स्वाधीन करून त्यांजकडून इमारत उघडविली. या समारंभाचे वेळीं परम उदार शेट बोमनजी पेटिट एकाएकीं आजारी पडल्यामुळें त्यांचे चिरंजीव सर जहानगीरजी पेटिट यांनीं आपल्या वडिलांचे आकस्मिक अस्वास्थ्यामुळें येणें अशक्य असल्याचें सांगून दुःख प्रदर्शित केलें आणि त्यांनीं नामदारसाहेबांस निमंत्रण करण्याचें काम आपल्यावर सोंपविलें आहे असा प्रस्ताव करून, गव्हरनरसाहेब आले त्याबद्दल आनंदाचे उद्गार काढले. शिवाय आणखी आभारदर्शक बरींच भाषणें झालीं.

या संस्थेच्या उत्पादक कमिटीचे पुढारी सॉलिसिटर भाईशंकर नानाभाई, व श्रीयुत नारायण विश्वनाथ मंडलिक, बी. ए. वगैरे मंडळींनीं फार खटपट करून ही लायब्ररी स्थापन करण्यांत यश संपादन करून महाव-

ळेश्वर येथें आरामासाठीं येणाऱ्या एतद्देशीय लोकांवर उपकार करून ठेविला आहे.

या शिवाय येथें फ्रियरहालची लायब्ररी आहे तींत सभ्य नेटिव लोकांससुद्धां जाण्यास हरकत नसते. पूर्वीं आनेरेबल विश्वनाथ नारायण मंडलिक हायकोर्ट वकील यांनीं सार्वजनिक कामास मदत करण्याच्या आपल्या नैसर्गिक स्वभावाला अनुसरूनच या दोन्ही लायब्ऱ्यांचे उत्पादकपणाचें यश मिळविलें आहे. याप्रमाणें सार्वजनिक कामास यांनीं मुंबई इलाख्यांत फार मदत केली आहे.

**रे गार्डन.**

नवीन बांधलेल्या बोमनजी पेटिट लायब्ररीच्या इमारतीला लागूनच निरनिराळ्या प्रकारच्या फुलझाडांनीं सुशोभित केलेला एक वगीच्या आहे त्यास " रे गार्डन " असें ह्मणतात. यांत कुंड्यांतून, जमिनीवरील विलक्षण प्रकारच्या रेखून काढलेल्या आकृत्यांतून, व भोंवतालच्या किनाऱ्यावरून असलेल्या विलायती व एतद्देशीय अनेक रंगांच्या फुलापानांचा समूह पाहून चित्तास आनंद देणारें हें

स्थळ आहे. यामुळें येथें येऊन केव्हां तरी बसावें असें पुष्कळ लोकांस वाटतें व ते स्वस्थ बसलेलेही बरेंच वेळां नजरेस येतें. या उपवनांत ठिकठिकाणीं हौसी मंडळींना बसण्यास बाकेंही टाकिलेलीं आहेत. कुटुंबवत्सल मंडळींच्या मुलांचें येथें आल्यावर मनरंजन होण्याकरितां लोखंडी चार पाळणें व वर्तुळाकार फिरणारें घोड्याचें चक्र कायमचें ठेविलेलें आहे. परंतु यांची मजा पाहण्याबद्दल दर एक कुटुंबवत्सल मनुष्यास म्युनिसिपालकमिटींत थंड ऋतूबद्दल दीड रुपया व उष्ण ऋतूबद्दल दोन रुपये फी द्यावी लागते. ह्या बागेची व्यवस्था पाहण्याचें काम खुद्द सुपरिंटेंडंट साहेब व दुसरे कमिटीचे मेंबर लोक यांजकडे आहे. बागेची उत्तम प्रकारची स्थिति पाहून यांचें यावर चांगलें लक्ष्य आहे असें वाटतें.

---

# पोस्ट (आफिस) व तार (आफिस)



पश्चिम दिशेस एकमेकाला लागूनच तार ऑफिस व पोस्ट ( टपाल ) आफिस हीं दोन आफिसें आहेत. बारा महिने येथें पोस्टाचें सर्व काम चालतें. पत्रें टाकण्याकरितां या शिवाय आणखी ३ खांब पुरलेले आहेत. पहिला खांब सातारा रस्त्यावर हीथ व्ह्यू नांवाचे बंगल्यापुढें आहे, दुसरा खांब भाजी मंडईनजिक दीक्षित यांचे घरापुढें आहे. तिसरा मुंबई पाइंटाकडे जाण्याच्या रस्त्यावर हिलस्टोन बंगल्याचे बाजूस आहे. याशिवाय महाबळेश्वराला जाण्याच्या वाटेवर मुल्लरचे बंगल्यानजिक एक पेटी लाविलेली आहे; तसेंच क्लब, रेसव्ह्यू हाटेल वगैरे प्रसिद्ध इमारतींतही एक एक पेटी लाविलेली असते.

आक्टोबरच्या महिन्यापासून जून महिन्यापर्यंत वाठारकडील टपाल सकाळीं ८ आणि ९ चे दर-

म्यान येथें येऊन लागलींच १० चे सुमारास पोस्ट-मन पत्रें वगैरे जिकडचीं तिकडे वांटून जातो. कोंकण व महाड बाजूची डांक दुपारीं दोन वाजतां येते व त्याची डिलिव्हरी तेव्हांच करितात. जेव्हां नामदार गव्हरनर साहेब यांची स्वारी येथें असते तेव्हां दररोज दोनवेळां टपाल येऊन दोनवेळां पत्रवांटणी होते. साहेब लोकांचे नोकर टपाल घेण्याकरितां पोस्टांत येतात, त्यांना लगेच टपाल मिळतें. रात्रीं आठ वाजतां आलेल्या पत्रांची वांटणी सकाळीं बरोबर सहा वाजतां होते; व सकाळीं आठ वाजतां आलेलीं पत्रें नऊ वाजतां वाटून शिपाई मोकळे होतात. टपाल जाण्याची नेहमींची वेळ सायंकाळीं बरोबर सहा वाजतां असते. तसेंच गव्हरनर साहेबांचा येथें मुक्काम असल्यास सकाळीं बरोबर सहाला येथून आणखी एक स्पेशल डांक वाठाराकडे जाते. महाडाकडे सकाळीं ११ वाजतां डाक बंद करून रवाना होते.

पावसाळ्यांत ( जूनपासून सपटेंबरपर्यंत ) वाठार कडील टपाल रनरकडून **वांई**पासून येथें ११ वा-

जतां येतें, व रनरबरोवर वांईपर्यंत जाणेसाठीं दुपारीं २ वाजतां रवाना होतें. या वेळीं कोणीही परगांवचा इसम येथें राहत नाहीं व गांवांतही ज्यांना पोटाच्या खळीसाठीं हें ठिकाण सोडतां येत नाहीं, अशी साहेब लोकांच्या नोकरांचाकरांची, श्री क्षेत्र महाबळेश्वर देवस्थानच्या ब्राम्हणांची, दहा पांच वाण्याउदम्यांची, एक दोन दारू विकणाऱ्या पारशांची, व धावड, धनगर कुणबी वगैरे आणखी कांहीं लोकांची, मिळून सुमारें एक हजाराची येथली कायमची वस्ती असते. उन्हाळ्यांत ती पांचसात हजारापर्यंत होते. तेव्हां पावसाळ्यांत पोष्टाला उन्हाळ्याप्रमाणें काम नसल्यामुळें उन्हाळ्यांत पोष्टमास्तर एक व क्लार्क तीन असले तर पावसाळ्यांत एकच इसम राहून काम पाहतो.

रविवार व सणाच्या सुट्याखेरीज करून बाकीच्या दिवसांत सीझनमध्यें रोजच्या देवघेवीची वेळ सकाळीं ७ पासून ८ पर्यंत व दुपारीं १२ पासून ३ वाजेपर्यंत असते. यूरोपांत जाणाऱ्या डांकेचीं पत्रें टाकणें तीं शुक्रवारीं टाकणें; व त्यंग्या,

मनी आरडरी पाठविणें त्या गुरुवारीं पाठविणें हा उत्तम पक्ष. ह्मणजे डाक चुकण्याची व खोटी होण्याची धास्ती राहत नाहीं. मेल कंत्राटदार मि. फ्रामजी आरदेसर यांनीं टपाल नेणें आणणेचें काम आज ३०।३५ वर्षें महाबळेश्वर सदर स्टेशनवर राहून फार चांगलें केलें आहे, व हल्लींही करीत आहेत. याकरितां यांचे मेलटांग्यांत बसून वाठाराहून येथें व येथून वाठारास येण्याजाण्यास पासेंजर लोकांनाही जागा मिळते ती निर्धास्तपणें स्वीकारावी. त्यावद्दल पासेंजराला निदान ९ रू० भाडें पडतें.

## तार आफिस.

सुपरिंटेंडंट साहेबांचें बिऱ्हाड वुडहौस नांवाच्या बंगल्यांत असतें, त्याच्याच पुढल्या अंगास सरकारी तार आफिस म्हणून पाटी लाविलेली आहे, तेथें हें आफिस आहे. दरसाल हें आक्टोबरला खुलें होऊन तारीख १९ माहे जूनला बंद होतें. थंडया ऋतूमध्यें येथें गव्हरनर साहेबांची स्वारी असते तोंपर्यंत पहिल्या प्रतीचें असल्यामुळें रात्रंदिवस उघडें राहून काम चालतें. व उन्हाळ्यांत तर

अखेरपर्यंत हें पहिलें प्रतीचेंच असतें. हें पहिलें प्रतीचें नसतें, त्या वेळीं सकाळचे ११ पासून सायंकाळचे चार वाजेपर्यंत तारा करण्याचें काम घेतात. आदित्यवार वगैरे सुटीच्या दिवशीं सकाळीं ७ पासून ९ पावेतों, आणि दुपारीं ४ ते ६ पर्यंत आफिस खुलें असतें.

### घरें पाहणारे एजंट.

पॉले माइटसाहेब सन १८४८ मध्यें येथें येऊन राहिला, आणि त्यानें हा हौसएजंटचा धंदा प्रथम घातला. त्यांत याला इतकी गोडी लागली होती कीं, त्यानें हें काम म्हातारपणापर्यंत सोडिलें नाहीं.

पुढें माइट साहेबांच्या गादीचें काम प्रॅन्क आर साहेबांनीं २०।२५ वर्षेपर्यंत चालवून आपलें बरेंच साधन करून घेतलें, व येथें ते आपलें कायमचें ठिकाण करून राहिले. यांस देवाज्ञा होऊन २।३ वर्षें झालीं, यांचे मागें नांव घेण्यासारखा असा निव्वळ हौसएजंटचा धंदा करणारा कोणी नसल्यामुळें कोणाचेंही नांव येथें देतां येत नाहीं.

या ऑर साहेबांच्या पश्चात् त्यांच्या देखरेखी

खालीं असलेले सर्व बंगले निरनिराळ्या जात्यभिमानी लोकांनीं आपल्या आपल्या जातिबंधुकडे सों. पवून दिल्यामुळें जो तो हौस एजंटच झाला आहे. व यापासून एकास मिळत असलेला कमिशनचा फायदा पुष्कळांत विभागला जाऊन या धंद्याची कवडीमोल किंमत झाली आहे. असा प्रकार झाल्यामुळें एका मनुष्यास पुष्कळ कामें पडून त्या सर्वांत त्यांचें लक्ष विभागलें गेलें आहे. याचा परिणाम असा झाला कीं, बंगल्याच्या दुरस्तीकडे किंवा त्यांत आलेले भाडेकऱ्याच्या सोईगैरसोईकडे लक्ष्य कमी पोहोंचून मालकाचें नुकसान व भाडेकऱ्याची गैरसोय होण्याचा संभव फार.

आमचा स्वतांचाही हौसएजंटचाच धंदा आज १९।२६ वर्षें चालला आहे. परंतु वर्षांतून आठ महिने आम्ही या धंद्यास काया-वाचा-मनें-करून झटून व यत्न करून लोकसेवा करीत आलों आहों. त्यांत केवळ पैसा कमाविण्यावरच दृष्टि दिली नाहीं. आह्मी केलेल्या सेवेबद्दल सद्गृहस्थांनीं अभिप्राय दिले ते पुस्तकाचे अखेरीस जोडले आहेत,

त्यांजवरून विदित होणार आहे. इकडील कोण- त्याही प्रकारची माहिती आमचेकडे मिळेल.

### लष्कर उतरण्याचीं ठिकाणें.

चांगलीं पैस असून अगदीं सपाटीची व देखावे व पाणी संनिध असलेली अशी सर्वोत्कृष्ठ जागा येथें सासून पाइंटजवळ आहे. ही जागा सासून घराण्याच्या मालकीची असल्यानें त्या जमिनीवर तळ देणें असल्यास त्यांच्या वंशजांची परवानगी घेऊन मग छावणी द्यावी लागते. तीन लष्करी छावण्या यत्किंचित्‌ही संकोचित्‌पणा न होता येथें खुशाल देतां येतात, इतकी ही विपुल जागा आहे.

दुसरी जागा हिरडा डेपोजवळ आहे. ती सर्व जंगलखात्याच्या देखरेखीखालीं आहे. या ठिकाणीं पूर्वीं साताऱच्या राजाच्या सैन्याचा तळ पडून मोठा गांव वसल्यासारखें होऊन जात असे; म्हणजे लष्करकरितां बाजार वगैरे सोई अवश्य असल्यामुळें जवळपासच्या खेडगळे लोकांनीं या जागेला बाजार हेंच नांव दिलें होतें. परंतु पुढें मालकमपेठ बाजार बनल्यानंतर वर सांगितलेल्या बाजारास जुना बाजार

हें नांव पडलें. हल्लीं या जागीं बाजाराचीं दुकानें वगैरे नाहींत तरी येथील रहिवासी लोक यास जुना बाजार असेंच म्हणतात. येथील वेण्णा सरोवर बांधून काढून पाण्याचा सांठा केला आहे तो साताऱ्च्या महाराजांनीं आपले लष्करकरितांच केला होता.

तिसरी जागा व्हिक्टोरिया काटेज नांवाच्या बंगल्यालगत आहे. ती महाबळेश्वर म्युनिसिपालिटीची असल्यामुळें सुपरिंटेंडेंट साहेबांच्या ताब्यांत आहे.

येथें तंबू ठोकण्याकरितां किंवा छपरें करण्याकरितां ज्या सार्वजनिक म्युनिसिपालिटीच्या जमीनी घेण्यांत येतात त्यांजबद्दलचें भाडें म्युनिसिपालिटींत भरण्याची रूळी आहे. मग तें अर्धवट महिन्याचें असलें तरी भरपूर महिन्याचें भाडें घेतात. तें प्रत १ ली ५ रु.; प्रत २ री ३ रु.; प्रत ३ री २ रुपये प्रमाणें असतें.

धर्मसंबंधी सभा किंवा वनभोजनें करण्यास लागलेल्या जागेस भाडें ८४ रोजप्रमाणें द्यावें लागतें. मात्र या सर्व कमेटीच्या जाग्याबद्दल आगाऊ सुपरिंटेंडंट साहेबांची परवानगी घ्यावी लागते.

---

# स्मशानें.

अनित्यानि शरीराणि वैभवं नैव शाश्वतं ॥
नित्यः संनिहिते मृत्युः कर्तव्यो धर्मसंग्रहः ॥ १ ॥

येथें हिंदु, मुसलमान, पारशी व साहेब लोक यांची निरनिराळ्या ठिकाणीं स्मशानें आहेत, तेथें या जातींचे सर्व लोक जातिधर्माप्रमाणें प्रेतसंस्कार करितात. त्यास लागणारें सामानही येथें तयार मिळतें. तेव्हां या हवाशीर ठिकाणीं सुखाकरितां येऊन राहिलेल्या लोकांपासून प्रेतसंस्काराचा येथील व्यापारी लोक फायदा मिळविण्यास सोडीत नाहींत. यावरून इंग्रजीमध्यें मनुष्याच्या जीवित्वास समुद्रावरील *जहाजाची उपमा दिली आहे ती रास्त आहे असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. कारण जसें जहाज केव्हां बुडेल याचा नेम नाहीं, तसाच मनुष्याचा आत्मा केव्हां व कोठें कुडी सोडून जाईल याचा

* "Life is but a ship in the Ocean."

भरंवसा नसतो. या कारणास्तव या आरोग्यवर्धक ठिकाणींही अनिष्ट व प्राणहारक घाले पडतात. त्याबरोबर टक्कर देण्यास आपण तयार असलें पाहिजे.

वेण्णातलावाचे उगमाजवळ हिंदूचें स्मशान आहे त्यांत दहनविधि किंवा भूमिगतविधि करण्याचे संस्कार जातिधर्माप्रमाणें करण्यांत येतात. मुसलमान लोकांची वस्तीच्या ठिकाणीं सोईप्रमाणें दोन ठिकाणीं स्मशानें आहेत. एक सातारा रोडकडील ब्ल्यू व्हॅलीच्या लवणांत आहे व दुसरें सुमारें ६ मैलावर लिंगमळा बागेस लागून आहे. या ठिकाणीं जास्त भरणा धावड जातीच्या मुसलमान लोकांचा असल्यामुळें मूठमातीस जाण्याचा त्यांचा समारंभ पेठेंतून नजरेस आल्यावांचून राहत नाहीं. प्रेत जमिनींत पुरण्याचा यांचा शिरस्ता आहे.

## पारशी लोकांचें स्मशान.

वेण्णा तलावानजिक पेटिट रोडला लागून आहे. तेथें साहेब लोकांप्रमाणेंच पेटींत घालून हे प्रेत पुरून टाकितात. जातिधर्माप्रमाणें वास्तविक हा

यांचा संस्कारविधि नाहीं. यांचा विधि अगदींच निराळा आहे. तो करण्यास येथें टावर आफ सायलेन्स बांधिलेला नसलेमुळें व सातान्याखेरीज दुसरे ठिकाणीं पाठवून भागण्यासारखे साधनांचा अभाव असलेमुळें त्यांचा नाइलाज आहे.

## साहेब लोकांचें स्मशान.

बाजारापासून महाडरस्त्याचे सडकेच्या डावे बाजूस पावमैलावर हें टायगर पाथ रस्त्याचे अलीकडे आहे. यांत मुसलमानांच्या थडग्याप्रमाणेंच थडगीं आहेत, परंतु हीं फार व्यवस्थितपणें एका मोठ्या दगडी कपौंडांचे मर्यादेंत आणून ठेविलीं आहेत. हें कपौंड काळ्या घडीव दगडांनीं कमानीवजा खण करून बांधलें आहे. त्यांत जाण्यास एक फाटक ठेविलें आहे. आंत गेल्यावर सर्व थडगीं संगमरवरी दगडांनीं व दुसऱ्या घोटीव आरशाप्रमाणें स्वच्छ काळ्या पाषाणांनीं नानाकृतींचीं बनविलेलीं आहेत. तीं पाहून प्रेक्षकांच्या मनांतील स्मशानाच्या वेदना विसरून जातात. या थडग्यावर पुष्कळ झाडाचा विस्तार पसरून जाऊन सावलीचें छतच होऊन

गेलें आहे. या लोकांमध्यें थडग्यावर लेख लिहून ठेवण्याची पद्धति प्रचुर असल्यामुळें त्या मृत मनुष्याचें नांव व त्याची बाहदुरकी जिज्ञासु लोकांस चिरकाल पाहण्यास मिळतात. तसा प्रकार इतर जातींमध्यें मुळींच नसल्यामुळें एकदा मेल्यावर त्याची आठवणसुद्धां होण्यास ज्ञातीला मार्ग नसतो. या स्मशानांत विशेष पाहण्यासारखे पराक्रमी पुरुषांचे नमुन्याकरितां थोडे लेख आहेत ते असेः-

चवथे घोडेस्वाराच्या पलटणींतील एक शूर व तरुण शिपाई लेफटेनेंट हिंद साहेब याचें थडगें आहे याच्या मरणाची अशी हकिकत आहे कीं, हा येथील रानांत शिकारीकरितां गेला असतांना बैलानें शिंगावर घेऊन ता. १९ एप्रिल सन १८३४ मध्यें ठार मारिलें. हा बैल आपल्या गुराच्या कळपांतून त्याचा अगदीं पाटलाग करीत सुटला होता तेव्हां यानें त्याच्या तडाक्यांतून निसटण्याची बरीच खटपट केली होती. परंतु अखेरीस तिचा उपयोग झाला नाहीं. दुसरें थडगें अमेरिकेंतून आलेल्या पाद्री लोकांपैकीं ग्रेव्ह साहेबाच्या जोडप्याचें आहे. तिसरी

कबर मुंबईच्या टाकसाळेचा मास्तर व मुंबईच्या जिआग्राफिकल मंडळीचे उत्पादक जेमस् फ्रेझर हेडलसाहेब यांची आहे. चौथी कबर मद्रासच्या २३ वे पलटणीचा कपतान व हैद्राबाद येथील असिस्टंट रेसिडेंट थामस जान न्यूबोल्ड हा येथें २६ मे सन १८९० रोजीं मेला त्याची आहे. पांचवी मुंबईच्या सैन्याचा आडव्होकेट जनरल मेजर वुलियम मिलर साहेब यांची कबर आहे. त्याचा आकार-खांबासारखा असून वर चंबूवजा डेरा केलेला आहे. शिवाय ब्राथवेटबाईसाहेब बोरबाई-साहेब, फेनेल, कारनेजी, विसेल कॅरोल्सकुक, गोठ क्रेन्स वगैरे साहेब लोकांचीं थडगीं आहेत.

या मालकमपेठेला लागूनच दक्षिण आंगास चिनी लोकांच्या स्मशानकपौंडाची लांबलचक एक भिंत आहे. त्यांची कांहीं कांहीं थडगीं आहेत. परंतु त्यावर लेख वगैरे कांहीं लिहिला नसल्यामुळें त्यांजबद्दल माहिती मिळत नाहीं. हल्लीं याठिकाणीं चिनी लोकांचा गंधसुद्धां नाहीं. यामुळें हें स्मशान रद्द झालें आहे.

## सार्वजनिक भक्तीचीं ठिकाणें.

हिंदुस्थानांतील पाहिजे तें रमणीय स्थान घ्या, तेथें आमच्या लोकांनीं एखाद्या देवालयाची स्थापना करून परमेश्वराच्या सर्वव्यापित्वाची, सर्वशक्तिमत्वाची आठवण मनुष्यमात्रास दिली नाहीं असें सहसा होत नाहीं. निर्जन अरण्य, ओसाड माळ, किर्र झाडी, खोल दरी, उंच डोंगर, असल्या सर्व ठिकाणीं कोणीना कोणी तरी देव अथवा देवी यांच्या मूर्तींची स्थापना झालेली असावयाचीच ! महाबळेश्वर डोंगरावरही अनेक देवतांचीं देवालयें आहेत.

हल्लीं या वस्तीला आमचीं पांच देवळें झालीं आहेत. मारुतीचीं तीन, श्रीराम व विठोबा यांचें एक व शंभूचें एक. यांपैकीं बहुतेक देवळें मुख्य पेठेंतच आहेत. ह्या देवळांना सालिना किंवा एकदम अशी सरकारांतून कांहीं मदत मिळालेली नाहीं. यांचा नेहमींचा खर्च येथील पेठकरी व्यापाऱ्यांच्या शिरावर आहे. कधीं कधीं कोणीं हिंदु बडे लोक कांहीं देवाच्या उत्सवास हातभार लावितात. या सर्व देवळांपैकीं रामाचें देऊळ अगदीं अली-

कडचें आहे. या देवळाची इमारत मजबूत असून आटोपशीर अशी बांधलेली आहे. याच्या सभामंडपाचें लांकूडकाम चांगलें केलें आहे. या देवळास एकंदर दोन अडीच हजार रूपये खर्च झाला तो गांवकरी लोकांनीं याचकवृत्ती करून केला आहे. या गांवकरी लोकांत कोणीं रामाचें उपासक व कोणीं गाणपत्य आहेत म्हणून यांत आणखी गणेश स्थापनाही झाली आहे. आतां गोकुळअष्टमीला विठोबाचा, रामनवमीस रामाचा, हनुमानजयंतीस मारुतीचा असे उत्सव होत असतात. सर्वांत रामाचें देवळाची इमारत व देवांच्या मूर्ति पाहण्यासारख्या आहेत. हीं देवळें पेठेंत आहेत.

आजकाल श्रीरामाच्या देवळाचीं सर्व लोकांस फार भक्ति आहे. कांहीं भक्तिमान् लोक दररोज तेथें "रामकृष्णहरि" वगैरे नामघोष करून भजन करितात.

ख्रिस्ति लोकांनींही येथें प्रार्थना करण्याचीं मंदिरें बांधिलीं आहेत. ज्यांस क्राइस्ट चर्च म्हणतात, तें विस्तीर्ण ख्रिस्तमंदिर बाजारच्या जरा उत्तर बा-

जूस आहे. १८४२ सालीं कार धर्मगुरूंनीं ही इमारत सार्वजनिक कामाकरितां म्हणून अर्पण केली होती ती नवी जुनी करून हल्लीं ईश्वरसेवोपयोगी केली आहे. तारक येशु, मोझेस, आणि महा साधु योहान्न वगैरे पवित्र मूर्तींची सुंदर चित्रें विलायतेंतून तयार करून आणून उंच तक्ताजवळ बसविलीं आहेत. यांत निरनिराळ्या उपासकांचीं देवळांत २१० प्रार्थनासनें मांडलीं आहेत. हें मंदिर सातारच्या धर्माध्यक्षाच्या ताब्यांत दिलें असल्यामुळें उन्हाळ्यांत ते आपला डेरा येथें देऊन राहतात. लोकांस या मंदिरांत येऊन आसनारूढ होण्यास आतां कांहीं दक्षणा द्यावी लागत नाहीं. येथील फूटतूट दुरस्ती इंजिनियर खात्याकडून होत असते. आदित्यवारचा दिवस देवळांत साहेबलोक ईश्वरभजनांत घालवितात. सकाळीं आठ वाजतां दर्शन व सायंकाळीं ५–३० वाजतां प्रार्थना व धर्माचे विषयावर चर्चा अशा गोष्टी रविवारीं होतात.

**संताक्रूज**–बाजाराच्या पेठेंत क्याथालिक धर्माचें एक देऊळ आहे, तें गोमांतकी पाद्री साहेबांच्याह-

वालीं केलेलें असतें. हे पाद्री आक्टोबरपासून पावसाळा लागेपर्यंत येथें राहून पावसाळ्याला परत गोंव्यास जातात. त्यांला गोंवें सरकारांतून नक्त वेतन मिळतें. खेरीज बापतिस्मा देणें, लग्नें लावणें, प्रेतसंस्कार करणें, आणि आवांतर कृत्यें हीं त्यांचीं येथील कर्तव्यें होत. याबद्दल जी फी येईल तिच्यावर यांची मालकी असते.

**मरेचें घर**—मरेसाहेब हिंदुस्थान सोडून निघाले तेव्हां त्यानीं आपलें घर अमेरिकन मिशन पैकीं साध्वी ग्रेव्हाबाईसाहेब यांस इनाम दिलें होतें. त्यांनीं आपल्या पतीप्रमाणेंच या ठिकाणीं आमरणांत दिवस काढले. तेव्हां त्यांच्या पश्चात् हें देऊळ अमेरिकन मिशन मंडळींला चर्चाचे कामास आयतेंच सांपडलें. आणि यामुळें आतां या इलाख्यांतील कोणत्याही अमेरिकन मिशनरीला किंवा त्याच्या कुटुंबाला हवा बदलणेचें प्रयोजन पडल्यास येथें बदली करून घेऊन चांगल्या आरोग्यकारक हवेंत राहण्यास फार सोईकर झालें आहे. ह्या देवळांत रविवारीं ११ वाजतां प्रसंगोपात इंग्रजींतून प्रार्थना

होते. बाजारांतील लहान देवळांत, दर आठव-
ड्यास मराठींतही एक प्रार्थना होत असते- तेथें
सर्व शाखेचे ख्रिस्ती लोकांस येण्यास सदर
परवानगी असते.

---

# पांचगणी.

हें ठिकाण महाबळेश्वर आणि वांई यांच्या बहुतेक मध्यावर आहे. तथापि हवापाण्यासंबंधानें हें प्रति महाबळेश्वरच आहे. पुण्याहून महाबळेश्वरीं येतांना वाटेनें या गांवांतूनच यावें लागतें. महाबळेश्वरपेक्षां याची उंची २०० फूट कमी आहे. महाबळेश्वर डोंगराची जी शाखा वांई बावधनपर्यंत जाऊन पसरली आहे त्या शाखेवर तांबडे मातीच्या जमिनीचा जेथें शेवट होतो त्या ठिकाणावर अर्ध मैलाच्या अंतरांत दोन खेडेगांवें आहेत त्यांपैकीं पूर्वेंकडील गांवाचें नांव धांडेघर व पश्चिमेकडील बाजूस सपाटीवर आहे तें पांचगणी. हें गांव महाबळेश्वरापेक्षां सखलांत असल्यामुळें महाबळेश्वरचा कहरी पाऊस व धुकें यांचा या गांवावर भडिमार होत नाहीं. हा कहरी पाऊस उत्तर व दक्षिण

आंगच्या डोंगरांकडे पांगून गेल्यामुळें **पांचगणीचा** चांगला बचाव होतो. यामुळें **पांचगणीला** खुशाल बारा महिने राहिलें तरी नकोसें वाटत नाहीं. पूर्व बाजूनेंही डोंगराचें उंच नाकाड आलें असल्यामुळें थंडीच्या दिवसांतील पूर्वाभिमुख वाराही महाबळेश्वराप्रमाणें येथें आंगाला झोंबल्यासारखा लागत नाहीं.

**पांचगणी** येथील वसाहत होण्यास **जान चेस**-साहेबांनीं पहिल्यानें हिय्या करून परिश्रम केले त्यांचें चांगलें सार्थक झालें. या स्थानाची उंची ४३७८ फूट आहे. येथील जमीन व हवा मनुष्यांस व समशीतोष्ण कटिबंधांत होणाऱ्या फळझाडांस फार चांगली आहे असें यांनीं सन १८५४ सालापासून स्वानुभवानें खात्री करून घेऊन लोकांच्या प्रतीतीस आणिल्यावर सन १८६२ साल पावेतों साहेबलोकांचीं ६ घरें येथें झालीं आणि लागलींच याचवर्षीं सरकारांतूनही मदत म्हणून सालींना २,००० रुपयांची नेमणूक येथील स्वच्छतेच्या व्यवस्थेकरितां चालू झाली. **जान चेससाहेबालाच** पहिले आनररी सुपरिंटेंडेंट व माजिस्त्रेट करून

त्यांच्या गळ्यांत सर्व व्यवस्था पाहण्याचें **सर बार्टल फ्रियर**साहेब यांनीं घातलें. येथें राहणाऱ्या लोकांस महाबळेश्वरपेक्षां येवढीच कमतरता आहे कीं त्यांस बाहेर फिरून पाहण्यास रम्य ठिकाणें नाहींत. येथून पूर्वपश्चिम पसरलेल्या कृष्णाखोऱ्याची भव्य शोभा दिसते. किनाऱ्यावरून ठिकठिकाणीं गांवें आहेत त्यांतील घरांच्या व झोंपड्यांच्या लहान लहान समुच्चयांचे तुकडे तुकडे, भोंवतालच्या झाडीतून व पिकांतून ओसाड भगदाडें किंवा खांडवे पडल्यासारखीं दिसतात. नदीच्या पाण्याचीं वळणें हिरव्या गार पिकांतून कृष्णसर्प शांतपणानें पसरल्याप्रमाणें वाटतात. दक्षिण अंगास तर छोटेखानी पण याहीपेक्षां प्रेक्षणीय मजा दिसते.

पांचगणीच्या जमिनीच्या अंतर्यामीं उष्णता उत्पन्न करणारीं द्रव्यें आहेत. यामुळें डोंगरकांठच्या खडकाचे तळाशीं खोदलें असतां त्याठिकाणीं धुमसत असलेला अंतरंग वन्हि एकदम थंड होऊन बुडबुडे आल्यासारखें वाटतात. जवळ **धांडेघर** गांव आहे तेथें पाणी चांगलें असून तेथून काळे दगड,

पांढरे रस्ते वगैरे सर्व देसुरी हवापाण्याचीं चिन्हें लागतात. हा गांव लहान वस्तीचा आहे. येथें शंकराचें देऊळ आहे. त्यांत पाण्याची उत्तम सोय आहे. येथें रस्त्यावर घोड्याचा टपा मेल कंट्राक्टर यांचा आहे. पांचगणीच्या मातींतही लोहांश मिश्रित आहे. परंतु जमिनीच्या आंगीं महाबळेश्वराप्रमाणें मोखरपणा नाहीं. पाण्याचा तळ लौकर लागतो व जमिनींत विहीर करण्यास खडकाचा धरही लागतो असें जरी आहे तरी हुकमी पाणी लागेलच असा भरंवसा नसतो. यामुळें गोडीला व गारपणाला जरी महाबळेश्वरच्या मासल्याचें पाणी येथें आहे, तरी तें मनमुराद मिळत नाहीं. येथें फक्त ३ सार्वजनिक झरे आहेत. बाकीचे लोकांच्या खाजगत जमिनींत सांपडल्यामुळें त्यांबद्दल विशेष माहिती देण्याचें कारण नाहीं. या तिहींपैकीं बारा महिने भरपूर पाणी असणारा झरा उत्तरेस जरा खालीं उतरून गेलें ह्मणजे लागतो. त्याला कडें बांधून काढलें असून त्यांस मराठ्यांची विहीर असें ह्मणतात. यास सरकारानें अलीकडे ३५३ रु. खर्च करून चांगलें दुरुस्त केलें आहे.

पांचगणी हें हवा खाण्याचें ठिकाण या दृष्टीनें पाहिलें असतां चांगलें आहे. हवामान वर्षभर सुखा-समाधानानें राहण्यासारखें आहे. येथील हवा थंड असून पाचक आहे, परंतु थोडी रूक्ष आहे. येथेंही फिरावयास जाण्यायेण्याच्या वाटा असून पाइंटासारख्या जागा केलेल्या आहेत. त्या सिडणी पाइंट व टेबललँड ह्या होत. हीं दोन ठिकाणें फिरण्यास जाण्यासारखीं आहेत. अलीकडे गांवाच्या मागील अंगास डोंगरांचें शिखर आहे त्या लगत-उंचावर मोठी दगडी ताल घालून खेळण्याची पैस जागा केली आहे. त्या ठिकाणीं सायंकाळचे सुमारास लोक खेळण्याकरितां जमतात. ही स्टेशन फंडानें तयार केली आहे.

**व्यवस्था.**

येथील लोकसंख्या सुमारें ७००।८०० आहे. त्यांत नेटिव ६०० असून साहेब लोक १००।१५० आहेत. येथील सर्व अधिकार सुपरिंटेंडट साहेबाला आहेत. त्यांची योग्य बजावणी होऊन लोकांस नीट स्वच्छता ठेवण्याची दहशत असावी

ह्मणून त्यांस दुसरा वर्ग माजिस्त्रेटचा अधिकार फौजदारी कामासंबंधानेंही दिला आहे. येथें पोलीस आफिसर असून शिपाई वगैरे मिळून १९ लोक सुमारें असतात. हें स्थळ महाबळेश्वर सुपरिंटेंडेंटचे देखरेखीखालीं असतें. लोकांच्या खाजगी बंगल्याशिवाय सार्वजनिक उपयोगी अशा इमारती आहेत त्या, सुपरिंटेंडेंटचें आफिस, रहदारी बंगला, हॉटेल, लायब्ररी, पोष्ट आणि तारआफिस, हिंदूंची सरकारी मराठी शाळा, यहुदि व साहेब लोकांच्या मुलांची सरकारी मदत मिळालेली इंग्रजी शाळा, दवाखाना, मार्केट आणि ३० नौकरांस राहण्यासाठीं कोठड्या वगैरे इमारती आहेत. पैकीं २ मात्र सरकारी पैशानें बांधिलेल्या आहेत. येथील रहदारी बंगला हवा तेवढा मोठा असून त्याला स्वयंपाकघर, नोकर लोकांच्या व पाकनिष्पत्ति करणाऱ्यांच्या कोठड्या आणि तबेला वगैरे इमारती जोडल्या आहेत. या बंगल्यांत महाबळेश्वरचे सफरीस निघालेले साहेब लोक मुक्काम करितात; किंवा कोणी पारशी किंवा गोरे लोक हॉटेलला

उदार आश्रय देतात. येथील हायस्कूलचा शिक्षण-
क्रम पाद्री मंडळींच्या कमिटीनें चालविला आहे. सन
१८७६ मध्यें सुमूहूर्तावर याची स्थापना झाल्यावर,
१८८० मध्यें मुंबईच्या मुख्य पाद्री साहेबांनीं यास
थोडें उत्तेजन देऊन सुधारणा केली. तूर्त खाणा-
वळ खाऊन पगारी गोरे व पारशी जातीचे
विद्यार्थी या शाळेंत पढत असतात. या इंग्रजी शा-
ळेच्या इमारतीला सन १८८४ सालीं ४०×१८
ची एक कोठडी नवीन बांधून जोडावी लागली
त्यास २६०० रू० खर्च आला. रविवारीं शाळेस
सुटी असल्यामुळें देवाची प्रार्थना करण्यास कित्येक
ख्रिस्ती लोक येथेंच जमतात. डोंगरमाथ्यावरील उच्च
ठिकाणच्या गार हवेंत साहेब लोकाच्या मुलांस
शिकण्यास ठेवण्याची कायमची एवढीच शाळा
आहे. ज्यांना आपलीं मुलें विलायतेस केवळ शिक्ष-
णाकरितां पाठविण्याचें सामर्थ्य नसेल किंवा तीं आप-
ल्या डोळ्यापुढें असून वरचेवर भेटावीत असें वाटत
असेल त्यांना हें हायस्कूल ह्मणजे एक अलभ्य
वस्तूच सांपडली असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

कारण, मनुष्याच्या शरीरसुखास मुख्य जी हवा ती येथें मनास सदासर्वदा उल्हासित ठेवणारी असल्यामुळें, शिक्षणक्रमाचा घोशा कसा दुधांत साखर घातल्याप्रमाणें मनःपूर्वक चालला असतो. येथील वसाहतीचें सालीना उत्पन्न सरकारी मदत २००० रु० ची धरून बहुतेक खर्चाच्या बेताचेंच आहे.

येथील व्यवस्था चांगली चालली आहे. हल्लीं येथें यूरोपियन व पार्शी लोकांचे एकंदर बंगले सुमारें ९०।६० आहेत.

## नरसरी.

थंडहवेंत होणारीं परदेशचीं झाडें, वनस्पति, बटाटे, सपताळू, निवडुंग आणि ब्लॅकबेरी व इतर मूळ झाडें वगैरे येथें तयार करण्याची खटपट चाललेली असते, ती वांया जात नाहीं. कारण पांचगणीच्या काफीची लंडनच्या दलालांनीं तर चांगलीच तारीफ केली. तसेंच मधुर सुवास असलेली हेलिआट्रोप व मर्टलचीं फुलें येथें जंगलांत पुष्कळ होतात. ब्रायरचीं फुलें सगळ्या हिंदुस्थानांत दुर्मिळ तीं येथें तयार होतात. वांईहून घाट चढून येणाऱ्या रखरखीनें त्रस्त झालेल्या

पथिकास येथील दुतर्फा कुंपणांच्या पुष्पगुच्छांचा शृंगार पाहून त्याच्या मनास खचीतच समाधान वाटतें. हे फुलांचे झुपके कुंपणावरून इतके दाट असतात कीं ते गुलाबाच्या फुलाच्या मुद्दाम माळा करून पसरल्या प्रमाणें दिसतात. एकेका झुपक्यांत पन्नास पन्नास फुलें दृष्टी पडणें ह्मणजे कांहीं सामान्य गोष्ट नाहीं आणि असे झुपके पाहून मनास सानंद आश्चर्य वाटणें अगदीं साहजिक आहे. सर्व ऋतुकाळीं रम्य दिसून ही सुंदर पांचगणी आगष्ट व सपटंबर महिन्यांत तर सौंदर्याची कमालच करून सोडिते. यावेळीं लहान-झुडपे, बटरकप, रानवाटाणा यांनीं रान अगदीं शृंगारून गेलेलें असतें. सपाट जाग्यावर हरळी, मखमाल व इतर प्रकारचें गवत उगवून हिरवागार गालीच्या पसरल्यासारखा दिसतो.

बाहेरून महाबळेश्वरीं आलेले लोक मे अखेर पावसाळा लागतां लागतां आपलें सामान पाठवून डांकेच्या जंत्रींत नांवें नोंदून वाहन मिळण्याचा नंबर येईपर्यंत गडबडींत गडबड करून येथें उभाउभीं येऊन जातील तर त्यांना याही ठिकाणचा मासला कळून

येईल. या वेळीं येथें वळवाचे पाऊस, पूर्वेकडून आणि दक्षिणेकडून वाऱ्याचीं वावटळें येऊन तिसरे प्रहरीं पडण्यास लागतात. खरा पावसाळा देशावर सुरू झाल्यापासून आठ दिवसांनीं ह्मणजे अर्धामूर्धा जून महिना ढकलतो इतक्यांत चोहोंकडून झोडपीत दक्षिण बाजूनें आरंभ करितो आणि सारखा रात्रंदिवस पाणी ओतावयास लागतो. हा चमत्कारही मुक्काम जास्त वाढविल्यास पाहण्यास मिळतो.

---

**गाड्याचे टपे**—महाबळेश्वर, धांडेघर, वांई, नोऱ्याची विहीर, शिरगांव, वाठार ही घोडे बदलण्याचीं कंट्राक्टर याचीं ठिकाणें आहेत.

**समाप्त.**



# सूचिपत्र ( जंत्री. )

---

## पुस्तकें विकत मिळण्याचें ठिकाण.

दत्तात्रेय कमळाकर दीक्षित, राहणार महाबळेश्वर,
जि॰ सातारा.

---

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २ | १५ | प्रदश. | प्रदेश. |
| ७ | ७ | त्यांस | त्यास |
| १० | १४ | कुकुद्माति | ककुद्माति |
| १२ | १२ | पहाणाराच | पहाणाराचे |
| १३ | ३ | यात्रेकऱ्यांच्य | यात्रेकऱ्यांच्या |
| १४ | १७ | दऱ्या | दरे |
| २२ | ५ | वर्षामागें | वर्षांमागें |
| ३६ | १२ | ह | हा |
| ४३ | ५ | साबाचे | साहेबांचें |
| ४७ | ५ | येर्थला | येथील |
| ४८ | १ | मार्तीचें | मातीचें |
| ६३ | १८ | समुद्रसपाठीपासून | समुद्रसपाटीपासून |
| ६४ | १३ | पित्तकरपंचाणें | पित्तकरपणाचें |
| ७३ | ८ | गव्याच्या | गव्याचा |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ७८ | ७ | र्राइ | राई |
| ८० | १६ | सालीचीं | सालीचे |
| ८३ | ४ | कोबीसारखा | कोंबासारखा |
| ८७ | ६ | आक | ओक |
| ९१ | २ | स्कधाची | स्कंधाची |
| ११४ | १४ | ह्यांचा | ह्यांच्या |
| ११९ | ११ | रिपोर्टावरून | रिपोर्टांवरून |
| १४२ | ४ | गोचर, गोमा | गोचरगोमा |
| १४७ | १९ | बक्षिसाच्य | बक्षिसाच्या |
| १४८ | १८ | मूघ्नि | मूर्ध्नि |
| १५३ | ५ | बुडहौस | वुडहौस |
| १६४ | ५ | ( गव्हर्मेंटहौस ) | गव्हर्मेंटहौस |
| १६५ | ९ | परतु | परंतु |
| १८९ | २ | बाँड | बँड |
| २०६ | २ | मालकमचे | मालकमचें |
| २०८ | १९ | ाटकत | टिकत. |
| २१९ | १७ | खालचा | खालची |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २३७ | २ | धुमश्चर्की | धमश्चक्री |
| २३९ | ४ | मोंठे | मोठें |
| २४० | ३ | कवा | किंवा |
| ३०१ | १९ | यास | त्यास |
| ३११ | १२ | जगति | जागृति |
| ३२९ | ६ | खलें | खुलें |
| ३३२ | ९ | लष्करकरितां | लष्करांकरितां |
| ३४० | ९ | मूर्तीची | मूर्तींचीं |
| ३४४ | ६ | झोंवल्यासारखा | झोंबण्यासारखा |
| ३४९ | १३ | लोकाच्या मुलांन | लोकांच्या मुलांना |
| ३५० | १२ | ल्बॅकबेरी | ब्लॅकबेरी |
| " | " | मूळ झाडे | फळझाडें |

# डायाबिटीस क्युअर.

अथवा

# मधुमेहारि.

महाबळेश्वरच्या आरोग्यकारक हवेंत उत्पन्न होणाऱ्या पुष्कळ गुणकारी वनस्पत्यौषधिभांडाराची माहिती मिळविण्याचा आमचा उपक्रम बरेंच दिवस चालल्यावर या रोगावर कांहीं रामबाण वनस्पति आढळून आल्या. पुढें त्यांचा प्रयोग या रोगानें त्रस्त झालेल्या बऱ्यांच अजाऱ्यांवर करून पाहून गुण आल्याची पक्की खात्री झाल्यावर त्यांचें हें औषध बनविलें आहे.

हें औषध घेऊं लागल्यापासून पंधरा १५ दिवसांतच गुण येण्यास सुरवात होते, ती अशीः— रोग्याची तृष्णा कमी कमी होत जाऊन त्याच्या लघवीचें मानही दिवसेंदिवस बदलत जातें, इतकेंच नाहीं तर तींतील साखरेचे प्रमाणांतही

हळूं हळूं अंतर पडूं लागतें; त्याचप्रमाणें जठराग्नि चांगला प्रदीप्त होऊन भूक चरचरीत लागूं लागते, व खाल्लेल्या अन्नाचा शरिरांत चांगला परिपाक होणें व मलोत्सर्ग साफ होऊं लागणें या क्रिया एखाद्या सुप्रकृति मनुष्याप्रमाणें चालूं लागतात. तेव्हां रोग्यास अर्थातच हुशारी वाटणें साहाजिक आहे. परंतु हा रोग अगदीं समूळ नाहींसा होण्यास हें औषध दोन तीन महिने तरी सारखें घेतलें पाहिजे.

१८० गोळयांच्या १ डब्याची किं. रु. १८१२
३६० गोळयांच्या १ डब्याची किं. रु. ३.

शिवाय पॅकिंग व पोस्टेजबद्दल हांशील ८५ आणे जास्त पडेल. तीनपेक्षां जास्त डबे मागविल्यास टपालहांशील वगैरेचा कांहींएक चार्ज पडणार नाहीं. अनुपानखर्डा औषधासोबत पाठविला जाईल.

पत्ता—दत्तात्रय कमळाकर दीक्षित, राहणार महाबळेश्वर.

---

## LIST OF PERSONS

## WHOSE CERTIEICATES CAN BE SEEN

## IN THE FOLLOWING PAGES.

1. R. B. Y. M. Kelkar, late Oriental Translator to Government of Bombay.
2. R. B. R. R. Bhardi.
3. Mr. M. B. Chaubal, High Court Pleader, Bombay.
4. Mr. S. W. Kane, Doctor, Bombay.
5. Justice M. G. Ranade, High Court Judge, Bombay.
6. Mr. Janardan Gopal, Solicitor, Bombay.
7. Mr. R. S. Poredi, L. M. & S., Private Secretary to H. H. the Rajasaheb of Akkalkot.
8. R. B. M. W. Barve, Late State Karbhari, Kolhapur.
9. Shri. H. S. Desai, Bhawnagar.
10. Mr. M. K. Makanji, Bombay.
11. R. B. V. M. Bhide, Poona.
12. R. B. R. V. Poonekar, Late Khasagi Karbhari, Baroda.
13. Col. G. H. Jacob, Staff Corps.
14. R. B. Jayasatyabodharao Trimalrao, Subt. Judge, F. C, Satara.
15. Mr. K. B. Bullel, M. D.
16. Mr. S. Tagore, I. C. S.
17. Mr. G. H. Bhide, Pleader, Nagpur.
18. R. B. R. N. Mudholkar, B. A. LL. B.
19. Mr. M. G. Pasta, Bombay.
20. Mr. Kalabhai Laloobhai, Vakil, Bombay.
21. R. B. C. D. Kavishwar, Sub-Judge, F. C.
22. Mr. Hiralal Chunilal, Government Pleader, Broach.

23. Prof. G. G. Agarkar.
24. Hon. Bal Gangadhar Tilak, B. A., LL. B.
25. Hon. Gopal Krishna Gokhale, B. A.
26. R. B. A. B. Desai, Assistant Commissioner S. D.
27. Prof. Abaji Vishnu Kathavate.
28. Hon. Mr. C. H. Sitalvad.
29. Shri. Lakhangauda S. Sardesai, Vantmur.
30. Mr. B. B. Mukhirj, Agent of H. H. The Maharaja Manikya Bahadur of Independent Tipprah Bengal.

---

MALCOLM PETH.

SIR,

It is now acknowledged by all that there is no better *Sanitarium* than Mahableshwar in this part of the country. That being so, it is resorted to not only by the higher officers of Government, but also by Chiefs and Jahagirdars and by other classes of well-to-do people for business or health. For Europeans coming to this station, there is every kind of convenience. It is the native visitor that finds it very difficult to live here comfortably, at a moderate cost. With a view to remove this inconvenience as far as it lay in my power, I established an agency in the year 1887, with what success, will be seen from the accompanying certificates kindly given to me by well-known gentlemen with whom I had any kind of dealing during their sojourn in this place. I am not however satisfied with what little I have been

able to do. I have not been able to remove even a little of the difficulties which are encountered by native visitors here. It is my ambition to remove them all and to make them as comfortable as European visitors. But this is beyond the power of my limited means. I hope therefore, you will be kind enough to utilize my services in some way or other you may deem fit. I am a permanent resident of this place and hope you will be good enough to entrust me with the management of your own or your Chief's Bunglow or to ask me to do any kind of busin ess that an honest and hard-working agent, can do in a place like this. I shall be quite contented with such remuneration or commission charges as you will be pleased to give, since my primary purpose is to extend the business of my agency with a view to serve native visitors as much as I can. Negotiations, for the purchase of sites [of Bungalows, furnishing and adjusting them after the local fashion, purchasing and sending local curiosities, hiring houses and supplying all available things at a moderate price, may be made at all times. Because it is the business of this kind in which I am likely to be most useful, and it is in this direction I hope to be employed by you at no distant day.

Hoping to be excused for the troubles,

I beg to remain, Sir,

Yours very truly,

DATTATRAYA KAMALAKAR DIXIT,

*AGENT*,

MAHABLESHWAR.

# TESTIMONIALS.

I am glad to state that Mr. Dattatraya Kamalakar Dikshit, Agent, Mahabaleshwar, has always rendered me valuable assistance in procuring furniture &c. He is a trustworthy man and am sure that any stranger visiting this Sanitarium will find him extremely useful.

Y. M. KELKAR,

Oriental Translator to Government Bombay.

Mahableshwar, 24-5-90.

---

I am glad to record that Mr. Dattatraya Kamalakar Dikshit is a very useful gentleman in this station. His manners are good and he is trustworthy.

R. R. BHARDI,

Assistant Commissioner.

Malcolm Peth, 25th May, 1890.

---

Mr. Dattatraya Kamalakar Dikshit has stared business here as house agent and supplier of furniture &c. to strangers coming here. It is an attempt to provide a very desirable institution on these hills for the comfort and convenience of Hindu gentlemen; and it is to be wished that these should largely avail themselves of Mr. Dikshit's agency. Thus patronised, Mr. Dikshit

hopes to be able to afford every comfort for boarding and lodging; he is strictly honest, persevering and energetic and ought to succeed in his attempt.

MAHADEO B. CHAUBAL,
Pleader, High Court, Bombay.

Malcolm Peth, 25th May, 1890.

---

I have great pleasure in stating that Mr. Dattatraya Kamalakar Dikshit has been of great use to me during my short stay here. He has been very assiduous in looking to my comfort and has, in fact, made me feel at home in this strange place.

S. W. Kane,
Doctor, Bombay.

26-5-90.

---

I have very great pleasure in recording that Mr. Dattatraya Kamalakar Dixit who has lately started business as an house agent here, is a very useful and honest man. Gentlemen coming to these Hills should take advantage of his agency.

M. G. RANADE,
Special Judge, Poona.

Mahableshwar, 28-5-90.

---

Mr. Dutoba Kamalakar Dixit was introduced to me by my brother Dr. Pandurang, Surgeon in the Baroda State at present, who has known him for a long time. During my visit to this place in

the May Season he, Duttopant, proved himself of oery great use to me. I found him extremely vbliging and ever willing to render what assistance he can to those (Native Gentlemen) who visit this place and who may stand in need of it. He deserves every encouragement from visitors.

JANARDAN GOPAL,

Solicitor Bombay.

---

Mr. Dattatraya Kamalakar Dixit has been useful to us on several occasions during our stay here. He has started business as an house agent and we feel sure that before long his services will be largely availed of, by visitors to this Sanitarium.

R. S. POREDI, L. M. & S.,
Private Secretary to H. H. The Rajesaheb
of Akkalkot.

Mahableshwar House, 6th June, 1890.

---

I have known Mr. Dattatraya Kamalakar Dikshit of Mahableshwar for the last five years. He is a very obliging and accommodating house agent here; always willing and ready to assist his constituents, prompt and attentive to the wants of his clients at all times, a good correspondent too.

MAHADEO WASUDEO BARVE.

7th June, 1889.

---

It seems that Dattatraya Kamalakar Dixit has commenced very recently the business of house agent and supplier of things such as furniture, beds, &c. We had a little of order with him this season, but we would be willing to entrust him with any such business hereafter as we know him since these seven years.

HARIPRASAD SANTURAM DESAI,
Bhavnagar.

9th June, 1899.

---

Dattatraya Kamalakar Dixit seems to me to be a faithful and honest agent. He has, it seems, very recently started the agency of supplying houses and bungalows, which he does in my opinion, at a much cheaper price, than other two Europeans. I wish that every native and especially a Hindu, must give the agency of his bungalow to this man. He also supplies furniture of every sort and also carriages for Season to much advantage.

MULRAJ KHATAO MAKANJI,
Bombay.

25th May, 1882.

---

I am very glad to state that Dattatraya Kamalakar the house agent at Mahableshwar is a very obliging and useful gentleman. He has been of great use to me last and this year in procuring house accomodation and other conveniences. And the feature in his character is that he does all things in an honest and straightforward way.

VISHNU MORESHWAR BHIDE,
Pensioner First Class Sub-Judge,
Poona.

26th May, 1889.

---

I am very glad to certify that Mr. Dattatraya Kamalakar Dikshit who has lately commenced the business of house agent at Mahableshwar is very obliging and not only supplies houses and Bungalows but furnishes every thing that visitors to this station are in need of. He is honest and straightforward in his dealings. He is very useful agent as well as an amiable friend.

RAOJEE VITHAL POONEKER,
Pensioner, Late Khasgi Karbhari,
Baroda.

29th May, 1882.

---

I have made acquaintance here of Mr. Dattatraya Dikshit, who has set up in business as an Agent for native gentlemen visiting the hill and from his extensive local knowledge, there is no doubt that he is in a position to afford material aid to such. Mr. Dikshit is also an enthusiast in regard to the medical plants of the country and is doing his utmost to discover their properties. In a vast country like this, there must be number of plants possessed of healing virtues, and every effort to add to the Indian pharmacopœia is deserving of encouragement. I hope therefore that men, who are competent in such matters, will give a helping hand to Mr. Dikshit in his praiseworthy efforts to benefit suffering humanity.

G. A. JACOB,
Col., Staff Corps.

Mahableshwar, 16th March, 1891.

---

I came to this place to spend a few days of the Holy-Easter Holidays, with family and children, and put up in the house of Dattatraya Kamalakar Dikshit. He kept excellent arrangement for the care of my family during my stay here. He is a very good gentleman of obliging character, a man of learning and intelligence. He has been studying the medical plants here. It would be of great use if he publishes the names of the plants and their uses. He has built two or three houses on the hill, which have been well provided for and furnished. There are wells and privies to both the houses. Any visitor coming to this place will I am sure, be pleased with the kind and cordial treatment from Mr. Dattatraya Dikshit.

27th March, 1891.

JAYSATYBODHRAO TRIMALRAO,
Subte-Judge, F. C., Satara.

---

I have great pleasure in stating that Mr. Dattopant Dixit has been of great use to me during my short stay at this place. He carefully looked after my comforts. He really deserves some encouragement from Native visitors of this place.

3rd June, 1891. K. B. BULEL, M. D.

---

We have had occasion to avail ourselves of the services of Mr. Dikshit and were very much pleased with them. He is likely to be of great use to gentlemen visiting Mahableshwar.

S. TAGORE,
Sessions Judge,
Mahableshwar, 29-5-90. Sholapur and Bijapur.

---

Mr. Dattatraya Kamalakar Dikshit has rendered me great assistance in making my stay comfortable in every way. During my stay here for upwards of two months his usefulness became known to me in various ways in assisting poor natives who came here for the benefit of their health. Without his help and his attention, their stay would have been very uncomfortable. Such a native agent is an absolute necessity here. Native gentlemen in well-to-do circumstances, who come here for the benefit of their health in the hot season, should patronize him in engaging house accommodations through him, which will entitle him to obtain commission from house-owners, instead of using European Agency for this purpose. This kind of patronage will enable him ( Mr. Dixit ) to assist the poor natives in various ways. I will use him as my Agent to secure house accommodation for me hereafter and I recommend that every one who is of my opinion should do so and thus give the poor natives the benefit of his assistance on their arrival here at cheap remuneration.

GOPALRAO HARI BHIDE,
Pleader, Nagpur.

31st May, 1893.

---

I have known Mr. Dattatraya Kamalakar Dixit since the year 1888. That year and last year and this year, when I was here I availed myself of his services very freely. I have always found him willing and prompt to do what is in his power for those who require his assistance. He has set up an agency office since 1887 and has

by so doing supplied a long felt want in the case of Hindu gentlemen who were new to this station or had no house of their own. I firmly believe that Mr. Dixit is deserving of every encouragement and support.

RANGANATH N. MDDHOLKAR,
B. A., LL. B.
Pleader, High Court, Amraoti.

1st June, 1893.

---

Dattatraya Kamalakar Dixit, has given me good satisfaction in his lately commencing his agency business to secure houses and bungalows. He is very honest and obliging. He also supplies furniture and other household materials. I wish him success in his future prospects. I recommend, all gentlemen who deal with him will get every satisfaction.

MADOWDAS GOKULDAS PASTA,
Bombay.

3rd June, 1889.

---

Mr. Dattatraya Kamalakar Dixit having applied to me for my remarks as to the way in which he has been carrying out the orders from time to time made on him for the different supplies at Mahableshwar, I endorse with pleasure what, Mr. Bhide has said. I have always found him very prompt and attentive to every order entrusted to him. Any visitor of the hills will, I dare say, find in him a very useful guide and agent and at

the same time a very amiable and docile friend. I wish him every success and encouragement in the work he has undertaken.

27th May, 1887.

KALABHAI LALOOBHAI,
Vakil, High Court,
Bombay.

---

Mr. Dattatraya Kamalakar Dixit acted as our agent in procuring house accommodation, servant and conveyance during our short stay in Mahableshwar. He is very prompt and attentive in executing the orders entrusted to him. He appears to be a very deserving man and I wish him success in the agency business commenced by him. Natives coming to this place would be inconvienced if there were no help of a man like Mr. Dattatraya.

CHUNILAL DALAPATRAM KAVISHWAR,
Sub-Judge, Kaira. Ahmedabad Dist.
LALOOBHAI DALPATRAM KAVISHWAR,
L. C. E.,
Secretary, Baroda State, Spinning & Weaving
Mills, Baroda.

Mahabaleshwar, 29th May, 1889.

---

I visited Mahableshwar and put up with Mr. Dattatraya Kamalakar Dixit. I stopped with him only for twenty four hours and found him very kind and hospitable. There is no other such agent for natives and it is to the interest of all natives

to give him encouragement in the course he has taken up and I am sure every native who will come in contact with him, will be very much pleased by the assistance, given by Mr. Dixit.

HIRALAL CHUNILAL,
Government Pleader, Broach.

Mahableshwar,
28th April 1892.

---

सुधारकांत (अंक ७ तारीख ८ माहे दिसेंबर १८९०.) महाबळेश्वराचें वर्णन लिहितांना प्रो० गो० ग० आगरकर यांनीं असें लिंहिलें आहेः— "रा. दत्तोपंत हे हुशार, प्रामाणिक, उद्योगी आणि मनमिळाऊ गृहस्थ आहेत. यांनीं महाबळेश्वरीं अलीकडे एजन्सीचा धंदा सुरू केला असल्यामुळें मध्यम स्थितीच्या लोकांची मोठी सोय झाली आहे. दत्तोपंतापाशीं घरापासून टांचणीपर्यंत पाहिजे ती वस्तु भाड्यानें देण्यासारखी असल्यास भाड्यानें किंवा विकत देण्यासारखी असेल तर किंमत देऊं करून मागा, ती थोड्या वेळांत फार माफक कमिशन घेऊन ते तुम्हांस आणून देतात, आणि तुमचा परामर्श घेण्याविषयीं नेहमीं तत्पर असतात. आज दोन तीन वर्षें महाबळेश्वरीं मधल्या स्थितींतले खाजगी गृहस्थ किंवा मोठमोठे नेटिव अंमलदार गेले, त्यांनीं दत्तोपंतास दिलेल्या

सर्टिफिटांचें एक लहानसें पुस्तक झालें आहे, व या पुस्तकांतील बहुतेक सर्टिफिकिटांत दत्तोपंतांच्या अंगीं वर सांगितलेले गुण असल्याबद्दल दाखला सांपडण्यासारखा आहे."

---

I have known Mr. Dattatraya Kamalakar Dixit for several years and have great pleasure in recommending him to all such gentlemen as may desire to have a hardworking and honest agent at Mahableshwar.

BAL GANGADHAR TILAK,
B. A., LL. B.,
Member of Council, Bombay.

Mahabaleshwar,
7th March, 1896.

---

I had occasion this year to avail myself of the services of Mr. Dattatraya Kamalakar Dixit in securing house accommodation at Mahabaleshwar and I have much pleasure in stating that Mr. Dixit arranged every thing to my entire satisfaction.

GOPAL KRISHNA GOKHALE,
Professor and Member of Council, Bombay.

Mahabaleshwar,
21 May 1900.

---

I am glad to have on record that Mr. D. K. Dixit rendered me excellent services in finding me suitable accommodation, furniture &c. He is a willing worker and deserves the patronage of all gentlemen.

ACHUT BHASKAR DESAI,
Assistant Commissioner, Belgaon.

26-5-1900.

---

I have known Mr. Dattatraya Kamalakar Dixit for sometime. I have great pleasure in stating that his thorough acquaintance with the station and his good manners and his willingness to render assistance to visitors make him a very good house and furniture agent.

ABAJI VISHNU KATHAWATE,
Prof. Elphinstone College, Bombay.

Mahabaleshwar,
28th May, 1900.

---

Mr. Dattatraya Dixit is a very amiable and obliging gentleman and was very serviceable to us during our stay at Mahabaleshwar this year. He in starting the agency work that he has been doing for the last few years, has supplied a real want in the case of the Hindu visitors at this Sanitarium.

CHIMANLAL H. SITALVAD,
B. A., LL. B.,

31-5-94. High Court Pleader, Bombay.

---